# मुक्तेश्वरकृत महाभारत

## आदिपर्व ( खंड पहिला )

संपादक

अनंत काकबा प्रियोळकर




मुंबईसरकार आणि मुंबईविद्यापीठ यांच्या आश्रयाखालीं

मुंबई

मराठी संशोधनमंडळ,

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाकुरद्वार, मुंबई २.

१९५१

# अनुक्रमणिका



**किंमत पांच रुपये.**


मुद्रक—**आर. आर. बखले,** मुंबईवैभव प्रेस, सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटीज बिल्डिंग, मुंबई नं. ४.

प्रकाशक—**अ. का. प्रियोळकर,** कार्यवाह, मराठी संशोधनसमिति, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई नं. २.

# पुरस्कार

सरकारी विद्याखात्याकरितां 'नवनीत' अथवा 'मराठी कवितांचे वेंचे' कै. परशुरामपंत तात्या गोडबोले मराठी त्रान्सलेतर यांचे-पंडित यांनीं लिहिलें. त्याची १८७३ सालची आठवी आवृत्ति लहानपणापासून मजपाशीं सांभाळून ठेवलेली आहे. त्या पुस्तकांत मुकुंदराजापासून म्हणजे इ. स. १००० पासून तों एकुणीसाव्या शतकापर्यंत अनेक कवींच्या काव्यांतील उतारे आहेत. त्यांत मुक्तेश्वराबद्दल "जन्म शके १५३१ इ.स. १६०९ व याचे प्रसिद्ध ग्रंथ भारताचीं पहिलीं चार पर्वें ओवीबद्ध," एवढीच माहिती दिली आहे; व दुष्यंतशकुंतलाख्यान, जरासंधवधप्रकरणांतील कांहीं उतारे आणि शेवटीं द्रौपदीवस्त्रहरण एवढे वेंचे दिले आहेत. यापलीकडे मुक्तेश्वराचें अध्ययन सामान्य जनांनीं केलें असेल असें मला वाटत नाहीं. निदान संशोधनपटु श्री. प्रियोळकर यांनीं कृपेनें त्यांच्या या पुस्तकाला चार पुरस्काराचे शब्द लिहावे हें आग्रहपूर्वक सांगून हातीं हें पुस्तक देईपर्यंत मीतरी मुक्तेश्वराचें अन्य कांहींच काव्य वाचलें नव्हतें. पुस्तकाच्या सुरुवातीसच मुक्तेश्वर हा एकनाथाच्या मुलीचा मुलगा, वडिलांचें नांव चिंतामणि, त्याचें स्वतःचें नांव मुद्गल आणि 'मुक्तेश्वर' या नांवाखालीं त्यांनीं काव्य लिहिलें असें स्वतःचें मत ग्रंथकर्त्यानें दिलें आहे व तें कसें बनविलें तेंहि नमूद केलें आहे.

तीनशें वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या कवीबद्दल निश्चित माहिती आपणांस असूं नये याचें नवल काय? त्यानंतर अलीकडे होऊन गेलेल्या प्रसिद्ध कवींचीं अगर ग्रंथकारांचीं तरी आपणांपाशीं कुठें सविस्तर चरित्रें उपलब्ध आहेत? आतां आपल्या विद्वानांचें लक्ष देशभाषेंतील जुन्या ग्रंथांच्या पद्धतशीर संशोधनाकडे वळलें आहे, ही एक अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. "आरंभीं एकही हस्तलिखित प्रत जेथें नव्हती तेथें या काव्याच्या आज सुमारें तीस हस्तलिखित प्रती उपलब्ध झाल्या," असें श्री. प्रियोळकर लिहितात. आणि "हस्तलिखितांच्या पुराव्यावरून जो पाठ कवीच्या हातचा किंवा त्याच्या काळचा ठरेल तोच खरा. जुना पाठ अपरिचित म्हणून किंवा आजच्या लेखनपद्धतीला धरून नाहीं म्हणून तो बदलणें अशास्त्रीय आहे," हें त्यांचें म्हणणें सयुक्तिक आहे. श्री. प्रियोळकरांनीं १९३५ सालीं रघुनाथपंडिताचें 'दमयंती—स्वयंवर' प्रसिद्ध केलें त्यांतील विद्वत्ताप्रचुर प्रस्तावनेंत त्यांनीं "नव्या चिकित्सापद्धतीचा अल्प इतिहास" या सदराखालीं आज मराठी भाषेचें पाठचिकित्साशास्त्र प्रयोगावस्थेंत आहे व तें निर्माण होत असतांना अनेक नवीन प्रश्न कसे उपस्थित होतात व संशोधनकार्य जसजसें अधिक होईल तसतसें तें निश्चित कसें होईल याचा उहापोह केला आहे.

महाभारताचें वाचन साहजिकपणेंच अत्यंत भक्तियुक्त भाविक अंतःकरणानें आपण करूं लागतों. त्यांतून मुक्तेश्वराची भाषा इतकी रसाळ आहे व त्याची वाणी इतकी प्रासादिक आहे कीं वाचकाचें चित्त लगेच तल्लीन होऊन जातें.

**वेदशास्त्र स्मृति-पुराणें। नाना इतिहास व्याकर्णें।**
**गाळूनि यांचीं रसायणें। द्वैपायनें कुशळतें॥**
**सुरस सुंदर पवित्र श्रृष्टी। बोनें निपजवुनी पाठीं।**
**संस्कृतशब्दसुवर्णताटीं। श्रेष्ठश्रेष्ठां वोगरिलें॥**

तेचि रसोय दुर्बळपणीं । महाराष्ट्रभाषारंभापणीं ।
वाढिली तरी भुकाळु जनीं । न सेविजे किमर्थ ॥

व्यासांनी संस्कृताच्या सोन्याच्या ताटात वाढली तींच पक्वान्नें मुक्तेश्वर आपल्याला आपल्या मराठीच्या आवडत्या केळीच्या पानांवर वाढीत आहे. त्याची गोडी वर्णन करण्यापेक्षा चाखून पहावी. आणि

काव्यपीयूषरसाचे चषक । भरोनि ठेविले आकर्षक ।
माधुरी हर्षामर्षकारक । रसिकजनीं चाखावी ॥

संशोधन पाठचिकित्सेच्या दृष्टीनें करून, ग्रंथ अस्सल स्वरूपांत उपलब्ध करून देणें हें तर महत्त्वाचें कार्य आहेच, परंतु विचाराचें वाहन व वेष जी भाषा, फक्त तिच्या दृष्टीनें संशोधन करून आपलें कार्य संपत नाही. याहूनहि अधिक महत्त्वाचें संशोधन म्हणजे आपल्या पूर्वजांनीं इतिहास–कथा–पुराणें इत्यादिकांचा महोदधि निर्माण करून ठेवला आहे तो मंथन करून त्यातून प्राप्त होणारीं अनेक विचाररत्नें व निघेल तें अमृत आज लोकांस देण्याची जरूरी आहे. भारतीय संस्कृतीच्या व पर्यायानें मानवी संस्कृतीच्या उत्क्रांतीचा विश्वसनीय इतिहास अशा संशोधनानेंच तयार होणार आहे. हें फार प्रचंड काम आहे. एक एक उल्लेख–एक एक अद्भुत कथा–जी आज केवळ काव्यमय कल्पनेची भरारी वाटते ती एक एक धागा समजून त्याचा छडा आपण नीट लावला तर हजारों वर्षांपूर्वीपासून मानवी मनाची उत्क्रांति कसकशी होत गेली–आज ज्या आपल्या भारतीयाच्या धर्म व संस्कृति या नावाखाली प्रचलित श्रद्धा, रूढी अगर मान्यता आहेत त्यांचा विकास कोणच्या पायऱ्यानी झाला–त्यांचा पत्ता लागेल. इतर संस्कृतींमध्येंहि तत्सदृश कल्पनाचा जो शोध लागला आहे त्यानें त्या सर्वांवर कसा प्रकाश पडला आहे हें सर्व आपण समजूं शकूं. या पुस्तकातील सर्पोत्पत्ति व सर्पसत्र या प्रसंगांवरून सुचलेलें एक उदाहरण देऊन मी माझा अभिप्राय स्पष्ट करतो.

पृथ्वीच्या पाठीवरील अनेक मानवजातींत सर्प, त्याची पूजा अगर हत्या यांचे उल्लेख आहेत व अनेक कथा प्रचलित आहेत.

ख्रिस्ती धर्मातला ईव्हला फशीं पाडणारा प्रख्यात सर्प, ज्याच्या पृष्ठावर विष्णु शयन करतो व डोक्यावर पृथ्वी तोलली आहे तो शेष, शंकर ज्याला भूषण म्हणून मिरवितो तो नाग, कृष्णानें मर्दन केलेला कालिया, सेंट जॉर्जनें ठार केलेला ड्रॅगन, पश्चिम आफ्रिकेमध्यें " फर्नांडो पो " या बेटांत इसापू जातीचे नीग्रो लोक अजूनही दरसाल एक मोठा उत्सव करून एका सर्पाचें कातडें, त्याला ठार करून, वर डोकें खालीं शेपटी असें एका उंच झाडावर टांगून ठेवतात तो सर्पदेव, या सर्व सर्पांच्या दंतकथांचा परस्परांशीं अगर मानवी मनाच्या उत्क्रांतीशीं काहीं संबंध जोडतां येईल का ? कालसर्प म्हणून संतकवि उल्लेख करतात. सर्व सर्पकथाच्या वाङ्मयाचा अभ्यास व संशोधन केल्यास भिन्न भिन्न धार्मिक ग्रंथांत प्राचीन कालीं घडलेल्या ज्या अद्भुत गोष्टींचा उल्लेख आहे त्यांवरून आद्य मानवी समाजांतील मनुष्याच्या मनाची व बुद्धीची कसकशी उत्क्रांति होत गेली त्याचा आपणास उलगडा होईल. या प्राचीन दंतकथां-(myths) बद्दल एक तत्त्ववेत्ता लिहितो, " History is Knowledge. Religion is mainly active, and supplies strength and discipline; and

static religion such as we find it when it stands alone attaches mind to life and consequently the individual to society, by telling him tales on a par with those with which we lull little children to sleep." या गोष्टींचा आपण अर्थ लावून संस्कृतीचा सुसंगत इतिहास तयार केला पाहिजे. फ्रेझरनें "The Golden Bough-A study in magic and religion" या ग्रंथामध्यें अनेक देशांतील वृक्षपूजा सर्पपूजा इत्यादि चालींचा संग्रह व विचार या दृष्टीनें केला आहे. आणि ( १ ) मंत्रविद्या, ( २ ) भौतिक शास्त्रें व ( ३ ) धर्मकल्पना यांचा एकमेकांशीं काय संबंध आहे याचाही थोडासा विचार केला आहे. अगोदर शोध व संग्रह, मग भाषेच्या दृष्टीनें संशोधन, मग उत्क्रांतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें संशोधन असें प्रचंड तिहेरी काम मराठी विद्वानांच्या पुढें आहे. पुणें, वाई, धुळें व मुंबई या चार ठिकाणींच अशा संशोधनाचे संघटित व उल्लेखनीय प्रयत्न चालू आहेत असें मला वाटतें. विशेषतः श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं "वैदिक संस्कृतीचा विकास" या त्यांच्या पुणें विद्यापीठांत गुंफलेल्या व्याख्यान-मालेंत जे सुसंगत मूल्यवान विचार सांगून थोर कार्य केलें आहे तेंच पुढें अजून किती कार्य शिल्लक आहे याचें दिग्दर्शक आहे.

आपण उत्कृष्ट सुरुवात केली आहे. मला आशा आहे कीं चिकाटीनें हें त्रिविध संशोधनकार्य करणारे प्रस्तुत ग्रंथकारांसारखे अनेक विद्वान संशोधक महाराष्ट्रांत निर्माण होतील व नष्ट होत चाललेलें हुडकून, वा गंज चढलेलें दिव्य तत्त्वभांडार उजळून, जगापुढें मांडून, त्याचे डोळे दिपवितील. सृष्टीच्या अत्यंत प्राचीन कालापासून मानवी उत्क्रांति कशी आजच्या अवस्थेपर्यंत येऊन पोंचली आहे-त्या सर्व मार्गावर उजेड पाडूं शकेल एवढी वाङ्मयसामग्री भारतांत आहे. पण त्या कूटलिपीचे ( Cypher ) वाचक पाहिजेत. एका पिढीचें हें कार्य नाहीं-एकाच व्यक्तीचें तर नाहींच नाहीं. इतरत्र आधींच ग्रथित झालेलें ज्ञान मराठींतून उपलब्ध करायचें म्हटलें तरी किती परिश्रम जरूर आहे तें आपण जाणूं शकतों. मग सध्यां नवविचारनिर्मितीचें कार्य करणाऱ्या विद्वानांना लागणाऱ्या सामग्रीची आपण जुळवाजुळव केली, संघटित प्रयत्नाला प्रारंभ केला, तरी आपण योग्य दिशेलाच पाऊल टाकलेंसें होईल. श्री. प्रियोळकर यांनीं हा मार्ग आक्रमण करण्यास उत्साहानें सुरुवात केली आहे. त्यांना मी सुयश चिंतितों.

मुंबई,
७ नवंबर १९५१.

बा. गं. खेर.

# प्राक्कथन

मुक्तेश्वरी महाभारताचीं आदि, सभा, वन, विराट व सौप्तिक अशीं पांचच पर्वें आज उपलब्ध आहेत. यांपैकीं सौप्तिकपर्व तर अलीकडे कांहीं वर्षांपूर्वीं मिळालें. यामुळें कांहीं लोकांचा असा ग्रह झाला आहे कीं, मुक्तेश्वरानें महाभारताचीं अठराही पर्वें लिहिलीं असावीं, आणि सौप्तिक पर्वाप्रमाणें बाकीचीं पर्वेंही आज ना उद्यां केव्हां ना केव्हां सांपडतील. मधलेंच सौप्तिक पर्व मिळालें त्यावरूनही इतर पर्वें त्यानें रचिलीं असावींत या आशेला बळ चढलें. 'का. पां. प.' या सहीनें निबंधमालेंत कांहीं वर्षांमागें याविषयीं एक पत्र प्रसिद्ध झालें होतें. त्याचा आशय असा कीं, मुंबईतील जांबुळवाडींत राहाणाऱ्या रा. जिवबा अण्णा शिरोडकर या गृहस्थांनीं बेळगांवात असताना मुक्तेश्वराचीं अठराही पर्वें वाचलीं होतीं, व तीं श्रीमंत बापूसाहेब शहापूरकर याच्या घरांत किंवा कदाचित् कुरुंदवाडकर पटवर्धन यांजकडेही असतील असें ते सांगतात.[1] गोमंतकांत हस्तलिखितांचा शोध करीत असतांना कै. व्यंकटेश शां. दळवी या गृहस्थांनीं मुक्तेश्वरी आदि व सभा पर्वांचें हस्तलिखित मला दिलें व त्यांच्या घरीं जुन्या काळीं मुक्तेश्वरी महाभारताचीं अठराही पर्वें होतीं, परंतु लोकांनीं तीं वाचावयास नेलीं व परत केलीं नाहींत, असें ते म्हणाले. चारदोन दिवसांनीं मुक्तेश्वराचीं अठराही पर्वें रा. श्रीनिवास गावणेकर या गृहस्थाकडे आहेत असें सांगणारे एक गृहस्थ भेटले. मीं तें हस्तलिखित लगेच त्याच्याकडून आणविलें. उघडून पाहतों तों आदि, सभा, वन व विराट हीं मुक्तेश्वरी पर्वें आरंभीं असून बाकीचीं पांडवप्रतापांतील श्रीधराचीं पर्वें जोडून या महाभारताची पूर्ति करण्यांत आली होती. अशाच प्रकारें विष्णुदासनाम्याचीं महाभारताचीं इतर पर्वें जोडून मुक्तेश्वरी महाभारत संगृहीत केल्याचें मौजे उदापूर ( जि. पुणें, जुन्नरापासून तीन कोस अंतरावर ) येथील एक उदाहरण काशीनाथ नारायण साने यांनीं नमूद करून ठेविलें आहे.[2] रा. शिरोडकर यांनीं बेळगांवांत मुक्तेश्वराचीं अठराही पर्वें वाचल्याचें जें निबंधमालेंतील पत्रांत नमूद केलें आहे तोही बहुतेक असाच प्रकार असावा, असें वाटतें.

उपलब्ध मुक्तेश्वरी पर्वांना विष्णुदासनामा किंवा श्रीधर यांनीं रचिलेलीं पर्वें जोडून ज्याप्रमाणें मुक्तेश्वरी भारताला पूर्णता आणण्याचे प्रयत्न झाले त्याचप्रमाणें मुक्तेश्वराचीं अनुपलब्ध असलेलीं पर्वें स्वतः रचून तें महाभारत पूर्ण करण्याचा चंग अनेक कवींनीं बांधलेला दिसतो. असा प्रयत्न ' जिवाशिवा ' नांवाच्या एका कवीनें केला. महाप्रस्थानपर्वाच्या शेवटीं हा कवि म्हणतो—

आदिकवींचा श्रेष्ठ कवि । मुक्तेश्वर ज्ञानी अनुभवि ।
काव्यरचने श्रियावैभवि । अग्रपद कविगणांत ॥ ७२ ॥

---

१ निबंधमाला, अं. ४७ ( नवंबर १८७७ ), पृ. ३०.

२ भारतइतिहाससंशोधकमंडळ, इतिवृत्त १८३२, पृ. ३४.

जो साक्षात व्यास सावतार । प्राकृत भारत रचिलें आपार ।
त्यांतुन प्रगट पर्वे चार । भारथसार अप्रतिमा ॥ ७३ ॥

आदिपासून विराटांत । चारि पर्वे भारत साक्षात ।
पद्यरचना नाना दृष्टांत । अर्थ सिद्धांत नवरसि ॥ ७४ ॥

यावरि उद्बोध गोपाळनाथ । उद्योगपर्व रचिलें साद्यांत ।
श्रीधर पंडित जो व्याख्यात । अश्वमेध प्ररोत तिहि केला ॥ ७५ ॥

मुक्तेश्वरें विणिले श्रेष्ठ पट । चारि हात प्रमाण प्रगट ।
तया दसोडे जोडून सदट । विणिले येक हात गोपाळें ॥ ७६ ॥

येक हात श्रीधरें । ऐसे साह हात पूर्वि विणिले ।
यावरी शिवकृपे जिवें सुताविले । मोठे विणिविले गोबरे ॥ ७७ ॥
घोंगडें विणिलें बारा हात ।[3] ... वगैरे.

जिवाशिवाला गोपाळकवीचें उद्योगपर्वच मिळालेलें दिसतें. पांगारकरांनीं याशिवाय भीष्मपर्वापासून स्वर्गारोहणपर्वापर्यंत त्याचीं पर्वें पाहिलीं होतीं.[4] मजजवळ त्याचीं उद्योग, भीष्म व कर्ण हीं पर्वें आहेत. उपरिनिर्दिष्ट जिवाशिवाच्या महाभारतावर टिपण लिहितांना प्रो. द. वा. पोतदार म्हणतात, "मुक्तेश्वराचें अपूर्ण भारत पूर्ण करण्याची खटपट विष्णुदासनामा, मोरेश्वर, चंद्रात्मज, रुद्र, नरहरि मोरेश्वर, नवरसनारायण, पद्मनाथ, शंभुदास, इत्यादि पुष्कळ कवींनीं केली आहे. जिवाशिवाचा प्रयत्न त्यांपैकींच एक आहे."[5]

विष्णुदासनाम्याचीं आदि, सभा, वन व विराट हीं पर्वें तंजावर व औंध येथील हस्तलिखितसंग्रहांत आहेत. शिवाय विष्णुदासनामा हा मुक्तेश्वरपूर्व दिसतो. तो शके १५१७ मध्यें हयात होता व त्यांच्यापुढें असलेल्या आदिपर्वाचा लेखनकाल श. १५३१ असें पा. मो. चांदोरकर लिहितात.[6] मुक्तेश्वराचा जन्मकाल श. १५३१ मानला जातो. यावरून विष्णुदासनाम्याचा महाभारतरचनेचा प्रयत्न मुक्तेश्वरमहाभारताच्या पूर्तीसाठीं केलेला असावा असें दिसत नाहीं.

शुभानंदकवीनें मुक्तेश्वराच्या महाभारताची पूर्ति करण्याचा संकल्प स्पष्टपणें नमूद केला

---

३ **भारतइतिहाससंशोधकमंडळ-त्रैमासिक**, वर्ष ११, अं. १. पृ० २४.
४ **महाभारताचे मराठी अवतार** ( श्रीसरस्वतीमंदिर ). पृ० ४३.
५ **भा. इ. सं. मं. त्रैमासिक** व. ११. पृ० २५.
६ तत्रैव व. १२. पृ० १६९.

नाहीं, पण तो तसा असावा असें मानण्यास मात्र अंतर्गत पुरावा आहे. उद्योगपर्वाच्या आरंभीं त्याच्या भाषेवर मुक्तेश्वराची छाप उघड दिसते. शिवाय,

निवृत्ति ज्ञानदेव सोपान । मुक्ताई मुकुट तुका गहन ।
एकनाथ जनार्दन । मुक्तेश्वर नमियेला ॥ ३६ ॥

असें आरंभीं मुक्तेश्वराला नमनही त्यानें केलें आहे. शिवाय अध्यायाच्या शेवटीं अनेक ठिकाणीं मुक्तेश्वराप्रमाणें तो 'विश्वंभरा'ला नमन करतो.

चंद्रात्मज नांवाच्या कवीनेंही उद्योगपर्व रचिलें आहे. त्याचाही हेतु शुभानंदाप्रमाणें मुक्तेश्वरी महाभारताची पूर्तता करण्याचा असावा. आरंभीं निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुकुंद-मुनि, एकनाथ व मुक्तेश्वर अशा मराठी कवींना त्यानें नमन केलें आहे.[७]

मुक्तेश्वराचा महाभारताचा प्रयत्न अपूर्ण राहिला म्हणून तो पूर्ण करण्याकरितां श्रीधरानें पांडवप्रताप लिहिला असणें शक्य आहे. पण मुक्तेश्वराप्रमाणें मोठ्या प्रमाणावर बाकीचीं पर्वें लिहिल्यास हा संकल्प कदाचित् सिद्धीला जाणार नाहीं म्हणून त्यानें मुक्तेश्वराच्या पर्वांचा संक्षेप करून बाकीचा भारताचा भाग थोडक्यांत महाराष्ट्रापुढें ठेविला, असें वाटूं लागतें. " मूळ व्यासग्रंथाचें जसें मुक्तेश्वरी ग्रंथ हें सार तसेंच मुक्तेश्वरी पर्वाचें पांडवप्रतापांतील ३५ अध्याय हे सार होत,"[८] असें भावे म्हणतात, तर "श्रीधराचा पांडवप्रताप हा मुक्तेश्वरी भारताचा केवळ तर्जुमा आहे," असें पांगारकरांनीं स्पष्ट लिहिलें आहे.[९] श्रीधरानें मुक्तेश्वराच्या कल्पना, शब्द, इतकेंच काय पण चरण व किंचित फरकानें सबंध ओव्याच्या ओव्या आपल्या पांडवप्रतापांत समाविष्ट केलेल्या आढळतील. याचें कारण श्रीधराचें कल्पनादारिद्र्य हें खास नव्हे. पांडवप्रताप लिहिण्यापूर्वींच त्यानें हरिविजय व रामविजय हे ग्रंथ लिहून उत्कृष्ट ग्रंथकार या नात्यानें आपली योग्यता सिद्ध केली होती. मुक्तेश्वराचें महाभारत त्याच्यापुढें नसतें तरीही पांडवप्रताप कमी सरस उतरला असता असें वाटत नाहीं. नवलाची गोष्ट ही कीं, पांडवप्रतापांत त्यानें मुक्तेश्वराचा किंवा त्याच्या महा-भारताचा निर्देश मुळींच केलेला नाहीं. इतकेंच नव्हे तर,

ज्या मूळ भारतीं कथा । त्याच येथें लिहिल्या तत्त्वतां ।
प्राकृत कवींचे संमता । नाहीं कदा धरियेलें ॥

असेंही उलट स्पष्ट म्हटलें आहे.[१०] लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं रामविजयामध्यें तो मुक्तकंठानें मुक्तेश्वराची स्तुति करतो. पहाः—

---

७ भा. इ. सं. मं. षाण्मासिक वृत्त. शके १८३४ (आश्विन-फाल्गुन). पृ० १६८.
८ महाराष्ट्रसारस्वत, भा. २ रा, आवृत्ति ३ री, १९१८. पृ० १४३.
९ मराठी वाङ्मयाचा इतिहास—खं. २. पृ० ४७६.
१० पांडवप्रताप—अ. ६४, १८०.

जे चातुर्य राजधानीचे कळस । मुक्तेश्वर मुद्गलदास ।
ज्यांचे ग्रंथ पहातां सुरस । ब्रह्मानंद उचंबळे ॥[११]

'पांडवप्रताप' हें नांव देखील मुक्तेश्वराच्या आदिपर्वातील, "पांडवप्रताप पुरुष तरणा । नववधू कौरवसेना" (अ. ४४, १४४) या ओवीवरून श्रीधराला सुचलें असावें, असा कै. प्रो. चिं. नी. जोशी यांचा तर्क आहे.[१२] अशा स्थितींत हा मुक्तेश्वराचा पांडवप्रतापांतील अनुल्लेख विशेष जाणवतो.

मुक्तेश्वरानें अठराही पर्वें लिहिलीं होतीं; परंतु तीं व्यासापेक्षांही सरस ठरल्यामुळें मूळ भारताला मागें टाकतील म्हणून एकनाथानें तीं गंगेस अर्पण करावयास लाविलीं. पुढें मुक्तेश्वराला वाईट वाटून एकनाथाच्या सांगण्यावरून त्यानें तीं गंगेजवळ परत मागितलीं व गंगेनें चारच पर्वें त्याला परत दिलीं, अशी आख्यायिका आहे.[१३]

प्रत्यक्ष गंगेच्या जलप्रवाहापेक्षांही लोकगंगेचा प्रवाहच ज्यास्त घातक असतो. या लोकगंगेच्या प्रवाहांत सांपडून आतांपर्यंत किती वाङ्मय नष्ट झालें असेल याची कल्पनाही करतां येणार नाहीं.

मुक्तेश्वरी वाङ्मय मुद्रित स्वरूपांत प्रथम परशुरामपंत तात्यांच्या 'नवनीता'नें जगासमोर आणलें असावें, असें वाटतें. १८५४ सालच्या नवनीताच्या पहिल्या आवृत्तींत शकुंतलाख्यान व जरासंधवध हीं काव्यें प्रसिद्ध झालीं. पुढें माधव चंद्रोबांनीं 'सर्वसंग्रहा'मध्यें मुक्तेश्वरी आदिपर्व क्रमशः प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली व १८६५ सालीं हा ग्रंथ स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाला. याच छापील प्रतीच्या आधारावर १८९० सालापासून काव्यसंग्रहांत आदिपर्व क्रमशः प्रसिद्ध होऊं लागलें व १८९३ सालीं स्वतंत्र रूपानें हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. सर्वसंग्रहाच्या छापील प्रतीशिवाय काव्यसंग्रहकारांना पांडुरंग जोशी मोघे वसईकर यांच्याकडून आदिपर्वाची एक हस्तलिखित प्रत मिळाली होती. तिच्यांतील व पुढें मिळालेल्या आणखी एकाद्या प्रतींतील पाठांतरें ग्रंथाच्या शेवटीं काव्यसंग्रहकारांनीं दिलेलीं आढळतील.

'सर्वसंग्रहां'तील मुक्तेश्वरी आदिपर्वाच्या छापील प्रती लोकगंगेच्या प्रवाहांत वाहून दुर्भिळ झाल्या म्हणून काव्यसंग्रहकारांनीं नवी आवृत्ति छापिली. तीही दुर्मिळ झाल्यावर आदिपर्व छापण्याचा फिरून प्रयत्न कोणीच केला नाहीं ! १९२४ सालच्या मुंबई युनिव्हर्सिटीच्या बी. ए. च्या अभ्यासक्रमांत मुक्तेश्वरी आदिपर्व समाविष्ट करण्यांत आलें होतें. त्यावेळीं हें पुस्तक बाजारांत विकत मिळत नाहीं म्हणून विद्यार्थ्यांची ओरड पडली होती. यांपैकींच प्रस्तुत लेखकही होता. यावेळीं कै० डॉ. पां. दा. गुणे यांनीं आपल्या स्नेह्यामार्फत कोठूनतरी, बहुधा

---

११ **रामविजय**, अ. १, ९७.

१२ **श्रीधरः चरित्र आणि काव्यविवेचन**, १९५०. पृ. ३३९.

१३ **मुक्तेश्वरकृत वनपर्व** (काव्येतिहाससंग्रह), श. १८०१. 'मुक्तेश्वर', पृ. ३.

कोल्हापूराहून असावी, एक प्रत आणून दिली. हें काव्य आम्हां दोघांनाही फारच आवडलें व भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूटच्या संस्कृत महाभारताच्या धर्तीवर त्याची संशोधित आवृत्ति तयार करण्याचा आमचा दोघांचाही संकल्प ठरला. पण १९२३ सालीं दुर्दैवानें डॉ. गुणे वारले. पुढें 'विविधज्ञानविस्तारा'चें संपादकीय काम पाहात असतांना हें आदिपर्व शोधून 'विस्तारा'मध्यें क्रमशः प्रसिद्ध करण्याचा मीं विचार केला. 'विस्तारा'च्या अनेक लेखकांना व वाचकांना आदिपर्वाचीं हस्तलिखितें मिळवून देण्याची मीं विनंति केली. त्यावेळीं मजजवळ आदिपर्वाची छापील प्रत देखील नव्हती ! ती 'आनंद'कर्ते वासुदेव गोविंद आपटे यांनीं मला पुण्याहून आणून दिली. कै० नी. ब. भवाळकर यांनीं पुण्याच्या आनंदाश्रमांत आदिपर्वाची एक प्रत असल्याचें मला सांगितलें. मुद्दाम मी पुण्याला जाऊन पहातों तों ती त्रुटित प्रत—कांहीं पृष्ठेंच होतीं. पुढें चारपांच वर्षांमागें आदिपर्वाच्या दोन हस्तलिखित प्रती मला उपलब्ध झाल्या.

मुक्तेश्वरी वाङ्मयाचें संशोधन व्हावें, याबद्दल अनेकांना तळमळ लागून राहिली होती. "मुक्तेश्वराच्या काव्यांच्या जुनाट प्रती शोधून काढून मूळ शुद्ध पाठ जींत आहेत, अशी प्रत संपादिली पाहिजे, त्याव्यतिरिक्त मुक्तेश्वराचें प्रतिभावैभव आपल्या अनुभवास जसें यावें तसें येणें मुष्किल आहे," असें वि. का. राजवाडे यांनीं लिहिलें आहे.[१४] "प्रसिद्ध कवि मुक्तेश्वर याच्या भारताचें ऐतिहासिक दृष्ट्या परीक्षण अद्यापि झालेलें नाहीं. या कवीच्या भारताची संहिता आज छापील मिळते ती अनेक दृष्टींनीं सदोष आहे. याच्या काव्याच्या जुनाट प्रती मिळवून प्रमाण आवृत्ति काढणें अत्यंत आवश्यक आहे. महाराष्ट्रकविमुकुटमणि म्हणून याची शाब्दिक स्तुति पुष्कळांनीं केलेली आहे, परंतु अपपाठांनीं दूषित झालेलें याच्या काव्याचें विकृत स्वरूप पाहिलें म्हणजे मुसलमानांनीं छिन्न-भिन्न केलेल्या सुंदर प्राचीन मंदिराची आठवण होते," असें प्रो. द. वा. पोतदार लिहितात.[१५] आणखीही पुष्कळांनीं अशी सदिच्छा प्रकट केली असेल.

आरंभीं एकहि हस्तलिखित प्रत जेथें नव्हती तेथें या काव्याच्या आज सुमारें तीस हस्त-लिखित प्रती उपलब्ध झाल्या. यावरून ज्यावेळीं आह्मी साधनें नाहींत म्हणून एकाद्या कारणा-करितां अडून बसतों त्यावेळीं तो पुष्कळ वेळां आपला अंगचोरपणा किंवा कामचुकारपणा असतो, असें वाटूं लागतें. 'सत्य संकल्पाचा दाता भगवान', हें विसरतां येत नाहीं.

हीं हस्तालिखितें कोठें मिळालीं त्याची स्थळवार नोंद पुढीलप्रमाणें आहेः—मुंबई २, पुणें ६, राजापूर ३, गोमंतक ३, तंजावर ४, औंध २, धुळें ३, सोलापूर १, नागपूर १, नांदेड १, मोमिनाबाद १, नासिक १ व नगर १. ब्रिटिश म्युझियममध्येंही मुक्तेश्वराच्या आदिपर्वाची एक हस्तलिखित प्रत आहे. Add. 26,508 ] तेथील मराठी हस्तलिखि-तांच्या कॅटलागांत तिचे जे उतारे दिले आहेत त्यांच्यावरून ती खालीं वर्णिलेल्या ख वर्गांतीलच

१४ भा. इ. सं. मं. इतिवृत्त, शके १८३६. पृ ४५.

१५ भा. इ. सं. मं. त्रैमासिक वर्ष २३. पृ. ९४–९५.

दिसली. पाठदृष्ट्या विशेष महत्त्वाची न वाटल्यावरून तिची microfilm नक्कल आणण्याची आवश्यकता भासली नाहीं. इंडिया ऑफिसच्या हस्तलिखित संग्रहांतही (नं.३४) आदिपर्वाची एक प्रत आहे. अलिकडे अलिबाग येथें रा. न. ह. जोशी यांच्या संग्रहीं मला आणखी एक त्रुटित प्रत मिळाली. वरील एकोणतीस हस्तलिखितांपैकीं बऱ्याचशांची पूर्णपणें व कांहींच्या कांहीं अध्यायांची पाठनोंदणी केली. निर्णयसागरी प्रत vulgate कल्पून वरील हस्तलिखितांपैकीं प्रातिनिधिक व निर्दिष्टकाल अशीं अकरा निवडून त्यांच्या आधारानें पुढील बारा अध्यायांची संहिता निश्चित केली आहे व पाठांतरें दिलीं आहेत. त्यांची बोधाक्षरांसह (sigla) थोडक्यांत माहिती खालीं देत आहें.

## छापील प्रती.

(१) **नि**—काव्यसंग्रहमालेंत वा. दा. ओक यांनीं संपादिलेली **निर्णयसागरप्रत** (vulgate), मुंबई १८९३. (निपा. वरील प्रतीच्या शेवटीं दिलेला पाठ).

(२) **स**—माधव चंद्रोबा यांनीं संपादिलेली **सर्वसंग्रह** प्रत, मुंबई, १८६५.

## हस्तलिखितें.

(१) **आ**—**औं**ध येथील कै. श्री. भवानराव पंडित प्रतिनिधि यांजकडून मिळालेली पोथी. शेवटचें पान अतिशय जीर्ण आहे. त्यावर "शके १६९२ विकृतिनामसंवत्सर++ रविवारीं लेखन संपूर्ण," असा शेरा आहे. (औंध संग्रहांतील दुसरी प्रत औं२.)

(२) **ख**—मुंबईचे बुकसेलर तुकाराम पुंडलीक शेट्ये यांजकडून मिळालेली पोथी. या प्रतीच्या शेवटीं,

"तेंचि हें आदिपर्व समस्त । काळिदास गंगाधरसुत ।
सखाराम स्वहस्तें लिखित । परोपकारार्थ पूर्ण केलें ॥
शके सोळाशें ऐकाअसि । शुक्र सप्तमी माघमासीं ।
प्रमाथि संवत्सरासी । **खट्वांगग्रामीं** समाप्त केलें ॥" असा मजकूर आहे.

(३) **गो**—**गो**मंतकांत कै. व्यंकटेश शा. दळवी यांच्याकडून मिळालेली पोथी. अतिशय जीर्ण. लेखनकाल नमूद नाहीं.

(४) **गो२**—**गो**मंतकांतील दुसरी प्रत. श्री. गावणेकरांकडून मिळालेली. अलीकडे पाउणशें वर्षांमागें लिहिलेली असावी. पोर्तुगाली निळसर कागद. लेखनकाल नमूद नाहीं. (याशिवाय गोव्यांत तिसरी प्रत मिळाली ती गो३).

(५) **तं**—**तं**जावर येथील सरस्वतीमहाल ग्रंथसंग्रहालयांतील क्रमांक १३७२ ची हस्तलिखित पोथी. तिची तिकडून नक्कल करवून आणिली. हिच्यावर लेखनकाल किंवा लेखक यांचा निर्देश नाहीं. (या प्रतीखेरीज आणखी तिकडे आदिपर्वाच्या तीन पोथ्या आहेत. त्यांचीं बोधाक्षरें तं२ तं३ तं४. या प्रतींतील पहिला, पंधरा व सोळा या अध्यायांच्या नकला आणल्या.)

( ६ ) **धु—धुळें** येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील क्रमांक ९६० ची हस्तलिखित पोथी. लेखनकाल–"शके १६७६ भावनामसंवत्सरे भाद्रपदमासे शुक्लपक्षे त्रयोदशी भृगुवासरे." (याच संग्रहांतील क्रमांक ९९३ प्रत धुर हिचा लेखनकाल १६८७ आहे. याशिवाय राजवाडे संशोधनमंडळांतील प्रत धु३ ).

( ७ ) **नां—नां**देडचे श्री. वि. अं. कानोले यांजकडून मिळालेली प्रत. हिचा लेखक त्र्यंबकात्मज सुब्रह्मण्य असून तिला जोडून असलेल्या सभापर्वाचा लेखनकाल शके १६७४ हा आहे.

( ८ ) **पु—पुणें** येथील भारत इतिहाससंशोधकमंडळ–ना. य. मिरीकर हस्तलिखित-संग्रहांतील नं. $\frac{१७६}{१३}$ हस्तलिखित पोथी. शेवटीं,

"१६८४ चित्रभाननामसंवत्सरे भाद्रपद मासे कृष्णपक्षे त्रयोदशी गुरुवासरे तद्दीने लेखन समाप्त. हस्ताक्षर कानेरनाथांकित नागो व्येंकटेश गोदातीर कटहली वस्ती मांडवगणक्षेत्र सिद्धेश्वर सान्निधौ लेखनसमाप्त ॥ ६ ॥" असा मजकूर आहे.

( भा. इ. सं. मं. च्या आणखी दोन प्रती मिळाल्या त्यांचीं बोधाक्षरें पु२ पु३ ).

( ९ ) **पु४—पुणें** येथील डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट अँड रिसर्च इन्स्टिटयूटमधील पोथी. A. N. 6862. लेखनकाल श. १६८८ व्यय नाम संवत्सर ज्येष्ठ कृष्ण द्वादशी गुरुवासर–लेखक लक्ष्मण गोपाळ ज्योतिषी व कुळकर्णी, बाहुलें व मरळी माहाल प्रांत कऱ्हाड. कागद वॉटरमार्क असलेला विलायती. ( या संग्रहांतून आणखी मिळालेल्या प्रती पु५, पु६. )

(१०) **मुं—मुं**बई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील बांधलेलें पुस्तक."*Balcrishna Wafsoodewji*, Bombay 27th May ( वर्ष अस्पष्ट ) " असा पेन्सिलीनें लिहिलेला मजकूर आहे वॉटरमार्क असलेला परदेशी कागद. १८५० पूर्वीची ही प्रत असावी.

( ११ ) **रा—रा**जापूरच्या संस्कृतपाठशाळेंतून पंडित रघुनाथ कृष्णशास्त्री पाटणकर यांकडून मिळालेली पोथी. हिच्या शेवटीं, "शके १७०६ क्रो++वत्सरे भाद्रपद वद्य प्रतिपदा मंगळवारीं दोन प्रहरीं ग्रंथ स++आबाजीपंत यांनीं लिहिविला हस्ताक्षर राघो पांडुरंग," असा मजकूर आहे. (याशिवाय या संग्रहांतून आणखी दोन प्रती मिळाल्या. रा२, रा३.)

या ज्या आधारभूत प्रती वर दिल्या आहेत त्यांचा परस्परसंबंध काय तें पाहूं. **नि** प्रत **स** वर आधारलेली असून आधुनिक लेखनपद्धतीस अनुसरून तिच्यामध्यें फेरफार केलेले आहेत.

वरील हस्तलिखितांचे त्यांच्या आपसांतील परस्परसाम्यावरून दोन वर्ग पाडतां येतील :

मूळ

(१) (२)

नां नि पु४ तं रा धु

ख मुं औं पु (स) गो गो१

या वर्गांपैकीं दुसऱ्या वर्गांतील पाठ विशेष जास्त ग्राह्य आहेत, असें दिसून आलें. पहिल्या वर्गाला **खवर्ग** असें नांव देण्यांत आलेलें आहे. पु४ ही प्रत जुनी असून पहिल्या ख वर्गांत असली तरी दुसऱ्या वर्गाशीं तिचे कांहीं पाठ जुळतात. ज्यांचा प्रत्यक्ष उपयोग केलेला नाहीं अशा इतर प्रती म्हणजे तंजावरच्या तीन ( तं२, तं३, तं४ ), राजापूरच्या दोन दुसरी ( रा२, रा३), धुळयाची दुसरी ( धु२ ) आणि गोमंतकांतील तिसरी ( गो३ ) या दुसऱ्या वर्गांतील, व बाकीच्या सर्व औं२ पु२ पु३ पु५ पु६ धु३ सोलापूर, नागपूर, मोमिनाबाद, नासिक आणि नगर या पहिल्या म्हणजे ख वर्गांतील आहेत.

आदिपर्वाच्या शेवटच्या खंडाच्या प्रस्तावनेंत चिकित्सासाधनें व पाठचिकित्सा यांच्यासंबंधीं यथावकाश जास्त विस्तृतपणें ऊहापोह करण्यांत येईल. प्रस्तुत प्रास्ताविक चार शब्द या खंडापुरते आहेत.

नव्या पाठचिकित्साशास्त्राची नव्यानें माहिती करून देण्याचें आज विशेष कारण राहिलें आहे असें वाटत नाहीं. पंधरा वर्षांमागें 'दमयंतीस्वयंवराच्या' आवृत्तीमध्यें मीं त्याचा उगम व विकास कसा झाला व त्याचीं तत्त्वें कोणतीं याचा सांगोपांग पण थोडक्यांत सोदाहरण परिचय करून दिलेलाच आहे.[१६] अलीकडे डॉ. सु. मं. कत्रे यांनीं तर या विषयावर इंग्रजी भाषेमध्यें स्वतंत्र चांगलें पुस्तकच लिहिलें आहे.[१७]

नव्या पाठचिकित्साशास्त्राचा आरंभ ग्रीक व लॅटिन ग्रंथांचें शुद्धीकरण करण्याच्या प्रयत्नांत झाला. याच पद्धतीवर पुढें संस्कृत ग्रंथांचें शुद्धीकरण व संपादन होऊं लागलें. परंतु ग्रीक, लॅटिन, संस्कृत यांच्या पाठचिकित्साशास्त्राचीं तत्त्वें सामान्यतः एकच असलीं तरी तीं जशाचीं तशीं मराठी ग्रंथांना लागू करतां येत नाहींत. मराठीमध्यें संशोधन करतांना निराळेच प्रश्न उपस्थित होतात. मराठीमध्यें जसजसे जास्त जास्त संशोधनात्मक प्रयत्न होत जातील तसतसें मराठीचें पाठचिकित्साशास्त्र तयार होणार आहे. आज हें शास्त्र केवळ प्रयोगावस्थेमध्यें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

अर्थाच्या दृष्टीनें सुबोध, काव्याच्या दृष्टीनें सरस व आजच्या व्याकरणाच्या कल्पनांप्रमाणें शुद्ध असा जो पाठ तो ग्राह्य ही आपली जुनी कल्पना; परंतु हस्तलिखितांच्या पुराव्यावरून जो पाठ कवीच्या हातचा किंवा त्याच्या काळचा असें ठरेल तोच खरा. जुना पाठ अपरिचित म्हणून किंवा आजच्या लेखनपद्धतीला किंवा आजच्या व्याकरणाला धरून नाहीं म्हणून तो बदलणें अशास्त्रीय आहे. हें धोरण लक्षांत ठेवलें म्हणजे आदिपर्वाची पुढील संहिता वाचतांना वाचकांना गोंधळल्यासारखें होणार नाहीं. माधव चंद्रोबांनीं ज्यावेळीं हें काव्य 'सर्वसंग्रह' मासिकांत प्रथम प्रसिद्ध केलें त्यावेळीं मूळाबरहुकूम छापण्याची थोडीबहुत काळजी घेतली होती; परंतु वा. दा. ओक यांनीं संस्कार करून निर्णयसागर ( काव्यसंग्रह ) प्रत तयार केली आहे.

---

१६ **रघुनाथपंडितविरचित दमयंतीस्वयंवर. १९३५.**

१७ **Introduction to Indian Textual Criticism, 1941.**

एकादें जुनें संस्कृत काव्य छापतांना हा भाषेच्या रूपांचा प्रश्न तेवढासा जाचक होत नाहीं. कारण संस्कृत भाषेला पाणिनीनें केव्हांच स्थैर्य प्राप्त करून दिलें आहे. पण मराठीचा पाणिनि अद्याप जन्माला यावयाचा होता. मराठीचें सर्वसंमत असें व्याकरण तयार झालें नव्हतें. जो जसा उच्चार करी तसें तो लिही. कोणी तत्सम शब्द लिहीत तर कोणी तत्कालीं रूढ असलेलीं त्यांचीं विविध अपभ्रष्ट रूपें किंवा तद्भव शब्द वापरीत, किंवा एकच माणूस लहरीप्रमाणें तत्सम व त्यांचींच निरनिराळीं तद्भव रूपें योजी, असें हस्तलिखितांवरून दिसून येतें. अशा वेळीं यांपैकीं कोणतें रूप संशोधित संहितेमध्यें स्वीकारावें याचें कोडेंच पडतें. उदाहरण : 'गृहस्थ' हा शब्द जुन्या हस्तलिखितांत (पुढें अध्याय २, ओ० ३२, टी०३ पहा) ग्रहस्त, गृहस्त, ग्रहस्थ व गृहस्थ अशा नानाप्रकारें लिहिलेला आढळतो. यांपैकीं शेवटचें रूप नि रा तं यांमध्यें आहे. नि ही छापील संस्कारयुक्त प्रत आहे. तं ही नक्कल असल्यामुळें लेखकाच्या हातून नक्कल करतांना नकळत आधुनिकीकरण झालेलें आहे, अशी शंका आली. केवळ रा या जुन्या प्रतीमध्यें तत्सम रूप आढळलें. पाठांतराकरितां जरी कांहीं प्रती निवडल्या असल्या तरी पाठनिश्चिति करतांना इतर हस्तलिखितांतील पाठांतरें विचारांत घेतलीं आहेत. 'ग्रहस्त' हा शब्द आजच्या दृष्टीनें जरी अशुद्ध असला तरी गेल्या शतकाच्या मध्यापर्यंत शुद्ध मानला जात होता. ता. १२ फेब्रुवारी १८४९ रोजीं प्रसिद्ध झालेल्या 'ज्ञानप्रकाशा'च्या पहिल्या अंकांतही संपादकीय 'प्रस्तावने'त तो वापरलेला आढळतो. १८५७ सालच्या मोल्स्वर्थच्या शब्दकोशांतही अशा स्वरूपांत तो दिलेला आहे. आणखी एक असा शब्द सांगतों:- संमंध हा शब्द आह्मीं आज भूत-पिशाच या अर्थी योजतों; परंतु जुन्या काळीं 'संबंध' या अर्थी तो सरसकट रूढ होता. अशा शब्दांचें लेखन मीं जुनेंच ठेवलें आहे. चालू शुद्ध-लेखनाप्रमाणें बदलून घेतलें नाहीं. ज्या शब्दांचीं रूपें वैकल्पिक होतीं असें वाटलें तीं दोनही प्रकारें दिलीं आहेत. उदाहरणार्थ रुत्विज-ऋत्विज, रुषि-ऋषि, पुष्टी-पृष्टी, वग्त्र-वक्त्र, युक्ष-इक्षु, रुतु-ऋतु.

आजच्या दृष्टीनें चुकीचीं पण जुन्या काळीं प्रचारांत असलेलीं जगदेश्वर ( ४·८६ ), ऋषेश्वर ( ७·५० ) अशीं संधीचीं रूपेंही तशींच ठेविलीं आहेत. स्वतः 'मुक्तेश्वर' हें रूप आजच्या व्याकरणशुद्धतेच्या दृष्टीनें 'मुक्तीश्वर' असेंच असावयास नको काय ? अल्पप्राण व महाप्राण अशा अक्षरांची अदलाबदल जुन्या काळीं फार आढळे. त्यामुळें अस्ती ( अस्थि ), गुसळणें ( घुसळणें ), शफत ( शपथ ), असे शब्द मान्य करावे लागले. मागें 'न' आला असतां पुढील क्रियापदाच्या सुरुवातीच्या अक्षरांतील 'आ' स्वर 'अ' लिहिण्याचा जुन्याकाळीं प्रघात असे. त्याचा भंग केला नाहीं. उदा० न मनी ( मानी १·१५० ), न संगत ( २·५५ ), न टके ( ८·७७ ), न घलीं ( २·७६ ), न पवे ( २·९ ), न वटे ( २·८४ ). श बद्दल स उच्चारण्याची जुन्या काळीं विशेष प्रवृत्ति होती:-सके ( शके ), सिखरीं ( शिखरीं ),

सीण, सीघ्र, सिर, क्षमासीळ. पण याच्या उलट, सृष्टीबद्दल श्रष्टि लिहिण्याची पद्धति दिसली. (१·४)

विशेषनामेंही संस्कृताप्रमाणें न देतां अपभ्रष्ट स्वरूपांत जुन्या काळीं उच्चारिलीं व लिहिलीं जात. उदा०—जन्मेजय, जन्मोजय (जनमेजय), वासुगि (वासुकि), पंडु (पांडु), प्रमिती (प्रमति), मेनिका (मेनका), चवन (च्यवन), अभिमन्य (अभिमन्यु), पातांजळ (पतंजलि), जयमिनि जयमुनि (जैमिनी), मोहनी (मोहिनी), पुष्य (पौष्य). तीं तशींच किंवा वैकल्पिक रीतीनें दिलीं आहेत. दोन ठिकाणीं मूळ महाभारता-प्रमाणें संस्करण केलें, संजय (१-१७४) आणि श्वेत्य (१-१७६). तेंही करावयास नको होतें, असें छापून झाल्यावर वाटलें.

मूळ संस्कृत महाभारताप्रमाणें कांहीं विशेषनामें किंवा शब्द फिरवून घेणेंही बरोबर नाहीं; कारण आपल्यापुढें जी संस्कृत महाभारताची संहिता आहे तीच मुक्तेश्वराजवळ होती, असें म्हणतां येणार नाहीं. उदाहरणार्थ सातव्या अध्यायाच्या आरंभीं पन्नगसत्रांत सर्प पडले त्यांचीं नांवें दिलीं आहेत तीं सारीं महाभारताच्या नीलकंठी संहितेबरहुकूम आहेत असें नाहीं.

हस्तलिखितांतील प्रत्येक क्षुल्लक फरक पाठांतर म्हणून नमूद केल्यास अनवस्थाप्रसंगच ओढवेल ! नक्कलकाराच्या ज्या उघड चुका किंवा हस्तदोष दिसले त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें आहे; पण कांहीं अर्थशून्य पाठही शुद्ध पाठ ठरविण्यास उपयोगीं पडतील म्हणून नमूद केले आहेत. ऱ्हस्व दीर्घ, किंवा 'अंग–आंग' तसेंच 'जोडूनि–जोडोनि' अशांसारखीं वैकल्पिक रूपें पाठांतरें म्हणून नमूद केलीं नाहींत. कांहीं हस्तलिखितांमध्यें अ च्या जागीं निष्कारण आ लिहिला जातो. उदा०आभय (अभय), आवगुण (अवगुण), आखंड (अखंड). अशी प्रवृत्ति पु४ मध्यें फार दिसली. याच्या उलट ख मध्यें आ बद्दल अ लिहिण्याची खोड आहे. उदा० अदरें (आदरें), अज्ञा (आज्ञा), अला (आला), अश्रम (आश्रम). य, श, च, ज, क्ष, बद्दल अनुक्रमें ये (नयेन), शे (शेरण), चे (चेरण), जे (दुर्जेय), क्षे (क्षेमा), उच्चारण्या-कडे ओढा कांहीं लेखक दाखवितात. अनुस्वारासंबंधीं तर अराजकच दिसेल. तंव, तव, तवं, तंवं अशा विविधप्रकारें एकच शब्द लिहिलेला आढळतो. विशेष प्रवृत्ति तवं लिहिण्याकडे दिसली तोच मान्य केला. असें रूप लिहिण्याकडे प्रवृत्ति जुन्या काळीं होती, असें राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरीवरूनही दिसेल. लावंण्य, कंन्या, अरंण्य असे अनुस्वार क्वचित् दाखविले जातात तेही पाठांतरें म्हणून नमूद केले नाहींत.

(१) "देहबुद्धीचा हातीं" (१·५४), (२) "स्नेहाच्या बाहुवटीं" (२·५०), (३) "जोडल्या हस्तीं" (७·१०८) अशा सारख्या शब्दांच्या जोड्यांत (१) 'देहबुद्धींचां', (२) 'स्नेहाचां', (३) 'जोडलां' अशीं सानुस्वाररूपें पाहिजेत असें दिसतें. सप्तमी विभक्तीमध्यें विशेष्य असलें म्हणजे आधीच्या विशेषणात्मक शब्दाच्या अंत्याक्षरावर सप्तमी विभक्तीचा अनुस्वार देण्याची यादवकालीन पद्धति होती. ती

मुक्तेश्वरकालींही प्रचलित असावी. पुढील लेखकांनीं अनुस्वार गाळलेला दिसतो. च किंवा ज या मराठी दंततालव्य वर्णाचा उच्चार संस्कृताप्रमाणें च्य किंवा ज्य असा तालव्य केलेला एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील मुद्रित ग्रंथांतही आढळतो. 'देहबुद्धींचां हातीं' यांतील 'चा' वरील अनुस्वार गळला तरी 'च' च्य असा वाचल्यामुळें गैरसोय दूर झाली. या ठिकाणीं चावर अनुस्वार देऊन संस्करण करणें मला गैर वाटलें म्हणून आधुनिक रूपें स्वीकारली. तरीपण अशा स्थळांकडे मीं वाचकांचें ठिकठिकाणीं टीपांमध्यें लक्ष वेधलेलें आहे.

प्रस्थापित संहितेमध्यें स्वीकारलेले इछा, स्वछ, कछप, पुछ, आछादणें असे शब्द इच्छा, स्वच्छ, कच्छप, पुच्छ, आच्छादणें असे द्वित्वयुक्त अलिकडे लिहिले जातात, आणि तसा संस्कार करूनच नि मध्यें ते छापले आहेत; परंतु आरंभींच्या मुद्रित ग्रंथांमध्येंदेखील ते प्रस्थापित संहितेप्रमाणें प्रायः दिलेले आढळतील. उच्चैःश्रवा, हाहाःकार अशासारख्या शब्दांत जुन्या काळीं विसर्ग दण्याची प्रथा नव्हती. नि मध्यें याही बाबतींत आधुनिकीकरण केलें आहे. अशीं पाठांतरें प्रत्येक ठिकाणीं नमूद केलींच आहेत, असें नाहीं. पहिल्या अध्यायाचीं नमनाचीं पाठांतरें दिलीं आहेत, परंतु पुढील अध्यायांचीं विस्तारभयास्तव गाळलीं आहेत. अध्यायाच्या शेवटचा अध्यायनाम वगैरे सांगणारा प्रायः अशुद्ध संस्कृतांत आढळणारा मजकूरही गाळला आहे.

हीं जीं वर कांहीं उदाहरणें दिलीं त्यावरून माझें सर्वसामान्य धोरण वाचकांना कळून येईल. शास्त्र व व्यवहार यांची शक्यतोंवर सांगड घालण्याचा माझा प्रयत्न आहे. यानें एकांतिक शास्त्रवादी व एकांतिक व्यवहारवादी यांना संतोष झाला तर मला आनंदच होईल; परंतु त्यांचें समाधान झालें नाहीं तर मला नवल वाटणार नाहीं.

भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूटच्या कामाला १९१९ सालीं सुरुवात करून नमुन्यादाखल ( Tentative Edition ) म्हणून विराटपर्वाची प्रत शोधून १९२३ सालीं प्रसिद्ध केली. त्यावर जगांतील मोठमोठ्या विद्वानांचीं मतें मिळवून 'महाभारता'च्या आदिपर्वाच्या कामाला सुरुवात केली. इतकें असूनही संपादक डॉ. वि. स. सुखटणकर आदिपर्वाच्या पहिल्या खंडाच्या ( १९२७ ) आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात,

"...that in these circumstances the editor will occasionally make mistakes—at times perhaps gross mistakes—is as certain as inevitable; for it is to be feared that there is no royal road to success in this incomparably difficult field... More than one attempt will probably have to be made before the ideal is attained. It will, therefore, be prudent not to expect too much from the *first* critical edition, nor to claim too much for it."

डॉ. सुखटणकरांसारख्या ' बलवदपि शिक्षितावा ' हा ' आत्मन्यप्रत्यय ' पाहिला म्हणजे सर्वतोपरी प्रतिकूल परिस्थितींत काम करणाऱ्या माझ्यासारख्याची काय मनःस्थिति असेल याची कोणालाही सहज कल्पना करतां येईल. समग्र आदिपर्वाची संहिता निश्चित झाल्यावरच मुद्रणाच्या कामाला हात घालणें योग्य झालें असतें; परंतु तसें करण्यांत अनेक धोके दिसले. पालि टेक्स्ट सोसायटीच्या पालि-इंग्लिश डिक्शनरीच्या पश्चात्कथनाच्या (Afterword) उपसंहारांत, " Better now and imperfect than perfect and perhaps never, " हा Dr. William Stede यांनीं दिलेला इशारा वाचला आणि ' गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् ' असें म्हणून तयार असलेल्या अध्यायांची ' कॉपी ' सरळ छापखान्यांत जाऊन मुद्रकाच्या स्वाधीन केली ! यांत कांहीं दोष राहिले असतील ते दुसऱ्या आवृत्तींत मीच किंवा माझ्या जागीं येणारा दुसरा संपादक काढून टाकील.

पाठांतरें देतांना निरनिराळ्या हस्तलिखितांचीं बोधाक्षरें वर दिलेलींच आहेत. पु पु४ किंवा गो गो२ अशा दोन हस्तलिखितांत तोच पाठ असल्यास तीं अनुक्रमें पु·४ व गो·२ असीं दाखविलीं आहेत. ( + ) खूण आहे तो अधिक पाठ व ( – ) खूण आहे तो कमी पाठ समजावा. कसरीनें खाल्ल्यामुळें किंवा अन्य कारणानें एकादा पाठ दुर्वाच्य किंवा नष्ट झाला असल्यास तो ( × × ) अशी खूण दाखवून निर्दिष्ट केला आहे. प्रक्षिप्त वाटलेल्या ओव्या तळटीपांत पाठांतरांबरोबर दाखविल्या आहेत. आधार देतांना ' वरचाच ग्रंथ पहा ' हें " तत्रैव " ( *Ibid.* ) या शब्दांनीं नमूद केलें आहे व तुलना करा ( *Cf.* ) असें सांगण्यासाठीं ' तुळा ' असें लिहिलें आहे. ' प्रसंप्रा ' याचा अर्थ ' प्रस्थापित संहिते-प्रमाणें ' असा समजावा.

विद्वान् तज्ज्ञ वाचकांप्रमाणें या ग्रंथाचा उपयोग सर्वसामान्य वाचकांनाही व्हावा असा हेतु आहे. त्यामुळें प्रस्थापित संहितेमध्यें स्वीकारलेल्या शंकास्पद पाठांच्या खालीं डॉ. सुख-टणकरांनीं दिल्याप्रमाणें ' लहरी रेघा ' ( wavy lines ) दिल्या नाहींत. त्यांमुळें सामान्य वाचक गोंधळांत पडतो, असें कांहीं मित्रांचें म्हणणे पडलें. पाठांतरें देण्याची पद्धतीही सर्व-सामान्य वाचक बुचकळ्यांत पडणार नाहीं, अशीच स्वीकारलेली आहे. विस्तारभयास्तव साम्यस्थळें, संदर्भ, व्युत्पत्ति वगैरे गोष्टी निर्दिष्ट करणाऱ्या टीपा देतां आल्या नाहींत. सबंध आदिपर्व छापून झाल्यावर हा प्रयत्न हातीं घेतां येईल. शेवटीं शब्दकोश जोडला आहे त्यानें सामान्य वाचकाची गरज भागेल अशी आशा वाटते.

## आणखी नवी माहिती

या ग्रंथांत जोडलेल्या ' श्री मुक्तेश्वराचा शोध ' या निबंधांत हिंदुस्थानांत निरनिराळ्या भागांमध्यें सांपडणाऱ्या श्री मुक्तेश्वराच्या देवालयांची माहिती दिली आहे ( पृ. २१–२४ ) तिच्यामध्यें आणखी थोडीशी भर घालतों. गोविंद बाबाजी जोशी नांवाच्या एका गृहस्थानें " गेल्या तीस वर्षांचे पूर्वीचे लोक व त्यांच्या समजुती अर्थात् माझे प्रवासाची हकीकत " या

नांवाचा एक ग्रंथ प्रसिद्ध केला आहे ( १८९६ ) त्यांत अमदाबाद येथेंही **ऋणमुक्तेश्वराचें** एक देवालय असल्याचें नमूद केलें आहे ( पृ० ३२१ पहा ). तसेंच उपरिनिर्दिष्ट निबंधाच्या २२ व्या पृष्ठावर मुक्तेश्वरानें अध्यार्या ११ मध्यें,

**प्रत्यक्ष कासीविश्वेश्वर । स्वल्पाकृति मान्य थोर ।**
**विशाळ तिळभांडेश्वर । कोणें प्रथम वंदिजे ॥ १०९ ॥**

असा ज्या तिळभांडेश्वराचा निर्देश केला आहे तो उज्जयिनीचा असावा, असें मीं मत प्रदर्शित केलें आहे. पण आतां पुढें आलेल्या माहितीवरून तें बदलावें लागेल. कारण उज्ज-यिनीचा तिळभांडेश्वर माझ्या विनंतीवरून समक्ष पाहून त्याचें वर्णन प्रो. बा. ना. मुंडी आपल्या ५–८–५१ च्या पत्रांत देतात तें असें:–" याचें येथील नांव " तिलकेश्वर " असें सगळे म्हणतात. हें फार मोठें मंदिर आहे. पण **लिंग फारच लहान आहे**. पण तें replaced असावें, असें नंदीवरून वाटतें. उंच ओव्यावर ( सुमारें तीन हात उंच ) मोठा नंदी आहे तर लिंग एक दीड हातच उंच व अर्धा हात घेराची खोली आहे. " मुक्तेश्वरवर्णित हा तिळभांडे-श्वर नासिकचा असावा. नासिक गॅझेटियरमध्यें त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें सांपडतें—

" About fifty yards south–west of Gondeshvar's and Krishneshvar's and about 500 feet west of the river-bank, stands the temple of Tilbhandeshvar... The *ling* is a plain stone pillar two feet high and five feet round. It is the largest *ling* in Násik. It owes its name to a story that every year it grows the length of a grain of sesamum or *til*."[१८]

या वर्णनावरून मुक्तेश्वरानें पाहिलेला तिळभांडेश्वर नासिकचा असावा, असें वाटूं लागतें. या कवीनें ज्या श्रीमुक्तेश्वराचें मुद्रानाम धारण केलें तो हा नासिकचाच मुक्तेश्वर नसेल ना ? उपरिनिर्दिष्ट निबंधाच्या ७ व्या पृष्ठावर तेरवाड येथें " कवि मुक्तेश्वराची समाधि " असल्याचें नमूद आहे. पण तेथें ' समाधी 'च्या जागीं " दहनभूमी " असा शब्द योजणें बरोबर होईल. कारण मुक्तश्वरानें संन्यास घेतलेला नमूद नाहीं. सध्यां दहनभूमीवर वृंदावनही नाहीं. गेल्या महिन्यांत तेरवाडला गेलों असतां श्री दत्तात्रेयाच्या देवळापुढें ज्या ठिकाणीं ' वृंदावन ' होतें ती जागा मला कवीचे सध्यांचें वंशज रा. मुक्तेश्वर तेरवाडकर यांनीं दाख-विली व तेथें लवकरच नवें वृंदावन बांधणार असल्याचें सांगितलें.

---

१८ **Gazetteer, Vol XVI, Nasik, 1883. p. 509.**

# आभार

संशोधनसमितीचे अध्यक्ष महामहोपाध्याय डॉ. पां. वा. काण व इतर सभासद यांनी माझ्यावर विश्वास टाकला व अनेक अडचणींच्या प्रसंगीं योग्य सल्ला, धीर व उत्साह दिला. पाठनिश्चिति करतांना धोरण कोणतें ठेवावें, यासंबंधीं प्रो. ह. दा. वेलणकरांशीं झालेल्या चर्चेचा पुष्कळ उपयोग झाला. तसेंच अनेक संस्थांनीं व मित्रांनीं हस्तलिखितें देऊन व इतर प्रकारें हा ग्रंथ पुढें आणण्यास मदत केली. या सर्वांबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याची संधि मला शेवटच्या खंडाच्या वेळीं मिळणारच आहे. परंतु केवळ याच खंडाच्या प्रकाशनाच्या खर्चा-करितां म्हणून मुंबईविद्यापीठानें ७५० रुपयांची देणगी दिली, याबद्दल मी मुंबईविद्यापीठाचा अत्यंत आभारी आहें. पुढील खंडांसही त्यांच्याकडून असाच आश्रय मिळेल अशी मी आशा बाळगितों.

मुंबईसरकार व मुंबईविद्यापीठ यांच्याप्रमाणेंच मराठी भाषिकांचीं जीं इतर सरकारें व विद्यापीठें आहेत त्यांच्याकडूनही मराठी संशोधनमंडळाला मदत मिळणें योग्य आहे. मराठी संशोधनमंडळाचें कार्यालय जरी मुंबईशहरांत असलें, तरीपण तें करीत असलेलें कार्य साऱ्या मराठी भाषिकांकरितां आहे. बृहन्महाराष्ट्रांतील इतर संस्थांनीं व व्यक्तींनींही या कार्याला आपल्या शक्त्यनुसार हातभार लावणें त्यांचें कर्तव्यच ठरतें. हें आपलें कर्तव्य सर्वांनीं जाणलें तर मुक्तेश्वराचीं उपलब्ध पांचही पर्वें शुद्ध स्वरूपांत आम्हीं प्रसिद्ध करूंच; इतकेंच नव्हे तर म. म. पोतदार यांनीं मागें[१९] सुचविल्याप्रमाणें इतर मराठी कवींचीं निवडक पर्वें त्यांना जोडून **चक्री महाभारत** महाराष्ट्राला सादर करणें आम्हांला शक्य होईल. याशिवाय कितीतरी अप्रकाशित काव्यांचें प्रसिद्धीकरण व पैशाच्या अभावीं अडून राहिलेले इतर बहुविध संकल्प आम्हांला तडीला नेतां येतील.

आपले पंतप्रधान व शिक्षणमंत्री श्रीयुत बाळासाहेब खेर यांनीं आपल्या बहुविध कार्यांतून वेळ काढून पुरस्कार लिहून दिला हे आमच्यावर त्यांचे मोठेच उपकार होत.

या पुस्तकाला जोडलेला "मुक्तेश्वराचा शोध" हा निबंध श्री. पु. मं. लाड (I.C.S.) यांच्या अध्यक्षतेखालीं ता. १९ नोव्हेंबर १९५० रोजीं मराठी संशोधनमंडळाच्या मासिक सभेंत वाचला गेला होता. श्रीयुत लाड संशोधनमंडळाच्या कार्यांत अत्यंत आपुलकीनें लक्ष घालतात, हें नमूद करण्यास मला आनंद वाटतो.

---

१९ भा. इ. सं. मं. (त्रैमासिक), वर्ष ११, पृ. २५.

आमच्या संशोधनमंडळाच्या कल्पनेचे मूळ 'योजक' श्री. चिं. द्वा. देशमुख यांच्या व न्या. मू. ग. स. राजाध्यक्ष यांच्या कृपेमुळें, मराठी संशोधनमंडळाच्या प्रकाशनाला मदत म्हणून कै. न्या. मू. गोविंद दीनानाथ माडगांवकर ट्रस्टमधून मंडळाला दहा हजार रुपये दोन वर्षांपूर्वीच मिळाले. याच्या व्याजाचा विनियोग माडगांवकरांच्या स्मारकार्थ प्रकाशनाच्या कामीं करावयाचा आहे. इतरांनीही अशा देणग्या देऊन या स्मारक-पद्धतीचें अनुकरण करावें.

या ग्रंथांतील रेखाचित्रें चित्रकार दलाल यांच्या हातचीं आहेत. कांचीच्या मुक्तेश्वराच्या देवळाचा फोटो आर्क्यालॉजिकल डिपार्टमेंट सदर्न सर्कल यांनीं पाठविला. तसेंच उज्जयनीच्या देवालयाचे फोटो प्रो. बा. ना. मुंडी यांनीं, नासिकचा श्री. बा. वा. दातार यांनीं व तेरवाडचे श्री. मुक्तेश्वर तेरवाडकर यांनीं मिळवून दिले. याबद्दल मी त्या सर्वांचा फार ऋणी आहें. मुंबई वैभव प्रेसच्या कामगारांनीं केलेल्या सहकार्याबद्दल त्यांचेही आभार मानणें उचित आहे.

मुक्तेश्वराच्या प्रतिभेची ज्यांच्याबद्दल इतकी वाखाणणी करतात तीं मुख्य आख्यानें पुढील भागांत यावयाचीच आहेत. हे भागही लवकरच आम्हीं वाचकांच्या हातांत देऊं शकूं अशी मला उमेद आहे.

९ नोव्हेंबर १९५१ अ. का. प्रियोळकर

---



श्री मुक्तेश्वराचें देवालय
कांची, मद्रास.
( श्री मुक्तेश्वराचा शोध,
पृ. २३-२८ पहा. )



कवि मुक्तेश्वराच्या पूजेतील खालील देवालयांतील श्रीदत्तात्रेयाच्या पादुका.



कवि मुक्तेश्वराच्या वृंदावनाजवळील श्रीदत्तात्रेयाचें देऊळ, तेरवाड.
(श्री मुक्तेश्वराचा शोध, पृ. ६-७ पहा.)



श्री मुक्तीश्वराचें देवालय
उज्जयिनी.
( श्री मुक्तेश्वराचा शोध,
पृ. २२ पहा. )



वरील देवालयांतील
श्री मुक्तीश्वराची साळुंका



**श्री मुक्तेश्वर, नासिक.**

( श्री मुक्तेश्वराचा शोध,
पृ. २३ व प्राक्कथन,
पृ. १८ पहा. )

# श्रीमुक्तेश्वराचा शोध

**जो सकळ चातुर्याची खाणी । मुक्तेश्वर कवि प्रसिद्ध जनीं ।**
**भारती टीका केली त्याणीं । ऐकतां श्रवणीं सुख वाटे ॥**

**—महीपति–भक्तलीलामृत.**

**श्रीमुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।**
**वंदी लक्ष जयाचे यश ज्याचें भव्य जेंवि मंदील ॥**

**—मोरोपंत–सन्मणिमाला.**

जुन्या मराठी वाङ्मयांत कवि या दृष्टीनें मुक्तेश्वराचें स्थान पहिलें आहे, याबद्दल रसिक व चिकित्सक विद्वानमांध्यें एकवाक्यता असलेली दिसते. ' महाराष्ट्र—सारस्वत ' कार विनायक लक्ष्मण भावे लिहितात,

" त्याला ( मुक्तेश्वराला ) मराठींतला सर्वांत श्रेष्ठ दर्जाचा कवि असें म्हणणारे लोक
" पुष्कळ आहेत. कांहीं इसम—विशेषतः कथेंत आणि जेवणावळींत पंतांच्या आर्येला
" लाचावलेले, व एकेका आर्येचे दहा दहा अर्थ करून दाखवण्यांत सर्व रसिकता आहे
" असें समजणारे कांहीं इसम—मुक्तेश्वराला सिंहासनाचा मान स्वतः होऊन देत
" नाहींत हें खरें आहे. पण तो मान कोणी त्याला दिला असतां ते मुक्तेश्वराच्या विरुद्ध
" फारसे बोलत नाहींत. याचें एक आणि मुख्य कारण असें आहे कीं, त्यांनीं मुक्तेश्वराचें
" काव्य वाचलेलें नसतें; व त्याची चटक त्यांच्या जिभेला व कानाला लागलेली नसते.
" बाकी ज्यानें एकदां मुक्तेश्वरी आदिपर्वांतील आख्यानांचा स्वाद चाखला आहे, तो
" त्यांतील रसानें वेडा होऊन पुन्हां पुन्हां तेथेंच भ्रमत राहतो. वाहत्या पाण्याच्या धब-
" धब्याचा धोत पाहून कोणाचे डोळे विटले आहेत ? गोड आम्रफळें खातां खातां त्यांची
" कोणाच्या जिभेला शिसारी आली आहे ? गंधर्वांच्या गाण्यानें आणि कोकिळेच्या स्वरानें
" कोणाच्या कानठळ्या बसल्या आहेत ? आणि कपाळ उठलें आहे ? तसेंच मुक्तेश्वराचें
" गोड काव्य वाचीत असतां कोणाला त्याचा कंटाळा वाटला आहे ? शरद् ऋतूच्या
" स्वच्छ चांदण्यांत चांदण्यानें न बोलावतां लोक जसे आपण होऊन तिकडे जातात
" किंवा ढळढळित उन्हांत दुपारच्या वेळीं झाडांच्या गर्द व शीतळ छायेंत
" आमंत्रणाची अपेक्षा न करतां स्वतः होऊन लोक जाऊन बसतात, किंवा जाई-
" मोगऱ्यानें विनवण्या केल्याशिवाय त्यांचा वास लोक एकसारखा घेतात, त्याप्रमाणें
" ज्याला सहृदयता आहे तो रसिक कोणीही न विनवतां, न सांगतां, आग्रह न करतां,
" आपण होऊन मुक्तेश्वराचीं गोड आख्यानें पुन्हां पुन्हां वाचीत सुटतो. आणि पोथी
" गुंडाळून ठेवल्यावरहि त्यांतील ओंव्या एकसारख्या आपल्याशींच गुणगुणत राहतो

" असा हा मुक्तेश्वर कवि लोकोत्तर आहे. आणि पुष्कळ लोकोत्तर गोष्टींप्रमाणें या
" लोकोत्तर कवीसंबंधींही खात्रीलायक अशी माहिती फारच थोडी आहे. "[१]

भावे हे साधे प्राकृत गृहस्थ झाले. पण संस्कृत महाभारताचा सखोल अभ्यास करून भारताचार्य अशी पदवी लाभलेले चिंतामण विनायक वैद्यही म्हणतात, " मुक्तेश्वराचें
" महाभारत हा ग्रंथ महाराष्ट्रभाषेच्या जुन्या वाङ्मयांतील एक उच्चतम पदवीचा आहे. "[२]

इतकेंच नव्हे तर याही पुढें जाऊन ते म्हणतात कीं, हा ग्रंथ मूळ भारताशीं स्पर्धा करणारा किंवा त्याच्यावर ताणही करण्याच्या योग्यतेचा आहे. मुक्तेश्वराच्या वनपर्वासंबंधीं लिहितांना वैद्यांनीं हें विधान केलेलें आहे. वनपर्व हें मुक्तेश्वराच्या आदिपर्वापेक्षां कमी प्रतीचें आहे. मुक्तेश्वराचें आदिपर्व त्यांनीं पाहिल्याचें दिसत नाहीं. तें वाचलें असतां त्यांना किती आनंद झाला असता याची कल्पनाच केलेली बरी. अशी एक आख्यायिका आहे:—"मुक्तेश्वरानें
" अठरा पर्वें भारत तयार करून तें आपला मातामह एकनाथ यास दाखविलें. तें मूळ
" ग्रंथापेक्षां अधिक रसाळ उतरलें आहे असे पाहून व्यासमुनीकृत ग्रंथाचा याचे योगानें
" अव्हेर न व्हावा म्हणून एकनाथानें सदहू ग्रंथ गंगेस ( गोदावरीस ) अर्पण करावयास
" त्यास सांगितलें. तदनुरूप मुक्तेश्वरानें ग्रंथ गंगेंत टाकला. परंतु बहुत दिवस श्रम
" करून तो फुकट दवडिल्याबद्दल वाईट वाटून तो शोक करूं लागला. तेव्हां ' गंगेजवळ
" प्रसाद माग ' असें एकनाथाने सांगितल्यावरून मुक्तेश्वरानें तसें केलें. तेव्हां गंगेनें
" पहिलीं चार पर्वें मात्र परत दिलीं ! "[३]

अशा दंतकथांवर माझा विश्वास नाहीं; परंतु चिंतामणराव वैद्यांसारख्यांचे प्रशंसोद्गार वाचून एखाद्याचा त्यांवर भरंवसा बसण्याचा संभव आहे.

मराठी व संस्कृत अशा दोघां विद्वानांचीं हीं मतें झालीं. आतां आंग्लभाषेचा अखंड व्यासंग केलेल्या पंडितांचे प्रतिनिधि म्हणून फर्ग्युसन कॉलेजचे इंग्रजी वाङ्मयाचे प्रोफेसर वा. ब. पटवर्धन यांचें मुक्तेश्वरासंबंधींचें मत विचारांत घेतां येण्यासारखें आहे. ते आपल्या विल्सन फिलोलॉजिकल लेक्चर्समध्यें काय म्हणतात पहा—

" The first poet who no doubt caught the poetic fire from
" the torch set aflame by the Bhakti School, but who laid
" it freely at the service of the literary art, and
" *composed for the sake of pure joy of literary achievement*,
" was Mukteshwar, a Marathi poet of the very best

---

१ **महाराष्ट्र-सारस्वत** ( आ० १ री ), शके १८४६. पृ० २८२–३.

२ **निबंध आणि भाषणें**, १९१५. पृ० १४३.

३ **काव्येतिहाससंग्रह**, शके १८०१. "मुक्तेश्वर" पृ० ३.

" order historically. Poetry was in his blood. For he was
" the grandson of Ekanath, being the son of the latter's
" daughter.

+ + + +

" The Mahabharata of Mukteshwar is indeed a mine of
" poetic beauties. In adapting the Sanskrit epic in
" Marathi, Mukteshwar was a predecessor of a great
" literary artist of a later age, Moropant. It is both
" interesting and instructive to compare and contrast the
" works of the two poets. Mukteshwar's Mahabharata
" appears to be far more romantic than that of Moropant.
" Mukteshwar is free and often independent in his
" imagery and poetic setting. He abbreviates or expands
" the original Sanskrit story, and the flow of his poetry is
" unfettered. The natural ease with which Mukteshwar's
" images and poetic conceits follow one another, the glow
" and flash of his fancy and imagination, the delicate
" sensitiveness of his ear to the music of words and the
" scrupulousness and nicety of his judgment in the
" selection of right words in the right place, are
" characteristics that have no parallel in the range of
" Marathi Literature. Mukteshwar's descriptions are
" drawn from his own vivid imagination, and often have
" a tinge of local colour. He was the first to press into
" the service of his poetic Muse materials from the social,
" political and religious life around him. This local
" colouring may be a flaw from the point of view of true
" art, but it establishes the originality and independence
" of the poet. The one feature of Mukteshwar's poetic
" work that places him decidedly above his distinguished
" successor, is his absolute freedom from literary
" bondage. Laws of art whether established by tradi-
" tion, or self-imposed, are not suffered by him to get
" stronger than his genius. He does not let them
" arrogate to themselves the power to rule him. He is

" always supreme and governs them, rather than governed
" by them. Literary ornaments and rhetorical flourishes
" that find appropriate place in Mukteshwar's work are
" thus servants to his poetry and always add to its
" beauty, never once tarnish it. The excellences of
" Mukteshwar's Mahabharata are so varied, so frequent
" and so eminent, that no amount of quotation will be
" adequate."[४]

मुक्तेश्वरासंबंधीं असेच प्रशंसोद्गार आणखीही पुष्कळच देतां येतील. रसिकवर्य कृष्णशास्त्री चिपळुणकरांसंबंधीं विष्णुशास्त्री निबंधमालेंत लिहितात, " महाराष्ट्रकवींत ' कवि ' " ही संज्ञा एका मुक्तेश्वराला मात्र बरोबर रीतीनें लागेल असें ते नेहमीं म्हणत असत. "[५] हरि नारायण आपटे ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिकोत्सवाच्या अध्यक्षपदावरून मुक्तेश्वराविषयीं म्हणतात, " त्याच्या भाषेंत कृत्रिमता बिलकूल नाहीं. त्याच्या उपमा " अगदीं सहज. निसर्गमनोहर अशा युवतीच्या दर्शनानें जो आनंद होतो तो आनंद " मुक्तेश्वराच्या काव्यापासून होतो. तसा शुद्धानंद पंडितांच्या किंवा पंतांच्या काव्यापासून " होत नाहीं. "[६] असे प्रशंसात्मक उतारे आणखी किती म्हणून द्यावे ?

मुक्तेश्वर हा जरी असा अद्वितीय कवि म्हटला तरी त्याच्या संबंधीं वैयक्तिक माहिती असावी तितकी उपलब्ध नाहीं. असें असण्याचें एक मुख्य कारण हें कीं, ज्याच्या भोंवतीं भाविकतेचें वलय असतें, असा तो संतकवि नाहीं. संतकवींचा शिष्यप्रशिष्यांमुळें संप्रदाय निर्माण होतो आणि चमत्कारपूर्ण कां होईना खरीखोटी माहिती त्याच्यासंबंधीं जमा होते व ती मागें राहूंहि शकते. मुक्तेश्वर, रघुनाथपंडित, सामराज, मोरोपंत हे संतकवि नसून कलाकवि आहेत. त्यामुळें अगदीं अलिकडचा मोरोपंत सोडला तर जुन्या कलाकवींची आपणांस विशेष माहिती मिळत नाहीं. तरी पण समाधानाची गोष्ट ही कीं, मुक्तेश्वरानें स्वतःसंबधीं थोडीशी माहिती आपल्या ग्रंथामध्यें कोठेंकोठें नमूद करून ठेवलेली आहे. पण त्याचें वाङ्मय शुद्ध स्वरूपांत आपल्यापुढें नसल्यामुळें अपपाठांनीं त्या माहितीला क्वचित् विकृत स्वरूप प्राप्त झालें आहे व त्यापासून भलतेच शोध पुढें आले आहेत. एकाद्या जुन्या ग्रंथकाराच्या ग्रंथांचीं हस्तलिखितें गोळा करून शुद्ध स्वरूपांत तो प्रकाशित केल्यास त्यापासून ग्रंथकाराच्या चरित्रावर किंवा अन्य ऐतिहासिक प्रश्नांवर नवा प्रकाश पडण्याचा संभव असतो. डॉ. रा. गो. भांडारकर यांनीं मुंबई प्रांतांतील संस्कृत हस्तलिखितांसंबंधीं १८८२-८३ चें जें निवेदन केलें आहे त्यांत ते म्हणतात,

---

४ **The Fergusson College Magazine**, Vol. IX, No. 4 (1917). pp. 134-137.

५ **निबंधमाला**, अं० ५९. पृ० १९ टीप पहा.

६ **मराठी वाङ्मयाचा अभ्यास**, १९२७. पृ० १२.

" The object in making collections of manuscripts is, " I apprehend, not only to procure copies of rare works " but also to secure materials for critical editions of such " as though not rare are of great importance, or for the " determination of the correct text of any particular " passage in them whenever a weighty issue hangs on it.'

मुक्तेश्वराच्या वाङ्मयाच्या संशोधनाला आपल्या मराठी संशोधनमंडळामार्फत नुकतीच कोठें सुरवात झाली आहे. हें काम ज्यावेळीं पुरें होईल, त्यावेळींच निश्चित कांहींतरी विशेष सांगतां येईल. तरीपण आतांपर्यंत झालेल्या अभ्यासानें काय विचार मनांत आले ते नमूद करून ठेवीत आहें. जास्त संशोधनानंतर त्यांत दुरुस्ती करीन किंवा भर घालीन, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

मुक्तेश्वराच्या स्वतःच्या लिखाणांत त्याच्या संबंधीं काय माहिती सांपडते व त्यांतील निश्चित कोणती व शंकास्पद कोणती याचाही विचार करूं;

मातृजनक जनार्दनी । एकनाथ नामियेला ॥

—आदिपर्व, अ० १, ७७.

यावरून मुक्तेश्वर हा एकनाथाच्या मुलीचा मुलगा होता, हें दिसून येतें. यासंबंधीं वाद नाहीं.

( १ ) सुचिरसहजवासें गौतमीच्या तटाकीं ।
अतुट भजनपंथें पंथ टाकीत टांकी ।
द्विजवर कविनामा मुद्गल अत्रिगोत्रीं ।
विमळ वचनमुक्तें लेववी संतश्रोत्रीं ॥ ४७० ॥

—रामायण ( युद्धकांड ).

( २ ) गोदावरीतटनिवासी । अत्रिगोत्री पवित्र ऋषि ।
चिंतामणी गुणैकरासी —। पासाव जन्म जयाचा ॥
तो **मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात ।**
व्यासभारतींचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥

—सभापर्व, ( उपसंहार ).

( ३ ) प्रसिद्ध महाराष्ट्रदेशीं । गोदावरीतटनिवासी ।
अत्रिगोत्र पवित्रवंशीं । जन्म जाहला जयातें ॥ ६ ॥
तो चिंतामणिभूदेवकुमर । श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर ।
श्रोतयां विनवी मुक्तेश्वर । क्षमा कीजे समस्तीं ॥ ७ ॥

करवीरलक्ष्मी विष्णुभाजा । भैरव सुवर्णपुरींचा राजा ।
उभय कुळदैवतीं माझ्या । मस्तक पायीं स्पर्शिला ॥ ८ ॥

—आदिपर्व, ( उपसंहार ).

( ४ ) लीलाविश्वंभर गुरुचरणीं । पुष्पांजली वचनसुमनीं ।
मुक्तेश्वरें अर्पूनी मनीं । कृतकृत्यता मानिली ॥ २ ॥

—वनपर्व, ( उपसंहार ).

( ५ ) शक्रविधीच्या मस्तकीं । ज्याची पादुका मिरवे निकी ।
तो विश्वंभर गुरु पिनाकी । विष्णू आपण विश्वात्मा ॥ २१ ॥
तेणें प्रेरिला कवि किंकर । तदाज्ञेनें वदे मुक्तेश्वर ।
परिसोत पुढारें करुणाकर । संत माहेर आमुचें ॥ २२ ॥

—विराटपर्व, ( उपसंहार ).

हे जे पाठ वर दिले आहेत ते सर्वसंग्रह व काव्यसंग्रह या छापील प्रतींप्रमाणें आहेत. यांवरून ज्या गोष्टी सिद्ध होतात त्या या:—

( १ ) मुक्तेश्वराचें वास्तव्यस्थान गोदावरीतटीं म्हणजे पैठणास होतें. रामायणांत त्यानें निर्दिष्ट केलेली गौतमी म्हणजे गोदावरी होय, असें रामायणाचे संपादकद्वय ज. बा. ओक व वा. दा. ओक यांचें मत आहे.[७]

परंतु वि. ल. भावे यांच्या मतें गौतमी ही काशीची नदी असावी.[८]

यावरून फार तर, रामायण रचतांना या कवीचें वास्तव्यस्थान काशीला होतें असें म्हणतां येईल.

( २ ) त्याचें गोत्र अत्रि होतें, त्याच्या वडिलांचें नांव चिंतामणि होतें, त्याचा कुळदेव सोनारीचा भैरव व कोल्हापूरची महालक्ष्मी, इतक्या गोष्टी स्पष्ट आहेत. परंतु '**द्विजवर कविनामा मुद्गलू अत्रिगोत्री**' व '**तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर विख्यात**' या चरणांनीं पुष्कळ संशोधकांना फारच घोटाळ्यांत टाकलेलें आहे ! मुद्गल हें मुक्तेश्वराचें आडनांव असून विश्वंभर हें त्याच्या वडिलांचें म्हणजे चिंतामणीचें दुसरें नांव होय, अशी पुष्कळांनीं आपली चुकीची समजूत करून घेतलेली आहे अशी माझी कल्पना आहे. लीला हें मुक्तेश्वराच्या आईचें नांव असेंही ते म्हणतात.

विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं कांहीं वर्षांमागें ग्रंथमालेंत मुक्तेश्वरावर एक लेख लिहिला होता. कुरुंदवाडापासून एका मैलावर पंचगंगेच्या तीरीं तेरवाड म्हणून एक गांव आहे.

---

७ **रामायण** ( काव्यसंग्रह ), १८९१. पृ० १०७.

८ **महाराष्ट्र-सारस्वत**, भाग १ ला. पृ० २८४.

तेथें कवि मुक्तेश्वराची समाधि असून त्याचे वंशजही तेथें राहातात. त्यांच्याकडे सांपडलेल्या २२ जुलै १७२७ व ३ मे १७५९ च्या दोन सनदा कोल्हापूरच्या शंभु छत्रपतीनें दिलेल्या त्या लेखांत प्रसिद्ध करण्यांत आल्या आहेत. त्यांत " थोरले मुक्तेश्वर गोसावी हे श्री एकनाथ- " स्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र यांचें वृंदावन मौजे तेरवाड, प्रा रायबाग येथें आहे. तेथील " पूजा, उत्साह, ब्राह्मणसंतर्पणादिकांची अनुकुलता होयसारखें " करण्यास तेरवाड गांव इनाम करून दिला असल्याचा मजकूर आहे. महीपति व केशव या एकनाथाच्या जुन्या चरित्रकारांनीं एकनाथाला गोदू व गंगा अशा दोन कन्या होत्या, असें लिहिलें आहेः—

गिरजाबाई सुक्षेत्र जाण । प्रथम प्रसवली कन्यारत्न ।
गोदुबाई नामाभिधान । तिजकारणें ठेविलें ॥ ३६ ॥
तिचे पाठीवर पुत्र जाहला । हरी नाम ठेविलें तयाला ।
थोर होतांचि व्रतबंध केला । पढों लागला ब्रह्मशाळे ॥ ३७ ॥
तयाचे पाठीवर कन्या पाहीं । तिचें नाम गंगाबाई ।
दिधली असे कवणे ठाईं । वृत्तांत तोही अवधारा ॥ ३८ ॥
येक चिंतोपंत नांवे निर्धारीं । गृहस्थ होता प्रतिष्ठानक्षेत्रीं ।
गोदुबाई ज्येष्ठ कुमरी । तयाचे घरीं दिधली ॥ ३९ ॥
आणिक कर्नाटक देशांत । जुना सोयरा नांदे गृहस्थ ।
गंगाबाई त्याच्या पुत्रातें । देवोनी त्वरित लग्न केलें ॥ ४० ॥
गंगाबाईस पुत्र जाण । पुंडाजी त्याचें नामाभिधान ।
तोही करीत विष्णुभजन । निजप्रीतीनें आपुल्या ॥ ४१ ॥

—**महीपति** ( भक्तलीलामृत, अ० २३ ).

श्रीनाथ कृपेसी सत्पात्र । गिरिजाबाई सुक्षेत्र ।
प्रसवली ते एक पुत्र । कन्या विचित्र पैं दोघी ॥ ११ ॥
पुत्राभिधान ठेविलें हरि । गोदुबाई जेष्ठ कुमारी ।
चित्तोत्पत्ति प्रतिष्ठानपुरीं । त्याचे घरीं ते अर्पिली ॥ १२ ॥
कनिष्ठ गंगाबाई । कर्नाटकाप्रती दिधली विवाहीं ।
पुंड निजप्राप्ति पाहीं । हरिभक्ति तेही विशेष करी ॥ १३ ॥

—**केशव** ( एकनाथचरित्र, अ० २८ ).

महीपति व केशव यांच्या हकिकतींतील विलक्षण साम्यावरून एक दुसऱ्याचा अनुवाद स्पष्ट दिसतो. भक्तलीलामृत हा महीपतीचा ग्रंथ शके १६९६ सालीं समाप्त झाला, व केशवकृत एकनाथस्वामीच्या चरित्राच्या शेवटीं समाप्तिशक शके १७१४ असा दिला आहे.

त्यावरून कोणी कोणाची उसनवारी केली तें स्पष्ट दिसून येईल. तेव्हां पहिल्या महीपतीच्याच ग्रंथाचा विचार करूं:—

महीपतीनें आपल्या ग्रंथांत मुक्तेश्वर हा गोदावरीचा मुलगा असें मुळींच म्हटलेलें नाहीं, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. कर्नाटकांत दिलेल्या गंगाबाईच्या पुंढाजीचा उल्लेख केला पण मुक्तेश्वराचा उल्लेख केलेला नाहीं. त्यावरून त्यास तो एकनाथाचा नातू म्हणून माहीत नसावा. मुक्तेश्वरानें आपल्या पित्याचें नांव चिंतामणि असें दिलें आहे, व महीपतीनें

येक चिंतोपंत नांवें निर्धारीं । गृहस्थ होता प्रतिष्ठानक्षेत्रीं ।
गोदुबाई ज्येष्ठकुमरी । तयाचे घरीं दिधली ॥

असें लिहिलें आहे. त्यावरून मुक्तेश्वर हा या गोदावरीचा मुलगा अशी समजूत दृढ झालेली दिसते.

मुक्तेश्वर हा गोदेचा मुलगा ही जी जुनी कल्पना तिला या सनदेंतील उल्लेखानें धक्का मिळालेला आहे; परंतु या दोनही कल्पनांचा राजवाड्यांनीं मेळ घातला असून त्यांत लीला या नांवाचाही समावेश करून त्रिवेणीसंगम साधला आहे. राजवाडे लिहितातः—

" मुक्तेश्वराचें गोत्र अत्रि व सूत्र आश्वलायन होतें. त्याचें उपनाम मुद्गल होतें असें तो
" मुद्गल चिंतामणिसुत ' ह्या सभापर्वाच्या उपसंहारांतील तिसऱ्या ओवीच्या प्रथम चरणा-
" वरून दिसतें. त्याच्या आईचें माहेरचें नांव गोदावरी, सासरचें नांव गंगाबाई, आणि
" एकनाथानें प्रेमानें ठेवलेलें व मुक्तेश्वरानें बोबडेपणीं उचललेलें लाडकें नांव लीला होतें.
" मुक्तेश्वराच्या आईच्या ह्या तीन नांवांमुळें आजपर्यंत पुष्कळ लोक घोटाळ्यांत पडत.
" उपरिमुद्रित लेखांत हिचें नांव गंगा आहे. मुक्तेश्वर आपल्या काव्यांत हिला लीला
" म्हणून संबोखितो. आणि एकनाथाच्या चरित्रांत व इतर ठिकाणीं गोदा या नांवानें
" हिचा उल्लेख होतो. हीं तिन्ही नांवें खरीं असून संशयाला मात्र कारण झालीं होतीं.
" मुक्तेश्वराच्या बापाचें पाळण्यांतील नांव चिंतामणि व जनांतील टोपण विश्वंभर होतें.
" ह्या टोपण नांवाचा मुक्तेश्वर वारंवार उल्लेख करतो. परंतु आईचें नांव अगोदर व बापाचें
" नांव पाठीमागून असा क्रम मुक्तेश्वराच्या सर्व काव्यांत आढळतो. मुक्तेश्वराचा गुरु त्याचा
" बाप विश्वंभर होता, दुसरा कोणी नव्हता. "

राजवाड्यांची ही कविकल्पना दिसते. मुक्तेश्वर आईला लीला संबोखितो किंवा बापाला विश्वंभर म्हणतो, असें म्हणावयाला त्याच्या काव्यांत तरी आधार आहे असें मला वाटत नाहीं.

पांगारकरांनीं कविवर्य मुक्तेश्वर या आपल्या निबंधांत राजवाड्यांचाच अनुवाद केलेला दिसतो. ते लिहितात, " नाथांनीं आपल्या कन्येला भगवंताची लीला आठवून ' लीला '
" हें नांव ज्या परमार्थभावनेनें ठेवलें त्याच भावनेनें लीलेच्या पतीला ते ' विश्वंभर '

" म्हणूं लागले. ' लीला कोणाची ? विश्वंभराची '. याप्रमाणें चिंतामणिशास्त्री यांचें नांव
" विश्वंभर पडलें ! मुक्तेश्वरांनीं आपल्या ग्रंथांत ' लीलाविश्वंभर ' पदानें आपल्या गुरूचा
" उल्लेख जागोजाग केला आहे. यांत आई आणि बाप या दोघांच्याहि नांवाचा आयता
" उच्चार होतो. लीलाविश्वंभर हे गुरु व दत्त हें उपास्य. गुरु व उपास्य यांची अभिन्नता
" हें गुरुपरंपरेचें वर्म ध्यानीं आणतां लीलाविश्वंभरपदानें गुरूचा व दत्ताचा उल्लेख मुक्ते-
" श्वरानें केला आहे, हें युक्तच आहे. "[९]

तिसरे विख्यात महाराष्ट्रवाङ्मयसंशोधक वि. ल. भावे यांना लीलाविश्वंभर हे मुक्तेश्वराचा गुरु हें मान्य आहे.[१०] त्यावरील तळटीपेंत ते लिहितातः—

" कोणी म्हणतात कीं मुक्तेश्वराच्या आईचें नाथांनीं ठेवलेलें लाडकें नांव लीलाबाई व " तिच्या नवऱ्याचें नांव विश्वंभर. " याला भावे आधार देतात—

एकनाथकन्या नाम लीलाबाई । प्रीति तिचे ठायीं बहु असे ॥
वर्षें जालीं सात लग्नाची योजना । लोक करिती जाणा ठाई ठाई ॥
विश्वंभर नामें विप्र येक आला । कोणी नाहीं त्याला मागेंपुढें ॥
...... मोठे मोठे आले न देवोनि तयांसी । देवोनिया यासीं लग्न केलें ॥
घरींच ठेविलें भजन कीर्तन । अनुग्रह जाण दिला तया ॥

—**भीमस्वामी** ( भक्तलीलामृत ).

या भीमस्वामींच्या उताऱ्यावरून लीलाविश्वंभर हीं मुक्तेश्वराचीं मातापितरें होतीं, ही कल्पना अलीकडची नसून जुनीच दिसते.

भीमस्वामी हे रामदासस्वामीच्या शिष्यपरंपरेपैकीं असून शिरगांवमठाचे अधिपति होते. भक्तलीलामृत हा अभंगात्मक ग्रंथ त्यांनीं शके १७१९ म्हणजे इ. स. १७९७ मध्यें लिहिला. त्याला विशेष ऐतिहासिक महत्त्व देतां येईल, असें वाटत नाहीं. अशीच दुसरी एक हरिदासी कथा निबंधचंद्रिकेमध्यें मुक्तेश्वरावर जो निबंध आहे,[११] त्यांत पाहावयास सांपडते. हा निबंधलेखक लिहितो,

" एकनाथमहाराज यांची ज्येष्ठ कन्या गोदुबाई चिंतोपंतास दिली होती. गोदुबाईचें सासरचें " नांव लीलाबाई असें होतें. असें ह्मणतात कीं, मुक्तेश्वराचे वडील चिंतोपंत उर्फ विश्वंभरबुवा ह्यांना

९ **कविवर्य मुक्तेश्वर**, १९२२. पृ० १४.

१० **महाराष्ट्र-सारस्वत** ( भाग १ ला ). पृ० २८४.

११ काव्येतिहाससंग्रहांतील मुक्तेश्वरी वनपर्वाच्या ( शके १८०१ ) उपसंहारावरून ही दंतकथा घेतलेली दिसते.

" वेश्यांचा फार नाद असे. यामुळें लीलाबाईस संसारसुख कसलें तें मिळेनासें झालें. ही गोष्ट
" लीलाबाईनें नाथांस कळविली. नाथांनीं लीलाबाईस सांगितलें कीं, ' आपल्या पतीकडून मला
" भोजनास बोलाव, मग ओघाओघानें गोष्ट काढतां येईल. ' लीलाबाईच्या आग्रहावरून
" विश्वंभरबुवांनीं नाथांस भोजनास बोलाविलें. भोजनसमयीं बोलतां बोलतां ' स्त्रीस तरणोपाय
" कोणता ' असा नाथांनीं जामातास प्रश्न केला. विश्वंभरबुवांनीं ' पति ' असें उत्तर
" दिलें. त्यावर नाथांनीं जामातास सांगितलें कीं, ' पती जर स्त्रीचा समाचार न घेईल
" तर त्या अनाथ अबलेनें काय करावें ! आपण पाहिजे तसे रात्रीं बाहेर जातां, आपल्या
" पत्नीची वाट काय ? आतां आपणांस इतकेंच सांगणें आहे कीं, आपण आपल्या
" मर्जीस येईल तसें करा, पण रात्रीं बाहेर जाण्यापूर्वी भोजनोत्तर श्रीभगवद्गीतेचा
" एक अध्याय रोज आपले पत्नीस वाचून दाखवून त्याचा तिला अर्थ सांगत जा,
" म्हणजे झालें. ' विश्वंभरबुवांनीं गोष्ट तर कबूल केली. त्याप्रमाणें त्या दिवशीं रात्रीं
" पहिला अध्याय बुवांनीं लीलाबाईस वाचून दाखविला, मग स्वारी बाहेर गेली. दुसऱ्या
" दिवशीं दुसऱ्या अध्यायास आरंभ झाला. बुवांची स्वारी पहिले दहा श्लोक आटपून
" अकराव्यावर येऊन थडकली. पुढें:—

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥

" या श्लोकाचा विचार करतां करतां रात्र निघून गेली; बुवा बाहेर गेले नाहींत. असो.
" याप्रमाणें होतां होतां विश्वंभरबुवांचा नाद सुटून लीलाबाईस यथाकाळीं पुत्र झाला.
" त्याचें नांव मुक्तेश्वर ठेविलें. ( शके १५३१; सन १६०९ )"[१२]

आतांपर्यंतच्या हकिकतीवरून मुक्तेश्वराच्या आईचें नांव लीला व बापाचें नांव विश्वंभर या कल्पनेनें आपल्या लोकांना कसें भारलें होतें व या कल्पनेचा उगम व विकास कसा झाला हें कळून येईल.

## तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात ।

हा सभापर्वाच्या उपसंहारांतील निर्देश ' लीला–विश्वंभर ' हीं मुक्तेश्वराचीं मातापितरें या कल्पनेच्या मुळाशीं आहेत, हें वर दाखविलेंच आहे; परंतु ही कल्पना खोटी असल्याची शंका प्रथम बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं पुढें मांडिली. ते म्हणतात,
" वरील ओवींतून ' लीला–विश्वंभर ' ही मुक्तेश्वराचीं मातापितरें होत, हा अर्थ काढणें
" केवळ हास्यास्पद होय. अर्थ करतांना वाक्यरचनेला जर कांहीं महत्त्व द्यावयाचें असेल,
" तर वरील अर्थ निघणें संभवतें तरी कसें, हेंच मोठें कोडें आहे. ' चिंतामणिसुत '

---

१२ **निबंधचंद्रिका**, अंक ४०, १८८६. पृ० २.

" म्हणजे मुक्तेश्वर म्हणावयाचें तर मग ' लीलाविश्वंभर जगविख्यात ' याचा संबंध
" चिंतामणीशीं लागणें संभाव्य तरी आहे काय ? या ओवींत ' चिंतामणि ' व ' लीला-
" विश्वंभर ' यांचें ऐक्य सिद्ध होणें बाजूसच राहून, उलट त्यांचें भिन्नत्वच गळीं उतरतें;
" कारण, जर या ओवीचा कांहीं अर्थ झालाच, तर ' चिंतामणिसुत हाच लीलाविश्वंभर,
" जगविख्यात ' असा होईल. यांत ' चिंतामणि ' व ' लीलाविश्वंभर ' एकच होत, ही गोष्ट
" शोधूं पहाणें निरर्थक दिसतें. "[13]

माझीं स्वतःचीं मतें या विषयावर स्वतंत्रपणें निश्चित झाल्यावर मीं अलिकडेच भिडे यांचा वरील निबंध लक्षपूर्वक वाचला व त्यांचा व माझा निष्कर्ष कांहीं बाबतींत जुळतो, हें पाहून मला समाधान वाटलें. मुक्तेश्वरावर निरनिराळ्या विद्वानांनीं जे आतांपर्यंत निबंध लिहिले आहेत, त्यांत चिकित्सक दृष्टि सर्वांत जास्त मला भिडे यांच्यामध्यें दिसली. तरीपण युक्तिवादाबरोबर निराळा स्वतंत्र पुरावा त्यांना पुढें करतां आला नाहीं. शिवाय

तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात ।

या चरणाचा अर्थ त्यांचे विरोधक लावतात त्याखेरीज अन्य रीतीनें त्यांनीं समाधानकारक लावून दाखविला नाहीं. त्यामुळें आमचें तेंच खरें असें म्हणण्यास विरुद्ध पक्षास फावलें! रा. आजगांवकर महाराष्ट्र-कविचरित्रांत लिहितात, " या ओवींत जगविख्यात ' लीलाविश्वंभर '
" जो चिंतामणि मुद्गल त्याचा मुलगा ( मुक्तेश्वर ) यानें भारत लिहिलें, " असें
" मुक्तेश्वरांनीं सांगितलें आहे...एकंदरींत ' लीलाविश्वंभर ' शब्दासंबंधानें रा. पांगारकर,
" राजवाडे, गोडबोले व नवनीतकार यांचाच तर्क सत्यास धरून आहे, व रा. भिडे यांनीं
" या बाबतींत आपल्या निबंधाचीं जीं दहा बारा पृष्ठें अडविलीं आहेत त्यांत फारसा
" अर्थ नाहीं, असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. "[14]

वास्तविक ज्या ओवीनें या सगळ्या लोकांना गोंधळांत टाकलेलें आहे तिच्यांतील पाठच मुळीं चुकीचा होता.

सभापर्वाच्या उपसंहारांतील ही ओवी,

तो मुद्गल चिंतामणिसुत । **लीलाविश्वंभर जगविख्यात** ।
व्यास भारतींचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥

अशी नसून

तो मुद्गल चिंतामणिसुत । **लीलाविश्वंभरानुग्रहीत** ।
व्यास भारतींचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥

अशी आहे ![15]

---

१३ **मुक्तेश्वर** ( आ० २ री ). १९२१. पृ० १४

१४ **महाराष्ट्र-कविचरित्र** ( भा० १ ला ), १९०७. पृ० ३

१५ तुळा—इति श्री सभापर्व भारत । **लीलाविश्वंभर अनुग्रहीत** ।
मुक्तेश्वराचा वचनार्थ । सार्थक श्रोतीं करावा ॥—**सभापर्व (मुक्तेश्वर) अ० २.**

हा दुसरा पाठ, आदिपर्वाच्या पाठदृष्ट्या ज्या अत्यंत विश्वसनीय अशा पोथ्या मला दिसल्या त्यांना जोडून असलेल्या सभापर्वाच्या पोथ्यांत असलेला मला आढळला.

( १ ) रा. वासुदेव दत्तात्रयशास्त्री निगुडकर यांना संस्थान बावडा येथें सांपडलेली व राजापूरच्या संस्कृत पाठशालेंतून मजकडे पं. र. कृ. पाटणकर यांनीं पाठविलेली प्रत, ( २ ) गोमांतकांतील कै. व्यंकटेश शां. दळवी यांकडून मिळालेली प्रत, ( ३+४ ) तंजावर येथील सरस्वतीमहालांत असलेल्या नं. १३७३ व १३७९ च्या दोन प्रती, ( ५ ) कोल्हापूरचे प्रो. पंगु यांना सांपडलेली प्रत, या प्रतींमध्यें ' लीलाविश्वंभरानुग्रहित ' असाच पाठ आहे. यावरून लीलाविश्वंभर हें चिंतामणीचें दुसरें नांव या कल्पनेचा आधारच नष्ट होतो, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. लीलाविश्वंभर हा जर मुक्तेश्वराचा बाप नाहीं तर मग अन्य कोण याचाही येथें विचार करणें प्राप्त आहे.

लीलाविश्वंभर हा मुक्तेश्वराचा बाप नसला तरी त्याचा गुरु असलेली अन्य कोणीतरी मानवी व्यक्ति असावी, असा भिड्यांचाही समज दिसतो. ते लिहितात,

" लीलाविश्वंभर हा माझा गुरु असें मुक्तेश्वर म्हणत असतां ' लीला ' व ' विश्वंभर '
" अशीं दोन पदें कल्पून ' लीला ' ही मुक्तेश्वराची आई किंवा गुरुपत्नी कल्पिण्याचें
" कोणींही भारदस्त प्रयोजन किंवा प्रमाण पुढें आणिलेलें नाहीं. ' लीलाविग्रही ' ' लीला-
" वतारी ' इत्यादि परमेश्वरास लावलेल्या नांवांतील ' लीला ' व मुक्तेश्वरांनीं **ईश-**
" **स्वरूप मानिलेल्या आपल्या गुरूस** लाविलेल्या ' लीलाविश्वंभर ' या नांवांतील
" ' लीला ' या दोहोंत आह्मांला तरी कांहींएक वास्तविक भेद करितां येईल असें
" वाटत नाहीं. "

प्रि. दा. के. ओक यांचेंही मत लीलाविश्वंभर ही मुक्तेश्वराचा गुरु असलेली कोणीतरी व्यक्ति होती असें दिसतें.[१६]

लीला व विश्वंभर हीं जरी मुक्तेश्वराचीं मातापितरें नसलीं तरी त्याचीं अनुक्रमें गुरुपत्नी व गुरु यांचीं नांवें होतीं, असें काव्यसंग्रहसंपादक जनार्दन बाळाजी मोडक यांचीही समजूत होती, असें त्यांच्या मोरोपंताच्या सन्मणिमालेवरील तळटीपांवरून दिसतें. मला राजवाडे, पांगारकर, आजगांवकर प्रभृतीचें म्हणणें जसें मान्य नाहीं, त्याप्रमाणें भिडे, ओक किंवा मोडक

---

इति श्री अरण्यपर्व भारत । **लीलाविश्वंभरानुग्रहीत** ।
मुक्तेश्वराचा वचनार्थे । पवित्रप्राय परिसोत ॥ —**वनपर्व** ( मुक्तेश्वर ) अ० १.

१६ **विराटपर्व** ( काव्यसंग्रह ) आ. २ री, १९३९. उपोद्घात पृ० ५.

यांचेंहि नाहीं. मुक्तेश्वर जेव्हां 'विश्वंभर' किंवा 'लीलाविश्वंभर' म्हणून नमन किंवा निर्देश करी, त्यावेळीं त्याच्यापुढें कोणतीही मानवी व्यक्ति होती असें वाटत नाहीं. स्वतः मुक्तेश्वरच या विश्वंभरासंबंधीं किंवा लीलाविश्वंभरासंबंधीं काय म्हणतो तें पाहूं:—

विश्वंभराच्या किंवा लीलाविश्वंभराच्या परब्रह्मस्वरूपाची मुक्तेश्वर दोन प्रकारें कल्पना करतो. पहिलें पंचायतनस्वरूप व दुसरें त्रिमूर्ति—स्वरूप.

पहिलें पंचायतनस्वरूप म्हणजे काय हें

**आदित्यं गणनाथं च देवीं रुद्रं च केशवम् ।**
**पंचदैवतमित्युक्तं सर्वकार्येषु पूजयेत् ॥**

या श्लोकावरून कळून येईल.

अ) मुक्तेश्वर आदिपर्वाच्या आरंभींच म्हणतो—

ॐ नमो लीलाविश्वंभरा स्वामी ।
तुझिये स्वरूपपरब्रह्मीं ।
पंचायतन पंचनामीं ।
कल्पिजेती अवयव ॥ १ ॥

तेथें **शिव** तो निज मस्तक ।
**विष्णुसूर्य** द्वय हस्तक ।
सव्य चरण **विनायक** ।
वाम तो **शक्ति** साजिरा ॥ २ ॥



आ) सभापर्वाच्या मंगलाचरणांत तो लिहितो,

ज्याची कृपादृष्टी **भगवती** ।
अनुग्रह तोचि **गणाधिपति** ।
बोधप्रकाश **गभस्ती** ।
हृदयाकाशीं झळकत ॥ ८ ॥

जीवीं **शिवत्व** प्रकाशिलें ।
**विष्णु**मयचि विश्व केलें ।
एवं पंचायतन भलें । म्यां देखिलें गुरुरूपीं ॥ ९ ॥

इ) वनपर्वाच्या आरंभीं तो नमन करतो,—

ॐ नमो विश्वंभरा देवा । अभेदभावें तुझी सेवा ।
तूंचि विश्वासखी जीवा । प्रतीति बाणे निर्धारें ॥ १ ॥

**हरिहरसूर्यगणेशशक्ति** । तूंचि एक बहुधा व्यक्ति ।
जेथें धावे मनोवृत्ति । तेथें तूं एकू ॥ २ ॥

हें पंचायतनस्वरूप झालें; परंतु दुसरें त्रिमूर्तिस्वरूप हाच मुक्तेश्वराचा खरा **लीलाविश्वंभर** होय.

( अ ) या संबंधीं तो आदिपर्वांत काय म्हणतो पहाः—

कां नाभिपादांत कमळासनु ।
मध्यकंठांत रमारमणु ।
स्कंधावरुता त्रिलोचनु ।
अंगत्रयीं जो येकु ॥ ५ ॥



( आ ) सभापर्वांत आरंभीं हेंच त्यानें निराळ्या भाषेंत सांगितलें आहे—

जयातें बोलती परमात्मा ।
विष्णु शंकर अथवा ब्रह्मा ।
जो असेल तयाची प्रतिमा ।
व्यक्ताव्यक्त नमियेली ॥ १ ॥

लीलाविश्वंभर ईश्वरू ।
दत्तात्रेय जगद्गुरु ।
ज्याचेनि नामें भवसागरु ।
मार्गा तरले असंख्य ॥ ६ ॥

लीलाविश्वंभर म्हणजेच दत्तात्रेय हें त्यानें वारंवार ठिकठिकाणीं सांगितलें आहेः—आदिपर्वांत तो लिहितो,

विशेष लीलाविश्वंभरु । दत्तात्रेय जगद्गुरु ।
त्याचेनि प्रसादें मुक्तेश्वरू । निरोपी तें परिसावें ॥ १२२ ॥

—अ० २६.

चिन्मूर्ति लीलाविश्वंभरू । दत्तात्रेय जगद्गुरू ।
त्याचेनि नामें मुक्तेश्वरू । कथा बोले भारती ॥ ३८ ॥

—अ० ३३.

लीलाविश्वंभर स्वामिया । दत्तात्रेया जगदात्मिया ।
मनोभावें वंदोनियां । मुक्तेश्वर अनुवादे ॥ १०१ ॥

—अ० ४६.

एकनाथचरित्राच्या आरंभीं मुक्तेश्वर लिहितो—

**ॐ नमो जी विश्वंभरू । तो देव दत्तात्रय जगद्गुरू ।**

मुक्तेश्वर विश्वंभराला म्हणजे श्रीदत्तात्रेयाला गुरु म्हणतो याचें कारण तो दत्तोपासक होता. श्री दत्तात्रेयाला मुक्तेश्वराचा मातामह एकनाथ यानें " परमगुरु " म्हटलें आहे. तो भागवतांत २३ व्या अध्यायाच्या शेवटीं लिहितो,

माझे निज गुरूचाही गुरु । **श्रीदत्त परमगुरु ।**
तो भिक्षुगीतार्थे साचारू । योग्यां योगेश्वरू तुष्टला ॥[१७]

एकनाथाचा गुरु जनार्दन श्रीदत्तात्रयाला गुरु मानी हें प्रसिद्ध आहे. शिवाय देवालाच गुरु म्हणण्याचा प्रघात एकनाथाचा होताच. पांडुरंगाला व गजाननालाही त्यानें सद्गुरु म्हटलें आहे:—

श्री पांडुरंग सद्गुरु हे स्वामी । तया पदपद्मीं नमन माझें ॥ १ ॥

श्रीगुरुसारखा वंद्य नाहीं त्रिभुवनीं । तो कैवल्याचा धनी विटेवरी ॥ १ ॥

गजाननमूर्ति सद्गुरु समर्थ । देई मज स्वार्थ निज पदीं ॥ २ ॥ वगैरे.

ह्या गोष्टी लक्षांत घेतल्या असतां श्रीदत्तात्रेयाला मुक्तेश्वरानें गुरु म्हणावें हें स्वाभाविक आहे. फार कशाला ? हनुमंताख्यान या आपल्या काव्याचे शेवटीं मुक्तेश्वरच लिहितो—

मुक्तेश्वराचा श्रीगुरू । दत्तात्रय परब्रह्मअवतारु ।
स्मरतां झाला भवसागरू । गोष्पदप्राय सद्भक्ता ॥ ६२ ॥[१८]

मुक्तेश्वराचा पारमार्थिक गुरु म्हणून कोणी मानवी व्यक्ति होती असें मला वाटत नाहीं नाहीं म्हटल्यास एकनाथाला मात्र त्यानें वनपर्वाच्या आरंभीं गुरु म्हणून वंदन केलें आहे:—

मुक्तेश्वरें एकनाथु । यातें साष्टांग प्रणिपातु ।
गुरुस्वरूप म्हणोनि हेतु । ग्रंथारंभीं वंदावा ॥

वरील पाठ काव्यसंग्रहाचा आहे. जुन्या हस्तलिखितांत अन्य पाठ सांपडतो तो असा:—

मुक्तीश्वर एकनाथ । त्यातें साष्टांग प्रणिपात ।
गुरुस्वामी म्हणोनि हेत । साष्टांग वंदावें ॥

मुक्तेश्वराच्या पूर्वी विश्वंभर किंवा विशेषतः लीलाविश्वंभर ही संज्ञा श्रीदत्तात्रेयाला लावतां येत असे, असें जर निश्चितपणें दाखवितां आलें, तर 'लीला' ही मुक्तेश्वराची आई

---

१७ एकनाथाचा आणखी अभंग पहा—

दत्त गुरु दत्त गुरु दत्तात्रय गुरु ॥धृ०॥ शंखचक्रगदाधरा । दिगंबरा जटाधरा ॥ १ ॥
आदिनाथ दीनानाथ ब्रह्मरूप दत्त गुरु ॥ २ ॥

१८ **मुक्तेश्वरकृत स्फुट काव्यें**—१९०६. पृ० १७९.

किंवा गुरुपत्नी होती, आणि ‘ विश्वंभर ’ हें त्याच्या बापाचें किंवा मानवी गुरूचें नांव होतें ही लोकांच्या डोक्यांतील भ्रामक कल्पना कायमची नष्ट करतां येईल, अशी आशा आहे.

दासोपंत नांवाचा जो प्रसिद्ध साधु होऊन गेला तो एकनाथाचा समकालीन होता एकनाथपंचकापैकीं एक असें त्याला मानतात. त्याचा जन्म श० १४७३ व अंत १५३७ सालीं झाला; यावरून त्याचा काळ कळून येईल. यानें फारच मोठी ग्रंथरचना केलेली आहे. ती बहुतेक अप्रकाशित आहे. हाही दत्तोपासकच होता. आंबेजोगाई किंवा मोमिनाबाद येथें तो रहात असे. याची **गीतार्णव** नांवाची भगवद्गीतेवरील जी टीका आहे तिचे आरंभींचे कांहीं अध्याय मुद्रित झाले आहेत. या गीतार्णवाच्या आरंभीं तो श्रीदत्तात्रेयाला विश्वंभर या नांवानें संबोधित असलेला दिसतो. उदाहरणार्थ त्याच्या दुसऱ्या अध्यायाच्या आरंभीं पुढील ओवी आढळते:—

जय जयाजी विश्वनाथा । **विश्वंभरा** अद्वैता ।
आदिगुरो, अवधूता । पुण्यकीर्ति ॥ १ ॥

**लीलाविश्वंभर** असा स्पष्ट उल्लेख दत्तात्रयाला अनुलक्षून त्यानें केलेला पहावयाचा असेल तर **श्री दासोपंतांचीं पदें**[१९] हा ग्रंथ पहावा. त्यांत विश्वंभर व लीलाविश्वंभर या दोनही नांवानीं त्यानें श्रीदत्ताचा ठिकठिकाणीं उल्लेख केलेला आहे. लीलाविश्वंभर या नांवाचे निर्देश पहा:—

( पद २९२ )

पुराणपुरुषेश्वरा गुरुमूर्ती दातारा । **लीलाविश्वंभरा दत्तात्रेया** ॥ १ ॥ धृ. ॥
तुझें चरणस्मरण मायादहन भवभय संकीर्तन बखताहे ॥ छ ॥
आखिळाविश्वधरा धर्मज्ञा ईश्वरा शिव शिव दिगंबरा योगमूर्ती ॥ २ ॥

( पद १३९४ )

नमूनि सर्वेश्वरा गुरुमूर्ती उदारा **लीलाविश्वंभरा दत्तात्रेया** ।

( पद १३८९ )

भक्तजनसुरतरु, ज्ञानविज्ञानसागरू, पावला श्रीसिद्धराजू आत्मा ईश्वरू,
परमात्मा ईश्वरू, **दत्तु आदिगुरु** ॥ १ ॥ धृ० ॥
अरे अरे मंत्रसारा अरे **लीलाविश्वंभरा** ।
मायावंता मायामुक्ता त्राही दिगंबरा ॥ २ ॥

---

१९ **श्री दासोपंतांचीं पदें**, संपादक—का. वा. लेले, वाई.

( पद १५९१ )

योगीजनवल्लभा **लीलाविश्वंभरा श्रीदत्ता** सद्गुरो कृष्णवर्ण सुरेश्वरा,
विज्ञानसागरा भक्तकरुणाकरा **लीलाविश्वंभरा**, नमन तुतें.
देवदेवेश्वरा सुरपती ईश्वरा **लीलाविश्वंभरा**, नमन तुतें.
परब्रह्मसाकारा अनुसूयेकुमारा **लीलाविश्वंभरा**, नमन तुतें.
परात्परतरा सद्विद्याजळधरा **लीलाविश्वंभरा**, नमन तुतें.
मायातमसंहारा स्वानंदसागरा **लीलाविश्वंभरा**, नमन तुतें.
अलक्ष्य अगोचरा गुरुमूर्तिदातारा **लीलाविश्वंभरा**, नमन तुतें.
अद्वयगुणविस्तारा योगानंदकरा **लीलाविश्वंभरा**, नमन तुतें.
बापा दिगंबरा, मी नेणें दुसरा **लीलाविश्वंभरा**, नमन तुतें.

आणखीही अशीं अनेक स्थळें दाखवितां येतील.

यावरून दासोपंताची आई 'लीला' व बाप 'विश्वंभर' होता व दासोपंत हा मुक्तेश्वराचा सहोदर किंवा गुरुबंधु होता, असें कोणाला म्हणतां येईल असें वाटत नाहीं.

ब्र. टेंभे स्वामी उर्फ वासुदेवानंदसरस्वती स्वामी यांनीं श्रीदत्तात्रेयाच्या सहाव्या अवतारांत त्याचें नांव **लीलाविश्वंभर** होतें, असें म्हटलें आहे.[२०]

अन्नपानादिदानेन लीलाविश्वंभरोऽभवत् ।
लीलया विश्वरूपाणि मुनिभ्यः स व्यदर्शयत् ॥ ७ ॥
तानि रूपाणि दृष्ट्वा ते सर्वेऽपि गतसाध्वसाः ।
साश्चर्यास्तुष्टुवुर्देवं लीलाविश्वंभराभिधम् ॥ ८ ॥
लीलाविश्वंभरः सोऽपि वेदाध्ययनतत्परः ।
शिष्यानध्यापयामास कदाचिद्ध्यानतत्परः ॥ ९ ॥

लीलाविश्वंभरासंबंधीं आणखीही लिहिण्यासारखें आहे; पण त्यापूर्वी मुक्तेश्वराचें व्यक्तिनाम काय होतें, त्याचा थोडा विचार करूं.

**द्विजवर कविनामा मुद्गल अत्रिगोत्री** । असा रामायणामध्यें व
**तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभरानुग्रहीत** ।

असा सभापर्वामध्यें मुक्तेश्वरानें स्वतःचा नामोल्लेख केलेला आहे. पुष्कळांची समजूत त्यानें मुद्गल हें आपलें आडनांव किंवा कुलनाम सांगितलें आहे. या पुष्कळांत राजवाडे,[२१] पांगारकर[२२], आजगांवकर,[२३] वगैरेंचा समावेश होतो मुद्गल हें त्याचें व्यक्तिनाम मानणारे भावे व भिडे हे

---

२० **श्रीदत्तात्रेय–षोडशावतार–जयंतीकल्पम्**, शके १८४०. पृ० ५४.
२१ ग्रंथमालेंतील निबंध पहा.
२२ **कविवर्य मुक्तेश्वर** ( चरित्र आणि काव्यविवेचन ), १९२२. पृ० १४.
२३ **महाराष्ट्रकविचरित्र** ( भा० १ ). पृ० ४६.

आहेत. मी या दुसऱ्या मताचा आहें. नांवें व आडनांवें यांचा मीं जो थोडाफार अभ्यास केला आहे त्यावरून माझें हें मत झालें आहे. आज कुलनामनिर्देशांचा विशेष प्रघात आहे व तोही युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यानंतरचा आहे. जुन्या काळीं व्यक्तिनामेंच मुख्यतः वापरांत होतीं. कुलनामांचा त्या काळीं फारसा प्रचार नसे. आजच्या कल्पना तीनशें वर्षांमागच्या समाजावर लादणें बरोबर नाहीं. मुक्तेश्वरानें प्रथम रामायण लिहिलें हें मत बहुतेक सर्वांस मान्य आहे. युद्धकांडाच्या शेवटीं त्यानें जी आत्मपर माहिती नमूद केली आहे, तेथें लीलाविश्वंभर किंवा मुक्तेश्वर याचा निर्देश नाहीं. रामायणाच्या आरंभीं,

'मुक्तेशस्य विराजते सुरुचिरा वाणी गुणग्राहिणी' असा ज्यांत आत्मपर उल्लेख आहे ते तीन संस्कृत श्लोक व शेवटास असलेला

विश्वंभरश्रीगुरूच्या प्रसादें । आनंदवाचा वदलों विनोदें ।
भक्तीन मुक्तेश्वर सार बोले । आकर्णितां सज्जनचित्त डोले ॥

हा मराठी श्लोक मागाहून जोडला गेला असावा अशी शंका येते. भावे लिहितात, "हें काव्य प्रथम युद्धकांडापर्यंतच लिहून पुरें केलें असावें. पुढें यानें किंवा दुसरे कोणी "आणखी उत्तर कांडाची भर घालून हें संपूर्ण रामायण केलें."[२४]

मुक्तेश्वर हें नांव धारण करण्यापूर्वी हा कवि स्वतःस 'चिंतामणिसुत मुद्गल' म्हणत होता. या नांवाखालीं एक कविता श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील चार बाडांमध्यें मला आढळली. (६८८, १३२, २५०, २९५). ती अशीः—

श्रीरंगीं रंगलें मानस मागुती मुरडेना, बाइये ।
स्वरूपीं ही वृत्ति निमाली मागुती निवडेना ॥ धृ० ॥
चिदानंदपदीं प्रवेशली बुद्धि काढवेना ।
आवडुनि जीवीं जडली ते वासना सोडवेना ॥ १ ॥
निश्चयेंसि देख सेविलें तें सुख सोडवेना ।
गुरुकृपावित्त न जोडतां चित्त दृढवेना ॥ २ ॥
वेदश्रुति जेथें पारुषली ते मी काय बोलों ।
हेतुमान गति खुंटली ते पथिं केंवि चालों ॥ ३ ॥
सहस्रमुखिं माप करितां अमुप लेख जालें ।
**चिंतामणिसुत मुद्गलीं** तें सुख ठेलें ॥ ४ ॥

मुक्तेश्वराच्या आरंभींच्या कवितांपैकीं ही एक असावी, असें स्पष्ट दिसतें.

तंजावरच्या सरस्वतीमहालांत अशीच आणखी एक कविता मला अलीकडे सांपडली. तिचें नांव 'हनुमंताची आरती.' ती अशीः—

---

२४ महाराष्ट्र-सारस्वत ( भा. १ ). पृ० २९२.

येकाच उड्डाणें लंघीला सेतु । किंकरा बनकरा पुरविला अंतु ।
मारीला जंबुमाळी अखया सुतु । मारीला पळविला वीर इंद्रजीतु ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय श्रीहनुमंता । पवनपुत्र वीरा बळिया हनुमंता ॥ ध्रु० ॥
वैराग्याचा वन्ही लाऊनि देखा । ममता जाळीयेली विषयाची लंका ।
रजोगुणरावणु इंद्रियदशमुखा । दग्ध करूनी सुखी केलें तीहीं लोकां ॥ २ ॥
नामस्मरणें येका सोडविलें सकळां । तो राम चोरुनि नेला पाताळा ।
स्वामीचें संकट निरसिलें हेळा । तया भक्ता जीवें प्राणें ओवाळा ॥ ३ ॥
काळ काम रुळे जया अंकणा । नामस्मरणें तोडी आजन्ममरणा ।
**मुद्गल चिंतामणि** अनुसरे जाणा । काया-वाचा-मनसा वायोनंदना ॥ ४ ॥
अशा आणखीही कविता सांपडणें शक्य आहे.

ही आरती मुक्तेश्वराची याला आणखी अंतर्गत सबळ पुरावा असा कीं यांतील '**काळ काम रुळे जया अंकणा**' ही भाषा मुक्तेश्वराच्या रामायणामध्येंही आढळतेः— '**रुळे अंकणा क्रूर तो काळ साचें ।**' —युद्धकांड, श्लोक ४७५.

मुक्तेश्वर हें आपल्या आराध्यदेवतेचें नांव महाभारत रचतांना त्यानें धारण केलेलें दिसतें. स्वतः हा कवि आपल्या आदिपर्वाच्या आरंभीं लिहितो,

हो कां डोळसु पायाळ निका । परी गुरुआज्ञेचें अंजन देखा ।
प्रसन्नतेची भाग्यरेखा । नसतां निधान कैं जोडे ॥ ४० ॥
म्हणवुनी देवतारूपें वहिला । येक श्रीगुरु म्यां स्तविला ।
अभेदभक्तिचेनि भुलला । आज्ञापितु निजमुखें ॥ ४१ ॥
त्या कारुण्यवसंतवातें । मनाचे निर्फळलते ।
स्फूर्तीचे पल्लव पातले तेथें । कवित्वफळीं फळभारू ॥ ४२ ॥
म्हणे रे बाळकें घेतला थाया । तो साच करोनि दाखवी माया ।
तेवीं त्वां आदरिलें तें वाया । केवीं आह्मीं धाडणें ॥ ४३ ॥
**मुक्तेश्वर जो मी अवधूत । माझेनि नामें मुद्रांकित ।**
**कथा विस्तारीं भारत । महाराष्ट्रपदबंधीं ॥ ४४ ॥**
मूळ भारतीं व्यास सांगे । गणेश आपण लिहितां वेगें ।
येथें मी कर्ता लिहिता आंगें । संतप्रार्थना त्वां कीजे ॥ ४५ ॥

अशाप्रकारें आपलें नांव धारण करून मराठी भाषेंत भारत सांगण्यासंबंधीं अवधूत असा जो मुक्तेश्वर त्यानें आज्ञा केल्यावरून आपण हा ग्रंथ लिहित असल्याचें हा कवि सांगत आहे. भिडे यांनीं हा मुद्दा सुचविला होता, परंतु त्याच्याकडे कोणी लक्षच दिलेलें दिसत नाहीं. आदिपर्वाच्या पहिल्या अध्यायाची शेवटची ओवी शुद्ध स्वरूपांत पुढें ठेविली म्हणजे यासंबंधीं

शंका दूर होईल. सध्यां छापील सर्वसंग्रह किंवा काव्यसंग्रह प्रतींतील ही शेवटची ओवी आमच्या पुढें आहे ती अशी—

इति श्री भारत आदिपर्वणि । पुढें परिसावें विचक्षणीं ।
वदेल मुक्तेश्वराची वाणी । लीलाविश्वंभरप्रसादें ॥ १९९ ॥

आदिपर्वाचीं एकोणतीस जुनीं हस्तलिखितें अभ्यासून मीं या ओवीची जी शुद्ध संहिता निश्चित केली आहे ती अशीः—

इति श्री भारत आदिपर्वणि । पुढां परिसावें विचक्षणीं ।
कवतुकें वदेल कवींची वाणी । मुक्तेश्वरप्रसादें ॥ १९३ ॥

मूळ पाठ मागाहून कोणीतरी बदललेला स्पष्ट दिसतो. आराध्यदेवतेचें 'मुद्रानाम' ( pen-name ) घेतल्यावर देव व उपासक यांमधील समाननामामुळें होणारा गोंधळ चुकविण्याकरितां कवीनें मुक्तेश्वर या नांवानें देवास उद्देशून लिहिण्याचें टाळलें आहे. तरीपण अनेक ठिकाणीं तें नमूद आहे. पहा ( मी प्रथम शुद्ध पाठ देऊन मागाहून कंसांत छापील किंवा अन्य प्रतींत आढळणारे पाठ देत आहें ):—

इति श्रीभारत आदिपर्वणि । कवि मुक्तेश्वर शूलपाणी ।
त्याचेनि प्रसादें हे वाणी । सुखी करो श्रोतियां ॥

—आदि० अध्याय ४.

( येथें 'कवि मुक्तेश्वर' ऐवजीं 'अविमुक्तेश्वर' असाही कांहीं हस्तलिखितांत पाठ आहे. या काव्याचें कर्तृत्व आपणाकडे नसून आराध्यदेवतेकडे आहे असेंही कवीला सुचवावयाचें असेल. शूळपाणि हें नांव माणसास कसें देतां येईल ? श्रीशंकर किंवा श्रीदत्तात्रेय येथें अभिप्रेत आहे. )

इति श्रीआस्तिकसहसौपर्णे । भारत आदरें ऐकोत शाहाणे ।
मुक्तेश्वरप्रसादें ह्मणे । कविकिंकर आवडी ॥

—आदि० अध्याय ५.

( काव्यसंग्रहप्रतींत,

इति श्रीकद्रुविनतासौपर्णे । भारत आदरें ऐकतां शाहाणे ।
विश्वंभरप्रसादें म्हणे । मुक्तेश्वर आवडी ॥ १३१ ॥

असा बदलेला पाठ आढळतो. )

इति आदिपर्वकथा भारती । **मुक्तेश्वर अवधूतमूर्ती** ॥
तत्प्रसादें श्रोतयांप्रती । कविकिंकर अनुवादे ॥

—आदि० अ० १२.

( हा पाठ छापील काव्यसंग्रहप्रतींतही आहे. यावरून वरच्या ५ व्या अध्यायांतील ओवीप्रमाणेंच येथेंही हा कवि स्वतःला कविकिंकर म्हणवितो व आपल्या आराध्यदेवतेला ‘ मुक्तेश्वर ’ म्हणतो, हें स्पष्ट दिसून येईल. )

तर मग हा मुक्तेश्वर कोण हें चवदाव्या अध्यायाच्या शेवटीं पहा—

आदिकवीचा आदिगुरु । विश्वेश लीलाविश्वंभरु ।
भक्तिशक्तीनें मुक्तेश्वरु । वाक्यपुष्पीं अर्चिजे ॥ १६० ॥
तोचि कविकिंकर श्रोतयां । विनवी हस्त जोडोनियां ।
कथा सुपथीं चालावया । सांगाति या मज होणें ॥ १६१ ॥

( हा पाठ काव्यसंग्रहप्रतींतही असाच आहे. यांत लीलाविश्वंभर व मुक्तेश्वर एकच होत व कवि स्वतःला अद्यापि कविकिंकरच म्हणावितो, असें दिसून येईल. )

विसाव्या अध्यायाच्या शेवटीं पहाः—

लीलाविश्वंभरप्रसादें । मुक्तेश्वरअवधूतगुणानुवादें[२५] ।
भारतनलिनीचीं अरविंदें । महदाल्यान सुपक्की ॥

एकविसाव्या अध्यायाच्या शेवटीं आणखी पहाः—

परेश लीलाविश्वंभर । मुक्तीशवाणी[२६] मुक्तेश्वर ।
वदला[२७] तेथें प्रेमादर । सज्जनीं केला पाहिजे ॥

( काव्यसंग्रहप्रतींत वरील ‘ मुक्तीशवाणी ’ बद्दल मुक्तपाणी असा पाठ आहे. येथें कवीनें स्वतःला मुक्तेश्वर म्हणविलें असून आपल्या नांवापासून आपल्या आराध्यदेवतेचें नांव वेगळें दाखविण्याकरितां तिचा मुक्तीश असा निर्देश केला आहे. आपण जें काय बोलतों ते आपले स्वतःचे शब्द नसून आपणास ‘ बोलविता धनि वेगळाचि ’ म्हणजे आपला देव किंवा गुरु आहे असें आपल्या जुन्या कवींचें नेहमीं म्हणणें असतें.

कवि मुक्तेश्वरही असेंच म्हणतो. परेश लीलाविश्वंभर मुक्तीश त्याचीच वाणी आपण बोललों, तिचें सज्जनांनीं प्रेमानें स्वागत करावें, अशी त्याची श्रोत्यांना प्रार्थना आहे. ‘मुक्तपाणि मुक्तेश्वर ’ असा पाठ स्वीकारला तरीही लीलाविश्वंभर व मुक्तेश्वर यांची अभेदताच व्यक्त होते. )

मुक्तेश्वर हें कोणीतरी दैवत आहे, हें आपण पाहिलें कवि मुक्तेश्वर दत्ताला शिवस्वरूपच मानतो. ही गोष्ट अवधूतमूर्ति, पिनाकपाणी, शूलपाणी अशासारख्या त्याला दिलेल्या विशेषणां-वरून कळून येईल.

अशाप्रकारच्या मुक्तेश्वराचें देवालय कोठें आहे कीं काय याचा शोध केला पाहिजे. पैठण नागपूर हैद्राबादकडे मुक्तेश्वराचीं देवालये असल्याचें कळतें. प्रो. वि. भि. कोलते यांनीं

---

२५ पाठांतर—**मुक्तोशअवधूत°**—धु.

२६ **मुक्तपाणी** धु रा.

२७ **वदेल** रा, **वदली** गो.

" स्थान-पोथी " नांवाचा एक महानुभावीय ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. त्याच्या चवदाव्या पृष्ठावर " पौळीबाहीर अग्ने **मुक्तेश्वराची** देउळी पूर्वाभिमुख " असा निर्देश आहे व तो पैठणच्या देवळाचा आहे.[२८] नागपूरलाही मुक्तेश्वराचें देऊळ आहे त्याला ऋणमुक्तेश्वर म्हणतात आणि हैद्राबाद संस्थानांत हिंगोळीजवळ मुक्तेश्वराचें देऊळ आहे, असें प्रो. कोलते कळवितात. डॉ. यशवंत खुशाल देशपांडे यांनीं श्रीऋद्धिपूरवर्णन या पुस्तकांत " **परिशिष्ट अ** " मध्यें स्थानपोथीमधील ऋद्धिपूरवर्णन दिलें आहे. त्यांत " पाटिसाळे मुक्तेश्वराची देउळी " असा उल्लेख आहे.[२९] त्यावरून ऋद्धिपूरमध्येंही मुक्तेश्वराचें देऊळ होतें, असें उघड दिसतें.

उज्जयिनी येथें ' मुक्तीश्वर ', ' ऋणमुक्तेश्वर ' आणि ' अविमुक्तेश्वर ' या देवतांचीं देवालयें आहेत, असें ' उज्जयिनी-मार्गदर्शिका ' या पुस्तकावरून दिसतें.

( १ ) **मुक्तीश्वर**-हें देवालय खत्रीवाड्यांत श्री माळ्याच्या गल्लींत असून " पूर्वी राथंतर कल्पांत मुक्तिनामा ब्राह्मण या शिवलिंगाच्या दर्शनानें मुक्त झाला, म्हणून त्याला मुक्तीश्वर म्हणतात ", असें या पुस्तकांत नमूद आहे.[३०]

( २ ) **ऋणमुक्तेश्वर**—ऋणमोचनतीर्थावर आहे.[३१]

( ३ ) **अविमुक्तेश्वर**—( सिंहपुरींत कुटुंबेश्वराजवळ पूर्वेस ) " काशीक्षेत्रांत जसें विश्वेश्वर तसें हें शिवलिंग दर्शनमात्रेंकरून मुक्ति देणारें आहे, म्हणून त्याला अविमुक्तेश्वर म्हणतात. "[३२]

' कवि मुक्तेश्वरा'बद्दल अविमुक्तेश्वर असा पाठभेद ख रा रा२ या हस्तलिखितांमध्यें आढळतो.[३३] मुक्तेश्वरानें उज्जयिनी पाहिली होती, असें ' तिळभांडेश्वर ' या देवतेच्या निर्देशावरून म्हणतां येतें.

**तिळभांडेश्वर** " मकोड्या आंब्याच्या पश्चिमेस " असल्याचें ' उज्जयिनीमार्गदर्शिकेंत ' नमूद आहे.[३४] 'तिळभांडेश्वराचा' उल्लेख आदिपर्वांत मुक्तेश्वर कसा करतो तें पहाः—

प्रत्यक्ष कासीविश्वेश्वर । स्वरूपाकृति मान्य थोर ।
विशाळ तिळभांडेश्वर । कोणे प्रथम वंदिजे ॥ १०९ ॥ अध्याय ११.

---

२८ **स्थानपोथी**, १९५०. पृ० १४.

२९ **ऋद्धिपूरवर्णन**. पृ० ११३.

३० **श्री क्षेत्र अवंतिका अर्थात् उज्जयिनी-मार्गदर्शिका**, प्र. के. ब. डोंगरे, ग्वाल्हेर, १९३१. पृ० १०५.

३१ तत्रैव, पृ० १२१.

३२ तत्रैव, पृ० ११७.

३३ **आदिपर्व**, अध्याय ४ , ओवी १८८. पृ० ९६.

३४ **श्री क्षेत्र अवंतिका**. पृ० १७१.

उत्तरेकडे आणखीही मुक्तेश्वर प्रसिद्ध आहेत. मिरत जिल्ह्यांत गडमुक्तेश्वर नांवाचें गांव असून तेथें गणमुक्तेश्वर नामक महादेवाचें मुख्य देवालय आहे. याशिवाय मुक्तेश्वरनाथ आणि मुक्तिनाथ या नांवाच्या दोन शंकरांचीं तेथे मंदिरें आहेत. ओरिसाची जुनी राजधानी भुवनेश्वर येथेंही मुक्तेश्वराचें ६–७ व्या शतकांतील अत्यंत सुंदर देवालय आहे. हिमालयाच्या पहाडांत गंडक नदीच्या डाव्या तीरावर मुक्तिनाथ नांवाचें देवस्थान व तीर्थ आहे. पण कवि मुक्तेश्वराचा यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं.

नाशीक येथेंही मुक्तेश्वराचें देऊळ आहे, असें गॅझेटियर पाहिला असतां कळतें:—

"Between the Delhi and Nāv gates, about seventy "yards south-east of Murdeshvar's is the open altar-like "shrine or *chabutra* of Mukteshvar with a *ling*. It is entirely "in the bed of the river, and during the rains is surrounded "with water."[३५]

द्रविडदेशांतही मुक्तेश्वर किंवा मुक्तीश्वर अशा देवता सर्वसामान्य असून मुक्तेश्वराचीं देवळें पुष्कळच आहेत.

(१) मद्रासजवळच्या चिंगिलपुट जिल्ह्यांतील कांजीवरम् या तालुक्यांतील कांजीवरम् किंवा कांचीपूर म्हणजे सुप्रसिद्ध कांचीक्षेत्र येथलि देवालय होय. हें मुक्तेश्वराचे देऊळ पल्लवराजा दुसरा नंदिवर्मा याच्या राणीनें बांधलें.[३६] या देवळाच्या भिंतीवर तीन शिलालेख आहेत.[३७] हे छापून प्रसिद्ध झाले आहेत, पण त्यांची लिपि तामीळ असल्यामुळें मला ते वाचतां आले नाहींत. या देवळांत मुक्तेश्वर म्हणजे शिवलिंग आहे असें मद्रासयुनिव्हर्सिटीचे सुप्रसिद्ध सेवानिवृत्त प्रोफेसर श्री. के. ए. नीळकंठ शास्त्री कळवितात.

(२) दुसरें मुक्तेश्वराचें देऊळ मद्रास इलाख्यांतील गोदावरी जिल्ह्यांतील अमलपुर तालुक्यांत आहे. पैठणहून निघणारी गोदावरी नदी येथेंच सागराला येऊन मिळते. पैठणापासून हा भाग सुमारें चारशें मैल दूर आहे. या देवळांत एक स्थलपुराण म्हणून ग्रंथ आहे. त्यावरून मुक्तेश्वर असें या देवाला नांव कसें मिळालें तें कळतें:—

"The wife of a sage, says the story, was seduced by "a celestial being and cursed in consequence by her husband. "She purified herself by a bath in the Godavari and took to "a life of contemplation. Rama when returning from Lanka

---

३५ **Bombay Gazetteer**, Vol XVI, Nasik, 1883. p. 511.

३६ **History of the Pallawas of Kanchi**, R. Gopalan. 1928. p. 131.

३७ **South Indian Inscriptions**, R. B. H. K. Shastri, 1923, (No. 827–29, pp 285–287).

" took compassion on her forlorn state and persuaded Siva to " give her *Mukti* or beatitude."[३८]

ही कथा इंद्रानें भ्रष्ट केलेली गौतमपत्नी अहल्या हिला अनुलक्षून आहे हें सांगण्याचें कारण नाहीं. याशिवाय आणखी जीं महत्त्वाचीं मुक्तेश्वराचीं देवळें आहेत त्यांचीं स्थळें तेवढीं सांगतों:—

(३) उत्तर अर्काट जिल्हा.[३९] (४) गुंतुर जिल्ह्यांत चिंतापल्ली येथें.[४०] (५) बेलारी जिल्ह्यांत नीलगुंड तालुक्यांत.[४१] (६) त्रिचनापल्ली जिल्ह्यांत.[४२]

या देवळांत शिलालेख असल्यामुळें यांचा उल्लेख मिळाला. पण ज्यांत शिलालेख नाहींत अशीं कांहीं देवळें अनिर्दिष्ट असतील मुक्तेश्वराचा द्रविडदेशाशीं संबंध व्यक्त करणारा अंतर्गत पुरावा, त्याच्या ग्रंथांतच बराच सांपडतो. आदिपर्वाच्या आरंभीं पहिलें विश्वंभराला ( म्हणजे श्रीमुक्तेश्वराला ) नमन केल्याबरोबर दुसरें नमन त्यानें चिदंबरेश्वर या द्रविडदेशांतीलच देवाला केलें आहे. पहाः—

**कैवल्यकनकसभापति । तांडवशंकर उदारकीर्ति ।**
**चिदंबरेश्वर चिन्मूर्ति । कामाटवीदाहक ॥ १० ॥**
जो दशभुज पंचानन । व्याघ्रचर्मांबरपरिधान ।
कर्पूरगौर गजाजिन । शोभला घन चांदिणें ॥ ११ ॥

( चिदंबरम् हें तालुक्याचें गांव मद्रास इलाख्यांत साउथ अर्काट जिल्ह्यांत मद्रासपासून १५४ मैल अंतरावर आहे. येथील मुख्य देवालय चिदंबरस्वामीचें म्हणजे शंकरभवानीचें असून त्याला सभानातिकेनकोवील ( म्हणजे कनकसभा ) असें नांव आहे. **कैवल्यकनकसभापति** असा जो उल्लेख मुक्तेश्वरानें केलेला आहे, तो याच मंदिराला उद्देशून होय. या देवालयाची बांधणी जुन्या शिल्पपद्धतीची असून हिरण्यवर्मा यानें सदर देऊळ बांधल्याचें सांगतात. )

तिसरें नमन तो हंपीच्या विरूपाक्षाला करतो. हाही भाग द्रविडदेशांतील हें सांगण्याचें कारण नाहीं. पहा—

प्रभा शरच्चंद्रकोटी । हळाहळें नीळता कंठीं ।
कुरंग मिरवे करसंपुटीं । विशाळभाळीं कुटिलेंदु ॥ १२ ॥

---

३८ **Madras District Gazetteers,** Godavari, Vol. I, 1907. p. 202.

३९ **A Topographical List of the Inscriptions of the Madras Presidency,** Vol.I, V. Rangacharya, p. 35.

४० *Ibid*, Vol. II, p. 806.

४१ *Ibid*, Vol. I, p 300.

४२ *Ibid*, Vol. III, pp. 1515, 1565.

तया पंपातीरविरूपाक्षा । गौरीवल्लरीकल्पवृक्षा ।
ज्ञानदीक्षागुरु जो दक्षा । शिक्षाकर्त्या दंडवत ॥ १३ ॥

( विजयानगरास लागून तुंगभद्रा नदीच्या काठीं हें विरूपाक्षक्षेत्र आहे. त्याला हंपी-विरूपाक्ष असेही म्हणतात. येथें अनेक देवालयें असून मुख्य मंदिरांत विरूपाक्षेश्वराचें स्वयंभू लिंग आहे. या विरूपाक्षक्षेत्राची मर्यादा मोठी असून तींत रामायणकालीन वालिसुग्रीवाची किष्किंधा नगरी, पंपासरोवर, व ऋष्यमूक पर्वत इत्यादि स्थानें आहेत. येथें जवळच विद्यानगरच्या राजानें पंढरीची विठ्ठलमूर्ति आणून स्थापिली; परंतु एकनाथाचे आजे भानुदास यानें ती पुनः पंढरीस नेली असें प्रसिद्ध आहे. )

चौथ्यांदा नमन करतांना त्याला श्रीशैलमल्लिकार्जुन या द्रविडदेशांतील देवतेची आठवण होते. पहाः—

जयाचा ध्यानोदयाचा वारा । झगटे मनोरूप तरुवरा ।
अविद्याकुसुमीं जीवभ्रमरा । नित्य मुक्तता स्वभावें ॥ १४ ॥
ज्याचें नामचि दिव्य रसु । जिह्वे लागे निमिष्य लेशु ।
तैं संसाररोगाचा नाशु । अनायासें भाविकां ॥ १५ ॥
ऐसिया सायुज्यसुखवर्धना । **प्रणम्य श्रीशैलमल्लिकार्जुना** ।
अशेषकर्मबीजभर्जना— । लागीं शरण रिघालों ॥ १६ ॥

( मद्रास इलाख्यांत कर्नूळ जिल्हा, नंदीकोटूर तालुका येथील एक देवस्थान. याची लांबी ६६० फूट व रुंदी ५१० फूट आहे. मध्यें श्रीमल्लिकार्जुनाची मूर्ति आहे. )

पांचवें नमन पुनः त्यानें द्रविडदेशांतील कांचीचा वरदराज यालाच केलें आहे. पहाः—

आतां अंतरद्वारकाधामीं । जो कां अवाप्तसकळकामी ।
विमळवैराग्यबद्रिकाश्रमीं । नारायण नररूपें ॥ १७ ॥
**कायाकंची-वरदराज** । शामसुंदर चतुर्भुज ।
शंखचक्रगदांबुज । अभयपाणी नेटका ॥ १८ ॥

याचें वर्णन करण्याकरितां आणखी चार ओव्या कवीनें खर्चिल्या आहेत, पण त्या मी येथें उद्धृत करीत नाहीं.

( कांची, कांचीपुरम् किंवा सद्याचें कांजीवरम् हें मद्रास इलाख्यांतील चिंगिलपुट जिल्ह्यांतील तालुक्याचें गांव आहे. कांचीचे विष्णुकांची व शिवकांची असे दोन भाग आहेत. विष्णुकांचींतील मुख्य देवता वरदराज म्हणजे नक्रापासून गजेंद्राची सोडवणूक करणारा विष्णु आहे. त्याचाच उल्लेख या ठिकाणीं मुक्तेश्वरानें केलेला आहे. शिवकांचींतील मुख्य देवता एकांबरेश्वर किंवा एकांबरनाथ म्हणजे महादेव आहे. )

अशाप्रकारें पांच द्रविडदेशांतील देवतांना नमनें केल्यावर आतां तरी एकाद्या महाराष्ट्रांतील देवाची या कवीला आठवण व्हावी? छे! सहाव्या नमनाच्या वेळीं तो म्हणतो,

अवलोकितां पदप्रयाग। सकळ दुरितदोषा भंग।
आठवितां मानसभृंग। दीपला होय पतंगु॥ २३॥
ऐसिया **स्वामी रंगधामा**। कावेरीतटविहंगमा।
चढोवढीं तुझा प्रेमा। हृदयीं वसो माझिये॥ २४॥

(श्रीरंगम् हें प्रसिद्ध क्षेत्र मद्रासइलाख्यांत त्रिचनापल्लीच्या उत्तरेस सुमारें तीन मैलांवर कावेरी नदीच्या बेटांत वसलेलें आहे. श्रीरंगमूला वैष्णवी देवतांचीं अनेक गोपुरें आहेत. त्यांत मुख्य स्वामी रंगधामाचें गोपुर सुमारें २०० फूट उंचीचें आहे.)

इतकें झाल्यावर श्रीगणपति व श्री शारदा यांना मामुली वंदन होतें. पुढें कवि म्हणतो,

ह्मणवुनी देवतारूपें वहिला। येक श्रीगुरु म्यां स्तविला।
अभेदभक्तिचेनि भुलला। आज्ञापितु निजमुखें॥ ४१॥

ही गुरूची आज्ञा काय तर आपल्या नांवानें मुद्रांकित होऊन म्हणजे मुक्तेश्वर हें नांव धारण करून "महाराष्ट्रपदबंधीं भारतकथा विस्तारीं" ही होय. हिचा निर्देश मागें आलाच आहे.

एकनाथाचा पणजा जो भानुदास त्यानें पंढरपुराहून विजयानगराला श्री पांडुरंगाची मूर्ति आणिली हें प्रसिद्ध आहे. एकनाथ हा परम विठ्ठलभक्त हें त्याच्या अभंगांवरून स्पष्ट होतें. पण त्याचें किंवा पैठणच्या किंवा महाराष्ट्रांतल्या दुसऱ्या एकाद्या देवाचें स्मरण मुक्तेश्वरानें ग्रंथारंभीं केलेलें नाहीं. पण आरंभीं नसलें तरी श्री पांडुरंगाचें स्मरण त्याला मुळींच झालें नाहीं, असें मात्र नाहीं. आदिपर्वाच्या बत्तिसाव्या अध्यायाच्या शेवटीं तो लिहितोः—

इति श्रीभारते आदिपर्वणि। कथाभीमा भवनाशिनी।
**सद्गुरुपांडुरंगचरणीं**। स्पर्शो आली प्रवाहें॥ १०४॥
नेमूनि मुक्तेश्वराचें वक्त्र। तेंचि पांडुरंगक्षेत्र।
सभाग्य भाग्याचे पवित्र। श्रवणें सुस्नात जे होती॥ १०५॥

स्वतःच्या कुळदेवतांचें स्मरण तर ग्रंथाच्या अगदीं शेवटास उपसंहार लिहितांना त्याला झालें आहे. पहाः—

**करवीरलक्ष्मी** विष्णुभाजा। **भैरव** सुवर्णपुरींचा राजा।
उभय कुळदैवतीं माझा। मस्तक पायीं स्पर्शिला॥ ८॥

यावरून कर्नाटकांत त्याचें वास्तव्य असावें, ही जी समजूत ती दृढ होते.

अयोध्या, मथुरा, माया, काशी, **कांची,** अवंतिका ।
पुरी द्वारावती, चैव सप्तैता मोक्षदायिकाः ॥

हा भारतांतील क्षेत्रांची नामावलि देणारा श्लोक प्रसिद्धच आहे. उत्तरेकडे काशीसारख्या ठिकाणीं जशीं महाराष्ट्रीय कुटुंबें जाऊन राहात, त्याप्रमाणें दक्षिणेकडे ' कांची ' सारख्या तीर्थयात्रेचे ठिकाणीं जाणें अस्वाभाविक नाहीं. कांचीला रामदासस्वामींचा मठ होता व भगवंत नांवाचा मठाधिपतिही त्या ठिकाणीं होता, असें के. स. खं. आळतेकर लिहितात.[४३] तेव्हां कांचीच्या मुक्तेश्वराच्या आसपास जर या कुटुंबाचें किंवा स्वतः कवीचें वास्तव्य झालें असेल, तर या देवतेची भक्ति जडून त्याचा तो उपासक होणें संभवनीय आहे. आदिपर्वाच्या आरंभीं विष्णु-कांचीच्या वरदराजाला त्यानें नमन केलेलें मीं दाखविलेंच आहे. मुक्तेश्वराचें देवालय शिवकांचींत आहे. आदिपर्वाच्या २६ व्या अध्यायांत त्यानें **शिवकांचीचा** निर्देश केला आहे. पंडूच्या अश्वमेधाच्या वेळचें वर्णन करतांना तो लिहितोः—

कराड आणि कर्णाटक । चोळमंडळादि अनेक ।
देश मल्याळ पंचभर्तारिक । पांडुरायें जिंकिलें ॥ २६ ॥
श्रीरंगपट्टण **शिव-कांची** । समुद्रवासी गडवासी यांचीं ।
स्थळें जिंकूनि दुर्जनांचा । अपार वस्तु आणिल्या ॥ २६ ॥

या वर्णनाला मूळ संस्कृत महाभारतांत आधार असलेला मला आढळला नाहीं. द्रविड-देशांतील तामीळ भाषेचा ठसा मुक्तेश्वराच्या मराठी वाङ्मयावर उमटलेला आहे कीं काय, हें सांगणें शक्य नाहीं. त्याला स्थानिक भाषा अवगत होती, असें गृहीत धरलें तरी मराठी वाचकांकरितां म्हणून लिहिलेल्या ग्रंथांत द्राविडी शब्दांची पेरणी करून आपला ग्रंथ तो मुद्दाम दुर्बोध करील, हें शक्य नाहीं. कांहीं विशिष्ट द्राविडी लकबा त्याच्या वाङ्मयांत आढळत असल्यास द्राविडी भाषा जाणणाराच तें ओळखूं शकेल. मात्र द्रविड देशांसंबंधीचे मूळ भारतांत नसलेले कांहीं उल्लेख त्याच्या वाङ्मयांत आढळतात. पहा—

कटीं कटारे तडक हातीं । उघड आंगीं सत्वर गती ।
तें कर्णाटकयुद्ध म्हणती । रणपंडित निर्धारें ॥ ५५ ॥
आपादमस्तकावरी ओढण । आड करूनि परतें मारण ।
तैलंगयुद्ध तें जाण । आंध्रदेशस्थ बोलती ॥ ५६ ॥

—अ० ३१.

मागील युगाच्या अवसरीं । स्वेच्छाचारें वर्तती नारी ।
धेनुवृषभाचिये परी । संततिदानीं भलताही ॥ १२१ ॥

---

४३ श्रीसमर्थचरित्र, १९३३. पृ० २००.

तो आचार अद्यापवरी । उत्तरदक्षिणेमाझारीं ।
वर्तत असे लोकाचारीं । कुरुपांचाळदेशीं मल्याळीं ॥ १२२ ॥

—अ० २७.

आधींच शंखध्वनीचा उल्हास । त्यावरी पातला फाल्गुनमास ।
कीं व्यभिचारिया मल्याळ प्रांत । दैवयोगें लाधला ॥ ६८ ॥

—अ० ३५.

ह्याच विचार सभापर्वामध्येंही नमूद आहे:—

हा आचार अद्यापवरी । केरळमल्याळसिंधुपारीं ।
दक्षिणदेशीं सर्व नारी । स्वेच्छाचारें वर्तती ॥ १०४ ॥

—अ० ८.

अतिपरिचयादवज्ञेचें हें लक्षण नाहीं ना ? असे जे बरेवाईट द्राविडांसंबंधीं पूर्वग्रह ते तेथील लोकांशीं त्याच्या निकट परिचयाशिवाय निर्माण झालेले दिसत नाहींत. मद्रास प्रांतांतील गोदावरीजिल्ह्यांतील मुक्तेश्वराचे देऊळ पैठणहून आलेल्या गोदावरी नदीनें सुस्नात अशा भागांत जरी असलें तरी तो प्रदेश महाराष्ट्रीयांचें लक्ष वेधण्याइतका आकर्षक व प्रसिद्धही नाहीं. कांचीच्या मुक्तेश्वराचा व कवि मुक्तेश्वराचा जो मीं संभाव्य संबंध दाखविला तो निश्चित करण्यास आणखीही पुष्कळ पुरावा पुढें आला पाहिजे. पैठणच्या मुक्तेश्वराचें देऊळ मी स्वतः तिकडे जाऊन पाहूं इच्छितों. तें आजही तेथें असेल कीं काय हें सांगतां येत नाहीं. याविषयीं चौकशी चालविली आहे. प्रो. कोलते ता. १७–११–५० च्या पत्रांत लिहितात कीं, स्थानपोथींतील मुक्तेश्वराचें देऊळ हल्लीं पैठणला असेल कीं नाहीं सांगवत नाहीं; कारण तो भाग उध्वस्त झालेला आहे. मुंबईसरकारच्या दप्तरखान्याचे प्रमुख डॉ. पु. म. जोशी हे स्वतः पैठणला जाऊन आले व असें देवालय तिकडे नसल्याचें त्यांनीं सांगितलें. कवि मुद्गलानें कोठल्या मुक्तेश्वराच्या प्रेरणेवरून ‘मुक्तेश्वर’ असें मुद्रानाम धारण करून ‘महाभारत’ लिहिलें याचा निश्चय होत नाहीं.[४४]

---

४४ हा निबंध लिहून झाल्यानंतर बऱ्याच दिवसांनी नाशिकचे प्रो. पा. जि. सबनीस यांनीं पांगारकर स्मारकग्रंथांत (१९४९) मुक्तेश्वरावर एक निबंध लिहिलेला माझ्या वाचनांत आला. भरपूर साधनांच्या अभावीही त्यांनी काढलेले कांही निष्कर्ष कौतुकास्पद आहेत. मुक्तेश्वराच्या नांवावर एक विश्वंभराची आरती आहे. ती आरती काव्यसंग्रहांत (मुक्तेश्वरकृत स्फुट काव्यें, पृ० २९४) प्रथम छापिली गेली. पण तिच्या पांचव्या क्रमांकांतील पहिला चरण अपुरा आहे. पद्य—

......पीतीर । जयासंनिध अवतार ।
प्रगटोनी धर्मासी तू पापी तारियले थोर ॥ ५ ॥

हा पहिला चरण प्रो. सबनीस यांनीं आपल्या निबंधांत, ‘उद्दालका तापीतीर।’ असा

मुक्तेश्वराच्यां वैयक्तिक माहितीपेक्षांही त्याच्या अज्ञात काव्यांचा शोध होणें जास्त आवश्यक व महत्त्वाचें आहे. मुक्तेश्वर हें नवें मुद्रानाम धारण करण्यापूर्वी 'चिंतामणिसुत मुद्गल' या नांवानें त्यानें लिहिलेली कविता किंवा नंतर 'मुक्तेश्वर' या नांवाखालीं लिहिलेली कविता या दोहोंचाही तपास केला पाहिजे. यांपैकीं मला उपलब्ध झालेलें पहिल्या वर्गांतील एक पद व एक आरती वर दिलेलीच आहे. दुसऱ्या वर्गांतील अप्रकाशित कविता यथावकाश प्रसिद्ध होईल. 'चिंतामणिसुत' एवढ्याच नांवाखालींहि कांहीं कविता आढळतात त्या मुक्तेश्वराच्या मानतां येणार नाहींत. त्याचप्रमाणें केवळ 'मुद्गल' या नांवाखालीं असलेली कविताही मुक्तेश्वराची म्हणतां येणार नाहीं. रामार्या रचणाऱ्या मुद्गलाशिवाय कृष्णदास मुद्गल, अनंतसुत मुद्गल, दादोसुत मुद्गल असे अनेक जुने मुद्गल कवि मराठींत होऊन गेले आहेत.

कांहीं पदांखालीं मुक्तेश्वर असें मुद्रानाम नमूद नाहीं. पण लीलाविश्वंभराचा निर्देश असल्यावरून तीं मुक्तेश्वराचीं अशीं मानलीं जात आहेत. तीं खरींच त्याचीं आहेत कीं काय, याचाही विचार झाला पाहिजे. विश्वंभर किंवा लीलाविश्वंभर अशा मुद्रानांवाखालींही कांहीं पदें आढळतात. तीं मुक्तेश्वरांच्या वडिलांचीं असल्याचा आमच्या एक संशोधक मित्रांचा समज झाल्याचें त्यांच्या पत्रावरून दिसलें. तो कसा भ्रामक आहे हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल,

मुक्तेश्वराचें उपलब्ध वाङ्मय कोणतें याची खालीं यादी देतों म्हणजे त्याच्या अनुपलब्ध किंवा अज्ञात कवितेचा शोध लावण्यास मदत होईल. प्रत्येक ग्रंथाची अजमासें पद्यसंख्याही कंसांत निर्दिष्ट करीत आहें.

१ **रामायण**–( श्लोकबद्ध–सात कांडें–१७२५ ); २ **महाभारत**–आदि ( ७१२३ ), सभा ( २७०० ), वन ( २७६५ ), विराट ( ९९१ ), सौप्तिक ( ५०० ), भगवद्गीता ( ७०९ ); ३ **हरिश्चंद्राख्यान** ( ६०८ ); ४ **शुकरंभासंवाद** ( ४४६ ); ५ **हनुमंताख्यान** ( ६२ ); **गजेंद्रमोक्ष** ( ३६ ); ६ **शतमुखरावणवधाख्यान** ( ११३ ); ७ **विश्वामित्रभोजन** ( ४६ ); ८ **दुर्योधनशल्यपरिस्फोट** ( ७१ ); ९ **अर्जुनकामपूर्ति** ( ५६ ); १० **मूर्खांचीं लक्षणें** ( ११३ ); ११ **एकनाथ-**

---

दिला आहे. मीं पृच्छा केली असतां हा पाठ त्यांना एका जुन्या आरत्यांच्या संग्रहांत आपणास सांपडल्याचें त्यांनीं कृपापूर्वक कळविलें. या आरतीचा कवि म्हणून मुक्तेश्वराचें तींत नांव नाहीं. विश्वंभराला ती उद्देशून आहे म्हणून ती मुक्तेश्वराच्या नांवावर घातली आहे एवढेंच. तरीपण "उद्दालका तापीतीर" म्हणजे काय याचा शोध करण्यासारखा आहे. तापीतीरावर मुक्तेश्वराचें म्हणजे लीलाविश्वंभराचें देवालय आहे कीं काय याचा तपास झाला पाहिजे.

**चरित्र** ( १४ ); १२ **कुडीआत्म्याचें भांडण** (अप्रकाशित); १३ **पदें**-मुक्तेश्वरकृत स्फुटकाव्यें व विराटपर्वाची नवी काव्यसंग्रहआवृत्ती पहा ; १४ **आरत्या**-गणपति, हनुमंत, बहिरोबा, महालक्ष्मी, तुळशी ( २ ), ज्ञानदेव ( २ ), एकनाथ ( १ ), विश्वंभर; १५ **भूपाळी** गोपाळ.

मुक्तेश्वरानें भागवत लिहिलें आहे असें कविचरित्रकारांनीं[४५] व अलीकडील नवनीताच्या संपादकांनीं नमूद केलें आहे.[४६] त्याचीं कालियामर्दन व अहिमहिआख्यान हीं काव्यें उपलब्ध असल्याचें भावे लिहितात.[४७] वत्सलाहरणही त्यानें रचिलें आहे, असें गोडबोले सांगतात.[४८] ही माहिती खरी आहे कीं काय याचा तपास झाला पाहिजे.

मुक्तेश्वराच्या काव्याचें समालोचन व रसग्रहण आदिपर्वाच्या शेवटच्या खंडांत किंवा एका स्वतंत्र ग्रंथामध्यें करण्याचा विचार आहे. प्रस्तुत निबंधाचा हेतु आमच्या संशोधक-मित्रांना जास्त शोध किंवा विचार करण्यास कांहींतरी साधन द्यावें एवढाच आहे.



---

४५ **कविचरित्र**-जर्नादन रामचंद्रजी, १८६०. पृ० १७८.

४६ **नवनीत**, १९२३. पृ० १७२.

४७ **महाराष्ट्र-सारस्वत** ( भा. १ ला ). पृ० २९२.

४८ **भरतखंडाचा अर्वाचीन कोश**, र. भा. गोडबोले, १८८१. पृ० ४०२.

# मुद्रित मुक्तेश्वर-वाङ्मय

## १ मुक्तेश्वरविरचित.

**आदिपर्व** ( सर्वसंग्रह )-सं० माधव चंद्रोबा, मुंबई : १८६५.
**आदिपर्व** ( काव्यसंग्रह ) सं० वा. दा. ओक, मुंबई : १८९३.
**सभापर्व** ( सर्वसंग्रह )–सं० माधव चंद्रोबा, मुंबई : १८६३.
**सभापर्व** (काव्यसंग्रह)–सं० वा. दा. ओक, मुंबई : १८९४; (आ. २ री १९२७)
**सभापर्व**—सं० द. सी. पंगु, कोल्हापूर : १९४९.
**सभापर्व**—सं० वि. म. कुळकर्णी, पुणें : १९४९.
**वनपर्व** ( काव्येतिहाससंग्रह )—सं० ज. बा. मोडक, पुणें : १८७९.
**वनपर्व** ( काव्यसंग्रह )—सं० वा. दा. ओक, मुंबई : १८९८.
**वनपर्व**—सं० द. सी. पंगु, कोल्हापूर : १९४१; ( आ. २ री १९४६ ).
**विराटपर्व**—( सर्वसंग्रह )–सं० माधव चंद्रोबा, मुंबई : १८६७.
**विराटपर्व**—( काव्यसंग्रह ) मुंबई : १८९९; ( आ. २ री, स० दा. के. ओक, मुंबई : १९३९ ).

**कौतूहलनाटकरामायण** ( सर्वसंग्रह )–सं० माधव चंद्रोबा, मुंबई : १८६४.
**रामायण** ( काव्यसंग्रह )–सं० ज. ना. मोडक व वा. दा. ओक, मुंबई : १८९१.
**सार्थ मुक्तेश्वरी भगवद्गीता**—ना. वा. गुणाजी मुंबई : १९१७; ( ही गीता 'गीतार्थबोधिनी' या ग्रंथांतही आढळते. )

**मुक्तेश्वरकृत स्फुट काव्यें** (काव्यसंग्रह)–सं० दा. के. ओक, मुंबई : १९०६. ( यांत आदि सभा वन विराट हीं पर्वें व रामायण यांखेरीज सर्व कविता आहे. )

## २ मुक्तेश्वरविषयक.

जनार्दन रामचंद्रजी, **कविचरित्र** ( " मुक्तेश्वर ", पृ. १७८. ) मुंबई : १८६०.
ओक, वि. को., **विविधज्ञानविस्तार**, वर्ष ११ ( " मुक्तेश्वर आणि मोरोपंत, " पृ. २४८—२५६ ) मुंबई : १८७९.

**निबंधचंद्रिका**, अं. ४०. ( " मुक्तेश्वर, " पृ. १–२१. ) पुणें : १८८३.
भिडे, बा. अ., **मुक्तेश्वर** ( सरस्वतीमंदिर ) मुंबई, १९०६; ( आ. २ री, प्र. के. भि. ढवळे १९२६ ).

आजगांवकर, ज. र., **महाराष्ट्र-कविचरित्र**, भा. १ ला ( " मुक्तेश्वर, " पृ. ३५–११४. ) मुंबई : १९०७.

पांगारकर, ल. रा., **मोरोपंत**, चरित्र आणि काव्यविवेचन, ( मुक्तेश्वर व मोरोपंत, पृ. ३८१–४. ) पुणें : १९०८.

वैद्य, चिं. वि., **निबंध आणि भाषणें** ( " मुक्तेश्वराचें वनपर्व, " पृ. १४३–१६२. ) मुंबई : १९१५; ( वि. विस्तार, व. ४२, पृ. २४१, मध्यें प्रसिद्ध झालेला निबंध : १९११. )

पटवर्धन, वा. ब., **The Fergusson College Magazine**, Vol. IX, No. 4 ("Mukteshwar", pp. 133–9). Poona, 1919.

पांगारकर, ल. रा., **कविवर्य मुक्तेश्वर**, ( चरित्र आणि काव्यविवेचन. ) पुणें : १९२२.

जोशी, रा. भि., **मराठी भाषेची घटना** ( " मुक्तेश्वर, " पृ० २६६–९. ) पुणें : १९२३.

भावे, ल. वि., **महाराष्ट्रसारस्वत**, भा० १ ला, आ० ३ री ( मुक्तेश्वर, पृ० २८२–३०८. ) पुणें : १९२४.

दीक्षित, द. गो., **मुक्तेश्वराचें महाभारत ( आदिपर्व )**, टीकात्मक निबंध, धुळें : १९३०.

पांगारकर, ल. रा., **मराठी वाङ्मयाचा इतिहास**, खं० २ रा, ( " नाथ व मुक्तेश्वर, " पृ० ४७३–५०४. ) पुणें : १९३५.

पंगु, द. सी., **प्राचीन कविपंचक** ( " मुक्तेश्वर, " पृ० १–२५. ) कोल्हापूर : १९४४.

शरसोदे, कृष्णलाल, **मराठी साहित्यका इतिहास**, ( " कविवर मुक्तेश्वर, " पृ० १२६–१३२. ) प्रयाग : १९४९.

सबनीस, पां. जि., **पांगारकरस्मारकग्रंथ**, भा० १ ला, ( " कविवर्य मुक्तेश्वर, " पृ० २२५–२७५. ) पुणें : १९४९.

नांदापूरकर, ना. गो., **M. M. Prof. D. V. Potdar Commemoration Volume**, ("जनाबाई आणि मुक्तेश्वर," पृ० १०९–११६.) पुणें : १९५०.

जोशी, चिं. नी., **श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन** ( " श्रीधर आणि मुक्तेश्वर, " पृ० ३८०–४४०. ) पुणें : १९५१.

राजवाडे, वि. का., **संकीर्णलेखसंग्रह** ( " मुक्तेश्वर, " पृ० १–१४. ) कोल्हापूर : ( प्रसिद्धिकाल ? )

---

# पहिल्या खंडांतील कथाभाग

---

॥ श्री ॥

# मुक्तेश्वरकृत महाभारत

## ॥ आदिपर्व ॥

### अध्याय पहिला

**श्रीगणेशाय नमः§**

ॐ[1] नमो[2] लीलाविश्वंभरा[3] स्वामी । तुझिये[4] स्वरूपपरब्रह्मीं ।
पंचायतन पंचनामीं । कल्पिजेती[5] अवयव ॥ १ ॥

---

§ ( – ) नि ; **श्रीमहागणपतये नमः** ख ; ( + ) **श्रीसरस्वत्यै नमः श्री गुरुभ्यो नमः**, ( × × ) गो२ ; ( + ) **श्रीसरस्वत्यै नमः श्रीगुरुभ्यो न × × गोपाळकृष्णाय नमः श्रीव्यंकटेशाय नमः श्रीलक्ष्मी × × वल्लभयाद्वेंद्रहरिदासगोपाळसद्गुरुचरणेभ्यो नमः श्रीनिवृत्तिज्ञानेश्वरएकनाथाय नमः श्रीवेदव्यासवैशंपायनाय नमः श्रीदेवकीकृष्णपंचदेवताश्रीमार्तंडभैरवकुळस्वामिने नमः** रा ; ( × × ) औं.

पु मध्यें पुढील दोन संस्कृत श्लोक आहेत :

**भाति सर्वेषु वेदेषु रतिः सर्वत्र जंतुषु ।**
**तरणं सर्वपापानां तस्माद्भारतमुच्यते ॥ १ ॥**
**भारतस्य समुद्रस्य मेरोर्नारायणस्य च ।**
**अप्रमेयानि चत्वारि पुण्यं तोयं गुहा गुणाः ॥ २ ॥**

पु ४ मध्यें आरंभीं " **श्रीगणेशाय नमः श्रीगुरुभ्यो नमः श्रीकुळदेव्यै नमः श्रीकृष्णमूर्तये नमः** " असा मजकूर असून शिवाय वरील पु मधील दोन संस्कृत श्लोक आहेत. दोनही मुळांत अशुद्ध आहेत.

नां मध्यें आरंभीं, **श्रीगणाधिपतये नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः श्रीकृष्णपरमात्मने नमः अविघ्नमस्तु**

**वसुदेवसुतं देवं कृष्णचाणूरमर्दनम् ।**
**देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥**

व वरील दोन श्लोक आहेत.

१. १ ( – ) मुं पु४, **वों** तं ; २ ( + ) **जी** नि ( निपा प्रसंप्रा ) औं गो ; ३ **विश्वं°** नि औं मुं रा गो नां, °**भर** निपा , **विश्वंभर** ख , **विश्वांबरा** गो२ ; ४ **तुझे** पु ; ५ **काल्पिजति** गो२ पु.

तेथें[१] शिव तो[२] निज मस्तक । विष्णुसूर्य द्वय हस्तक ।
सव्य[३] चरण विनायक । वाम तो शक्ति साजिरा[४] ॥ २ ॥
याचा हाचि अभिप्रावो । जे[१] वस्तुवेगळें[२] दुसरें[३] वावो ।
तेथें[४] आननमनें[५] येकात्मभावो[६] । जाणिजे तें[७] निजनमन[८] ॥ ३ ॥
ऐसिया भांडवलाची[१] निज[२] गांठी । गुरुसंकेतें[३] निज[४] मनसंपुटीं[५] ।
बांधोनि मग[६] हे[७] विचित्र[८] शृष्टी[९] । लाभावारी[१०] घेतसें[११] ॥ ४ ॥
कां नाभिपादांत[१] कमळासनु[२] । मध्यकंठांत[३] रमारमणु[४] ।
स्कंधावरुता[५] त्रिलोचनु[६] । अंगत्रयीं जो येकु[७] ॥ ५ ॥
तया परमपुरुषालागीं । अष्टौ[१] भावांच्या[२] अष्टांगीं ।
नमस्कारूनि मग[३] प्रत्यंगीं । सेवासंतोष[४] निवेदुं[५] ॥ ६ ॥

---

२. १ **तेथ** रा गो२ पु , **जेथें** मुं ; २ **जो** मुं तं , **तों** पु , **तोचि** गो२ ; ३ **दक्षिण** ख ; ४ **साजरा** नि , **साजिरी** ख औं पु नां .

३. १ **जो** गो२ , **जें** गो तं , ( – ) नि ख पु मुं औं ; २ **वस्तुवीण** नि ख औं मुं पु·४ ; ३ **दुसरा** स मुं पु४ , **दुजें** औं ; ४ **तेथ** गो२ रा , **जेथें** नि ख मुं ( निपा प्रसंप्रा ), **जेथ** औं , **जें** गो तं ; ५ **वमन** नि, **आनंदमनें** निपा, **अननमनें** तं , **मनें** ख पु·४ मुं औं , **अमन** रा , **जे मन** गो२ , **मन** गो ; ६ **यका**° तं, **एका सभावो** नि ( निपा प्रसंप्रा) , **येकांत**° मुं ; ७ **ती** ख मुं ; ८ **निजबीज** नि ख मुं पु·४ , **निजमन** गो२.

४. १ **भावबळाची** मुं गो·२ ; २ ( – ) नि ख मुं औं पु·४ गो·२ ; ३ **श्रीगुरुसंगें** पु , **गुरुसंगें तें** औं ; ४ ( – ) नि ख मुं औं पु गो·२ ; ५ °**संपुष्टीं** ख पु४ , °**संतुष्टी** औं पु ; ६–७ **हे मग** ख , **हे** औं पु ; ८ ( – ) ख ; ९ **सृष्टी** नि तं गो ; १० **लाभवरी** मुं , °**वरी** नि ख औं , °**वारीं** पु तं ; ११ **घेतसे** नि तं गो.

५. १ **नाभिकमलांत** ख , °**कमळीं** औं पु , °**भिताळ** गो२ ; २ °**ळासन** नि (स प्रसंप्रा) ख मुं औं पु·४ गो·२ ; ३ **कंठांतरिं** औं पु ; ४ °**रमण** नि (स प्रसंप्रा ) ख मुं औं पु·४ गो·२ ; ५ °**वरता** नि ; ६ **त्रिनयन** नि ख वर्ग ; ७ **येक** नि धु गो·२ .

६. १ **अष्टे** गो·२ ; २ [ **भावांचा** असा पाठ तं·२–४ धु२ पु३·४·६ रा३ अशा अनेक हस्तलिखितांत सांपडतो त्यावरून **भावांचां** असा मूळ पाठ असावा असें वाटतें. ]

माथां स्रूनि[1] स्नेहामृत । अंगप्रत्यंगीं[2] मर्दना[3] करित ।
त्या त्या द्वारा[4] सुख भोगित । आत्माराम[5] हृदयस्थ[6] ॥ ७ ॥
अक्षय[1] इक्षुरसाचे[2] बांधे[3] । आळिले[4] हरिहरनामभेदें[5] ।
हेंचि[6] जाणे[7] त्या[8] अभेदबोधें[9] । आवडी उपजे[10] वंदावया[11] ॥८॥
आतां[1] कैलासकंठीरव । काळकुंजरभंजनदेव ।
ब्रह्मेंद्रादि विबुध[2] सर्व । पादपद्मीं[3] पूजा[4] रे[5] ॥ ९ ॥
कैवल्यकनकसभापति । तांडवशंकर उदारकीर्ति ।
चिदंबरेश्वर[1] चिन्मूर्ति[2] । कामाटवीदाहक[3] ॥ १० ॥
जो दशभुज पंचानन । व्याघ्रचर्मांबरपरिधान[1] ।
कर्पूरगौर गजाजिन[2] । शोभला[3] घन चांदिणें[4] ॥ ११ ॥

---

भावांचे मुं ; ३ अंग मुं , (–) गो २ ; ४ °संतोषें नि ; ५ निवेदीं नि , निवेदी स ख मुं, विनोद गो२.

७. १ स्पर्शोनि नि, सु ख , पासोनि मुं निपा , सुदोनि धु, हूनि रा ; २ सर्वांगातें मुं ; ३ मर्दन मुं रा , मर्द्दना औं पु ; ४ द्वारें औं पु , द्वारां मुं ; ५–६ हृदयस्थ आत्माराम ख पु४ .

८. १ अक्षइ मुं पु४ , अक्षै गो ; २ युक्षु° पु४, युक्ष° ख धु पु गो२ ; ३ बोधें मुं गो , निबोधें धु तं [ °रसाचेनि बोधें असेहि वाचतां येईल]; ४ आली धु तं , आळिलीं गो२ , आळिलें मुं ; ५ °नामबोधें गो२ ; ६ हें नि ख औं पु जो मुं ; ७–८ जाणत्या पु , जाणतां ख ; ९ अक्षयबोधभेदें गो२ ; १० (+) त्या तं ; ११ वदावया नि ख मुं , वदाव्या गो२ तं.

९. १ आर्ति ख औं पु , आर्त पु४, अर्ध मुं ; २ विबुद्ध ख मुं रा पु४ , (× ×) गो ; ३ पादालिंगीं ख , पादलिंगीं मुं पु४ , पादालागीं औं पु ; ४–५ साजिरी पु४ .

१०. १ चिदांब° ख मुं औं पु गो२ , (× ×) गो रा , चिंदंबरस्वामी नि ; २ चिन्मयमूर्ती नि , चिन्मोर्ति ख , चिदचिन्मूर्ति पु४ ; ३ कामांतकीदाहकु ख , कामादिकीदा° मुं , कामासविदा° औं पु .

११. १ °चर्मपरि° मुं ; २ जगजीवन ख मुं औं पु४ ; ३ शोभलें गो२ तं , शोभे नि ; ४ चांदणें नि , चांदिणा रा गो .

प्रभा शरच्चंद्रकोटी । हळाहळें[१] नीळता[२] कंठीं ।
कुरंग मिरवे करसंपुटीं[३] । विशाळभाळीं कुटिलेंदु ॥ १२ ॥
तया पंपातीरविरूपाक्षा[१] । गौरीवल्लरीकल्पवृक्षा[२] ।
ज्ञानदीक्षागुरु[३] जो[४] दक्षा । शिक्षाकर्त्या[५] दंडवत ॥ १३ ॥
जयाचा[१] ध्यानोदयाचा[२] वारा । झगटे मनोरूप[३] तरुवरा ।
[४]अविद्याकुसुमीं[५] जीवभ्रमरा[६] । नित्य मुक्तता स्वभावें ॥ १४ ॥
ज्याचें[१] नामचि[२] दिव्य रसु[३] । जिह्वे[४] लागे[५] निमिष्य[६] लेशु[७] ।
तैं संसाररोगाचा[८] नाशु[९] । अनायासें[१०] भाविकां ॥ १५ ॥
ऐसिया[१] सायुज्यसुखवर्धना[२] । प्रणम्य[३] श्रीशैलमल्लिकार्जुना[४] ।
अशेषकर्मबीजभर्जना[५]— । लागीं[६] शरण रिघालों[७] ॥ १६ ॥

---

१२. १-२ **हालाहलनीलता** नि , **हळाहळनी°** ख मुं पु·४ गो·२ नां ; ३ **°संपुष्टीं** औं पु.

१३. १ **हंसरूपी विरूपाक्षा** नि , **हंपिविरूपाक्षा** ख औं पु , **हंसाविरू°** पु४ , **हरविरू°** मुं , **पंपातिविरू°** गो , **पंपासतिविरू°** गो२ ; २ **°वल्लभकल्प°** औं पु गो , ( × ) गो२ ; ३ **°दीक्षे°** पु, **°दीक्षित°** औं , **°दीक्षाश्रीगुरू°** मुं; ४ ( – ) मुं ; ५ **शिक्षा करी त्या** नि .

१४. १ **जयाच्या** तं स औं, **ज्याचा** गो·२ , **याच्या** ख ; २ **ज्ञानोदकाचा** नि , **ध्याने दयेचा** ख , **ध्यानदयेचा** तं ; ३ **मनरूप** मुं पु४ , **मनरुंख** औं ; ४ ( + ) **तेवि** पु ४ , **तैं** गो·२ , **तें** रा ; ५ **°कुसंगीं** ख औं पु·४ , **°कुसुम** मु ; ६ **°भ्रमरां** धु गो.

१५. १ **जयाच्या** नि , **ज्याच्या** औं पु , **ज्याचा** ख, **ज्याचे** मुं ; २ **नामाचा** नि ख मुं औं पु४ , **नाम** गो , **नांवाचा** पु ; ३ **रस** नि ख मुं पु·४ गो·२ ; ४ **जिव्हेसि** नि मुं ; ५ **लागतां** मुं औं , **लागोनि** पु ; ६ **निमिष** नि , **निमिश** रा ; ७ ( – ) औं , **लेश** नि ख मुं पु·४ गो·२ ; ८ **°रोग** ख मुं गो·२ , **°रोगा होय** औं , **°रोग होय** पु ; ९ **नाश** नि ख मुं पु·४ गो·२ ; १० **आनयासें** धु तं , **अनयासें** ख .

१६. १ **ऐशिया** नि ; २ **°वर्धन** ख मुं पु , **सायोज्य°** मुं औं पु·४ तं ; ३ **प्रणाम** नि , **प्रणव** रा गो२ पु·४ तं ; ४ **श्रीशैल्य°** औं पु सोडून इतर ; ५ ° **बीजभंजना** नि , **असत्यकर्मबीजभंजना** मुं औं , **असत्यकर्मबीजभंजन** ख पु ; ६ **करावयालागीं** औं पु ; ७ **निघालों** नि गो , **रिघावें** ख गो२ , **रिघाले** औं पु.

आतां अंतरद्वारकाधामीं । जो कां[१] अवाप्तसकळकामी[२] ।
विमळवैराग्यबद्रिकाश्रमीं[३] । नारायण नररूपें[४] ॥ १७ ॥

कायाकंचीवरदराज[१] । शामसुंदर[२] चतुर्भुज ।
शंखचक्रगदांबुज । अभयपाणी नेटका ॥ १८ ॥

इंदिराहृदयमंदिरनिवासी[१] । स्वानंदवृंदावनविलासी ।
कोटिकंदर्पलावण्यरासी । विरक्त[२] वेधीं[३] वेधले[४] ॥ १९ ॥

मार्तंडकोटि कोटिकिरणीं[१] । मकराकृती[२] कुंडलें श्रवणीं ।
मुक्तमाळा तारका वर्णी[३] । चंद्र तैसा[४] कौस्तुभ ॥ २० ॥

सौदामिनी[१] पटकूलवेशें[२] । लागली चिद्धनाचिये[३] कासे ।
बिंबाधरामाजी सुवासें[४] । दंतरत्नें झळकती ॥ २१ ॥

आकर्णनयन नासा[१] कीर । भाळीं टिळक[२] मनोहर[३] ।
मृगनाभी[४] रेखिली[५] सुंदर[६] । तनू चर्चित[७] चंदनें[८] ॥ २२ ॥

---

१७. १ ( – ) नि खवर्ग ; २ **आवाप्त°** पु·४ धु , **आप्त°** मुं , **अव्याप्त°** गो२ , ( ×× ) गो , **अवाक्ष** तं ; ३ **निर्मळवैराग्य°** गो·२ , **°बदरिकाश्रमीं** नि ; ४ **°रूपी** मुं .

१८. १ **तोचि कांची°** नि , **तोचि काविवरद°** ख मुं , **तोचि कुंदेदिवर** औं पु , **तोचि कंची** नां , **तोचि कैंची°** पु४ ; २ **श्याम°** नि .

१९. १ **इंदिरामंदिरहृदयनिवासी** धु तं औं पु , **°हृन्मंदिर°** ख पु४ नां; २–३ **विरक्तिवेधें** नि , **विरक्त वेधें** खवर्ग ; ४ **वेधलों** नि .

२०. १ **कोटीर किरणीं** तं , **कोटीरविकिरणीं** धु , **किरणीं** औं ; २ **तैसीं मकरा°** नि खवर्ग ; ३ **वरणीं** तं ; ४ **जैसा** मुं.

२१. १ **ऐसा दामिनी** औं पु ; २ **पट्टकूल°** नि ख पु४ मुं नां औं , **पटकुल°** धु ; ३ **जनार्दनाचिये** धु तं , **चिद्गगनाचिये** नां ; ४ **सुहास्यें** औं.

२२. १ **नासीक** नि खवर्ग ; २ **तिलक** नि ; ३ **रेखिला सुंदर** नि खवर्ग ; ४–६ **मृगनाभीचा मनोहर** नि खवर्ग; ७–८ **चंदनें चर्चिली** नि खवर्ग.

अवलोकितां पदप्रयाग[1] । सकळ[2] दुरितदोषा[3] भंग ।
आठवितां[4] मानसभृंग । दीपला[5] होय[6] पतंगु[7] ॥ २३ ॥
ऐसिया स्वामी रंगधामा[1] । कावेरीतटविहंगमा[2] ।
चढोवढीं[3] तुझा[4] प्रेमा । हृदयीं वसो[5] माझिये[6] ॥ २४ ॥
आतां बालार्कबीज[1] कंदीं[2] । विरूढलें[3] हस्तपादीं[4] ।
सगुणसुरंगतेचा[5] उदधि । गजाननु नामियेला ॥ २५ ॥
दिसे सजीव[1] कनकाचळें । स्वरूप धरिलें सहज लीळें ।
रिद्धिसिद्धीचे[2] स्वर्ग[3] जवळे[4] । भोगभरित[5] ज्यापासीं ॥ २६ ॥
देवरुषिगणांचे[1] पाळे । भोगिती स्वर्गापवर्गफळें[2] ।
प्रसाद वोपी[3] या[4] वेगळे[5] । चिदानंद मोदक ॥ २७ ॥
कृपामंदाकिनीच्या जीवनें[1] । चतुर्दशविद्यानंदनवनें[2] ।
पाल्हेजलीं[3] तेथें सुमनें[4] । साधक[5] जाले[6] शिलीमुख[7] ॥ २८ ॥

---

२३. १ **चरणप्रयाग** नि खवर्ग; २–३ **होय सकळ दुरित** नि, **होय सकळ दुरितदोषां** खवर्ग; ४ **अवलोकितां** नि खवर्ग; ५ **दिप** नां; ५–७ **पतंग होय दीपला** नि, **जैसा पतंग दीपला होये** औं पु.

२४. १ **श्रीरंग°** नि, **सारंग°** खवर्ग; २ **°तटिं तुझा निवासमहिमा** औं पु, **°तटिनीविहं°** पु४, **°तटिं विहं°** ख; ३ **चढोचढी** नि, **चढोवाढीं** ख पु४, **चढोवडीचा** धु; ४ **स्वानंद** औं; ५ **बैसो** पु४, **बसे** औं; ६ **माझिया** नि पु·४ गो·२ औं.

२५. १–२ **बालार्क बिजकंदीं** नि; २ **स्कंधीं** गो; ३ **स्कंधीं विरूढला** नि ( **कदंब विरूढला** निपा ), **कंदें विरूढला** पु·४ नां, **कांडें विरू°** रा गो२, **कांडीं विरूढलीं** गो; ४ **हस्तपदीं** ख औं; ५ **°रंगाचा** नि खवर्ग.

२६. १ **साजीव** तं; २ **ऋद्धिसिद्धीचीं** नि, **°सिद्धीचीं** मुं, **रिधिसिधीसी** ख पु४, **रिद्धिसिद्धी** नां पु; ३–४ **स्वर्गफळें** नि खवर्ग, **सोहाळे** गो; ५ **°भरितें** नि, **°भोगित** औं पु.

२७. १ **देवऋषि°** नि गो तं; २ **स्वर्गसुखाची फळें** मुं; ३–५ **ओपिलिया वेगळे** नि.

२८. १ **जीवनीं** मुं; २ **°विद्यावनीं** मुं, **विद्यानंदनें** धु; ३ **पाल्हेजती** नि औं नां मुं पु·४, **पाले°** ख गो२; ४ **सुमनीं** मुं; ५ **साजुक** ख, **सादुक** पु४, **सुटंक** मुं; ६ **जाली** ख, **झाले** नि तं गो२; ७ **षट्पद** नि मुं गो२, **सद्विद्या** ख, **सद्वंद्य** औं पु·४ नां, **शद्वद** रा. गो मध्यें ही ओवी नाहीं.

दंतदिनकराचिये[1] दीप्ती । दवडी[2] विघ्नतमगति[3] ।
नानादर्शनद्वीपावती[4] । जो मध्यस्त[5] गुरुत्वें[6] ॥ २९ ॥
निर्जर काळें[1] जर्जर होती । ते जयाचेनि आश्रयें जीती ।
तो माझिये[2] दुर्बळ मती । हो[3] उन्मेषधनदाता[4] ॥ ३० ॥
आतां सारस्वतफळसंभारीं[1] । कल्पलतिका अति साजिरी ।
ज्ञानगंगेचा[2] ब्रह्मगिरी । वेष[3] ब्रह्मकुमरीचा[4] ॥ ३१ ॥
लोकलावण्यनागरी[1] । शृंगारश्रीपर्वतभ्रामरी[2] ।
साहित्यबाणलिंगाची[3] खरी[4] । विशाळ नदी नर्मदा[5] ॥ ३२ ॥
प्रमयपोतासाची[1] रंभा । विद्यामूळपीठ जगदंबा ।
चातुर्यसौभाग्याची शोभा । कुळस्वामिणी कवींची ॥ ३३ ॥
नवरसांची मंदाकिनी । महिमेनें[1] वाहे त्रिभुवनीं[2] ।
तिहीं[3] लोकां[4] वरदायिनी[5] । देवत्रया पढयंती[6] ॥ ३४ ॥

---

२९. १ **हंतादिनकराची** नि, °**कराची** गो औं, °**कराचे** पु·४ रा गो२ ; २ **पळे** नि खवर्ग, **दवडा** तं ; ३ **विघ्नालंकाररराती** नि औं पु·४, **विघ्नें अंधकार जाती** ख ; ४ **नाना दर्शनें दीपावती** नि गो२ पु, **नाना दर्शनें दिप्तवाती** मुं ; ५ **मध्यस्थ** नि गो तं, **मध्यें** पु४, **मध्यम गुरु** औं, **मध्यमेरु** पु ; ६ **गुरुरूपें** ख.

३०. १ **भयें** नि खवर्ग ; २ **तूं माझे** मुं ; ३ **होऊ** नि, **होइ** मुं; ४ **उन्मेशज्ञातारा** मुं.

३१. १ **सरस्वती फलसंभारीं** नि खवर्ग ; २ **ज्ञानगंगा जे** नि खवर्ग ( **ज्ञानगंगा** मुं ) ; ३ **वेषें** रा, **वसे** गो, **वेश तो** औं पु ; ४ **ब्रह्मकुमारीचा** स पु४ मुं नां, **ब्रह्मगिरीच्या** गो·२.

३२. १ **त्रैलोक्यलावण्यनागरी** खवर्ग, **त्रैलोक्यलावण्यनगरी** नि ; २ °**भ्रमरी** नि ख पु४ नां औं पु ; ३ °**लिंगाचे**, नि पु४, °**लिंगा** गो·२ ; ४ **शिखरीं** नि, **परी** ख पु४ ; ५ **नदी जे** औं पु.

३३. १ **प्रमेयपोतें साची** नि, °**पोतासीची** पु४ धु, °**पोताची** तं, **प्रमेयपार्वती** गो·२.

३४. १ **महिमे** नि खवर्ग, **माहिमेन** गो·२ ; २ **तिहीं भुवनीं** ख पु४ नां गो·२ ; ३–४ **त्रैलोक्यातें** नि खवर्ग गो·२ ; ५ **पददा**° ख मुं नां, **फळदा**° औं पु ; ६ **पढियंती** नि खवर्ग गो. ( मुं रचना ३।१।२।४ )

निगमकामधेनूच्या[1] उदरीं । सारनवनीत दुरीच्या दुरी ।
दोहनमंथनावांचूनि[2] करीं[3] । दे[4] अज्ञानबालका[5] ॥ ३५ ॥
ते[1] सुवाणी[2] शुभकल्याणी[3] । अर्थखाणी[4] सकळा[5] जाणी[6] ।
जीसि निर्वाणिं[7] गिर्वाणी[8] । चतुर[9] सुवाणी[10] याचिजे[11] ॥ ३६ ॥
वीणापुस्तकशुकधारिणी[1] । मौर्ख्यदारिद्रपरिहारिणी[2] ।
पांडित्यदानें[3] सुखकारिणी[4] । ते वंदिली[5] शारदा[6] ॥ ३७ ॥
तिनें अनुग्रहाचा हात[1] । शिरीं ठेविला वरदवंत[2] ।
ह्मणे[3] तुझा मनोरथ । सर्वदा[4] सुफळ[5] माझेनी ॥ ३८ ॥
आतां कथेचें[1] अन्नसत्र[2] । घालीं विश्वामाजी[3] पवित्र ।
तेथें स्वामिणी[4] मी स्वतंत्र । पाइकी मात्र तुवां[5] कीजे[6] ॥ ३९ ॥

---

३५. १ °**धेनूचा [ चां ]** ख नां धु गो२, **धेनूचे** मुं ऑ पु; २ °**मंथनेवां**° रा गो, **तें भारत काढुनी** नि खवर्ग; ३ **सत्वरी** नि खवर्ग (**लवकरी** निपा); ४ **दे मज** ऑ पु, **देव** गो, **वदे** गो२; ५ °**बाळक जे** गो२.

३६. १ **तेच** नि, **तूं** खवर्ग; २ **सुवासिनी** नि धु, **सुवाणी सुचविसी** ख ऑ पु, **सुवाणी शुचि** मुं, **सुवाणी सुचिसी** पु४ नां; ३ **निवाणी** नि खवर्ग [ नि खवर्गामध्यें पहिल्या चरणाचे दोन चरण करून दुसरा चरण तिसरा दाखविला आहे व तिसरा गाळला आहे. ] ४ **आर्तखाणी** ऑ; ५ **सकळां** मुं, **सकळ** नि ख ऑ पु·४ गो नां; ६ **सुजाणी** नि ऑ पु, **सुजनी**, ख पु४ नां, **जनीं** मुं; ७–८ **गिर्वाणी निर्वाणी** गो; ९ **वर** नि खवर्ग गो रा; १०–११ **सुपाणियाची जे** नि ख नां, **सुपाणियासी जे** पु४, **सुवासिणी याचिजे** धु, **सुवाणियासि जे** तं, **सुपाणीयासी दे** ऑ पु. गो२ मध्यें ही ओवी नाहीं.

३७. १ °**पुस्तकधारिणी** नि मुं रा ( निपा प्रसंप्रा ); २ **दुःखदारिद्य**° नि, **दुःखदारिद्र**° खवर्ग; ३ **जे पांडित्य**° नि ख पु४, **जे पांडित्यदाती** मुं, **जे पांडित्यदान** ऑ पु; ४ **सुखखाणी** मुं; ५ **वंदिली म्यां** ऑ पु; ६ **शारजा** ऑ.

३८. १ **त्वरित** नि खवर्ग; २ **वरदहस्त** नि खवर्ग; ३ **ह्मणे रे** खवर्ग; ४ **सर्वथा** तं; ५ **सफळ** गो२.

३९. १ **कथा** खवर्ग; २ °**छत्र** ऑ पु गो·२; ३ **विश्वालागीं** ऑ पु; ४ **अभिमानी** खवर्ग; ५ **तां** धु, **त्वां** नि ख, **तो** तं, **तूं** गो; ६ **करीं** गो.

हो कां डोळसु[1] पायाळ निका[2] । परि गुरुआज्ञेचें[3] अंजन देखा[4] ।
प्रसन्नतेची भाग्यरेखा । नसतां[5] निधान कैं[6] जोडे ॥ ४० ॥
ह्मणवुनी[1] देवतारूपें[2] वहिला । येक श्रीगुरु[3] म्यां स्तविला ।
अभेदभक्तिचेनि[4] भुलला[5] । आज्ञापितु[6] निजमुखें ॥ ४१ ॥
त्या कारुण्यवसंतवातें[1] । मनाचे[2] निर्फळलते[3] ।
स्फूर्तीचे पल्लव[4] पातले[5] तेथें । कवित्वफळीं[6] फळभारू[7] ॥ ४२ ॥
ह्मणे रे[1] बाळकें घेतला थाया । तो[2] साच करोनि[3] दाखवी[4] माया ।
तेवीं त्वां[5] आदरिलें तें[6] वायां । केवीं आह्मीं[7] धाडणें[8] ॥ ४३ ॥
मुक्तेश्वर जो[1] मी[2] अवधूत । माझेनि नामें मुद्रांकित[3] ।
कथा विस्तारीं[4] भारत[5] । महाराष्ट्रपदबंधीं[6] ॥ ४४ ॥
मूळ भारतीं[1] व्यास सांगे । गणेश आपण[2] लिहितां[3] वेगें[4] ।
येथें[5] मी[6] कर्ता[7] लिहिता[8] आंगें[9] । संतप्रार्थना[10] त्वां[11] कीजे[12] ४५

---

४०. १ **डोळस** रा नि गो·२ खवर्ग ; २ **निकें** ख पु४ ; ३ **गुरुचें आज्ञे** नां पु४ , **गुरुआज्ञेनें** ख ; ४ **देखे** ख पु४ , **जें कां** औं ; ५ **असतां** मुं ; ६ **पैं** मुं पु४.

४१. १ **ह्मणे** पु४ ; २ °**रूप** ख पु ; ३ **गुरुचि** नि खवर्ग ; ४ **अभेदभक्तीनेंचि** नि खवर्ग , ५ **भुकेला** गो२ ; ६ **आज्ञापितां** ख मुं पु४ नां , **आज्ञापिता जाला** औं पु.

४२. १ **कारुण्यवसंतातें** नां ; २–३ **मूढमानस शुष्कलते** नि , **मूढमानसनिष्फळलें तें** ख , **मूढमानसनिष्फळलते** पु४ नां , **मूढमानस निःशेष कळतें** औं पु, **मनाचे तरुलते** धु; ४ **पालव** खवर्ग ; ५ **फुटले** नि , **पावले** औं पु , **पाल्हवले** मु ; ६ °**फळे** नि ; ७ °**भारें** नि ख.

४३. १ ( – ) नि खवर्ग ; २ **तें** खवर्ग , **तैं** मुं ; ३ **करिसी** मुं ; ४ **दावी** खवर्ग ( ख प्रसंप्रा ), **कवि** मुं ; ५ **तां** धु पु ; ६ ( – ) खवर्ग ; ७ **आह्मां** नि तं , **शब्दरचना आह्मां** औं ; ८ **दवडणें** नि .

४४. १ ( – ) ख औं ; २ ( – ) नि खवर्ग ; ३ **सुमुद्रां**° नां ; ४ **विस्तारें** ख , **सविस्तारिं** औं पु, **विस्तारी** नि ; ५ **भारथ** धु गो२ ; ६ **मऱ्हाष्ट्रपदप्रबंधीं** स, **मऱ्हाष्ट**° औं , °**बंदीं** औं पु·४ रा .

४५. १ **भारत** नि ख औं; २–३ **लिहितां आपण** पु४नां पु , **लिहिता पैं** मुं , **लिहीत अपुले** ख; ४ **अंगें** ख मुं ; ५ **तेथ** औं पु, **ह्मणे** ख; ६–७ **कर्ता मीं**

**जो मी परब्रह्म नातळें[1] व्यक्तीं । त्या[2] संत माझ्या उत्साहमूर्ती ।**
**त्यांसी[3] जे अनन्य शरण होती । त्यां[4] कैवल्य[5] खेळणें[6] ॥ ४६ ॥**

**जो[1] ऐश्वर्यें[2] न चढे मदा । दरिद्रें[3] दीनत्व न सिवे[4] कदा ।**
**निंदी त्याची न करी निंदा । तो नारायण नररूपें ॥ ४७ ॥**

**परोत्कर्षनिर्वैर[1] मनीं[2] । समानबुद्धि[3] मानापमानीं[4] ।**
**दंभाचारें[5] सांडिला[6] जनीं[7] । तो नारायण नररूपें ॥ ४८ ॥**

**कामक्रोधाच्या भूतसंचारीं । न चळे[1] सुविचारपंचाक्षरी ।**
**परधनपरस्त्रीपासूनि[2] दूरीं । तो नारायण नररूपें ॥ ४९ ॥**

**स्वधर्मकर्पूरगृहा[1] आतौती[2] । जिह्वालिंगप्रदीप्तवाती[3] ।**
**रक्षुनि राहाटे[4] सावध[5] मती[6] । तो नारायण नररूपें ॥ ५० ॥**

---

ख मुं नां; ८ **नव्हे** नि खवर्ग ; ९ **स्वांगें** मुं ; १० **ह्मणोनि संत**° नि , **ह्मणे संत**° खवर्ग ; ११ **तां** नां , **आतां** तं ; १०–११ **अनायासें** औं पु ; १२ **किजैल** औं.

४६. १ **नादलें** तं ; २ **ते** नि खवर्ग ; ३ **परि त्यांसि** ख मुं ; ४ **त्यांसी** नि , **प्राप्ति** पु ; ५ **कैवल्यप्राप्ति** औं ; ६ **खेवणें** रा , **लेखणें** तं.

४७. १ ( – ) मुं ; २ **ऐश्वर्याथैं** नां ; ३ **दरिद्र** नां तं पु , **दरिद्रीं** औं ; ४ **दिसे** धु ; ( चरण२ **दारिद्रीं न सिवे निंदत्व कदा** मुं. )

४८. १ **परोत्कर्षें निर्वैर** नि , °**त्कर्षीं**° रा , **परोपकारी निर्वैर** नां ; २ **मानी** पु४ ; ३ °**बुधी** धु ; ४ **मानाहाणीं** मुं ; ५ **भेदसंचार** निपा , **लोभदंभ** गो ; ६ **सोडिला** निपा ; ७ **मनीं** नि गो२ ( निपा प्रसंप्रा ). नि मध्यें ४८ व ४९ या ओव्यांची अदलाबदल.

४९. १ **छळे** औं ; २ **परस्त्रीपरधना**° ख , **परद्रव्य**° औं , **परस्त्री-परद्रव्या**° पु. मुं मध्यें ही ओवी नाहीं.

५०. १–२ °**ग्रहा आंतौती** ख पु४ मुं धु , °**ग्रहातौती** औं तं; ३ °**प्रदीप्तजाती** पु४ , °**लिंगकृषानुवाति** धु ; ४ **राहे** मुं औं पु ; ५ **शुद्ध** मुं , **स्वधर्म** धु ; ६ **पंथीं** धु , **मूर्ति** तं.

सज्जनश्रोतियां देखोनी दुरी[1] । गर्वस्वपच[2] घाली[3] बाहेरी[4] ।
शिसें[5] झाडी[6] वाट[7] पुढारीं । तो नारायण नररूपें ॥ ५१ ॥

हरिहरनामाचिये जीवनीं । जिव्हा तळपे होवोनि[1] मीनी[2] ।
कुतर्क सिमग्यासमान मानी[3] । तो नारायण नररूपें ॥ ५२ ॥

सुंदर अनामिकाची नारी । श्वानमांस[1] धरिलें करीं ।
तें[2] देखोनि ब्राह्मण सदाचारी । इछा[3] न धरी[4] दोहींची ॥ ५३ ॥

तैसे[1] देहबुद्धीचा[2] हातीं । अमंगळ संसारसंपत्ती ।
ईतें[3] चित्तें[4] साधुसंतीं[5] । कदा[6] कल्पांतीं[7] नातळीजे ॥ ५४ ॥

मी उंच[1] पैल[2] हीन । याचेंचि[3] नांव[4] देहाभिमान ।
तो अभिमानु[5] गेलिया श्वान[6]- । सूकरादि[7] भासे गुरुत्वें[8] ॥ ५५ ॥

---

५१. १ **नेत्रीं** नि गो॰२ खवर्ग ; २ **जो गर्व स्वयेंचि** नि, **जो गर्व॰** खवर्ग , **जो गर्व स्वयें** स , **गर्वश्वापद** गो॰२ ; ३ **दवडी** नि खवर्ग ( **दवडोनी** पु४), **दवडिती** रा गो॰२ ; ४ **दुरी** नि गो॰२ खवर्ग ; ५ **शीषें** नि, **शिष्य** औं पु ; ६–७ **वाट झाडी** नि खवर्ग .

५२. १ **जेविं** पु ; २ **मनी** पु४ मुं ; ३ ( + ) **मनीं** ख . औं मध्यें ही ओवी नाहीं.

५३. १ **स्वानमांश** धु ; २ ( – ) नि गो रा खवर्ग ; ३ **इच्छा** नि , **इत्सा** पु४ ; ४ **करी** पु४ . मुं औं पु मध्यें ही ओवी नाहीं.

५४. १ **तैसा** ख , **तैसें** मुं गो॰२ , **तैशा** औं पु ;२ ॰**बुधीचा** धु , ॰**बुद्धीचे** नि , ॰**बुद्धीच्या** पु ; [ **बुद्धीचा** असा मूळ पाठ असला पाहिजे. ] ३ **मनें** नि खवर्ग ; ३–५ **मनेंचि तैसा साधु चित्तीं** मुं ; ४ ( – ) तं , **चितें** नां गो॰२ ; ५ **साधुसंगती** नि , **सावधसंतीं** औं पु ; ६–७ **कल्पांतीं कदा** पु.

५५. १ **उत्तम** नि रा गो॰२ खवर्ग ; २ **पहिला** रा गो ; ३–४ **हा देहीं दृढ** नि , **हा दृढ भाव** ख, **हा दृढ देहीं** औं नां पु॰४ ; ५ ( – ) नि खवर्ग ; ६ **मग शूकरश्वान** नि खवर्ग ; ७ **सर्व** नि खवर्ग ; ८ **गुरुरूप** नि खवर्ग.

**ह्मणोनि[१] शिष्याचेंहि[२] पायवणी । सद्गुरु[३] नेघे[४] मस्तकीं[५] वंदुनी[६]**
**तवंवरी[७] ब्रह्मसुखाची काहणी । कैंची लाधे[८] तयातें ॥ ५६ ॥**
**ऐसिया[१] संताचे[२] जे दास । ते इंद्रचंद्रादिकांचे[३] ईश ।**
**त्यांचे प्रसादीं[४] सावकाश । रिद्धिसिद्धी[५] वोळगती[६] ॥ ५७ ॥**
**ऐसें गुरुवाक्य होतां[१] क्षणीं । जे जे संत इहीं[२] लक्षणीं ।**
**असती त्यातें लोटांगणीं । दंडवत प्रीती[३] पावो[४] ॥ ५८ ॥**
**आतां प्रसंगासारिखें पाहीं[१] । असंतांचीं लक्षणें कांहीं[२] ।**
**वैगुण्य[३] सांडावया देहीं । साधकजनीं जाणावें[४] ॥ ५९ ॥**
**भेटतां[१] भेटवी[२] क्रोध काम । ज्या भूतद्रोहो[३] नित्योद्यम[४] ।**
**स्वार्थालागीं हिंसाधर्म[५] । सदाचार[६] जयाचा[७] ॥ ६० ॥**
**जाणिवेचें मदिरापान[१] । करुनि[२] सैरा[३] वाजवी[४] वदन ।**
**हेळणछळणाचे[५] पाषाण । साधूकडे[६] झुगारी ॥ ६१ ॥**

---

५६. १ **ऐसिया** नि खवर्ग (**ऐसिये** मुं), **ह्मणउनी** तं ; २ **सिद्धांचें** नि खवर्ग ( **सिद्धीचें** मुं ); ३ **जंववरी** पु·४ , **जवं** नि नां , **जोंवरी** मुं औं ; ४–५ **न घेई माथां** नि , **न घेइजे** खवर्ग ; ६ **वदनीं** रा गो·२ ; ७ **तोंवरी** औं गो२ ; ८ **लाभे** नि खवर्ग.

५७. १ **ऐसे** गो२ खवर्ग ( औं प्रसंप्रा ); २ **संता** पु४ ; ३ **इंद्रचंद्राचे** नि तं , **इंद्रादिकांचे** मुं ; ४ **प्रसादें** नि गो खवर्ग ( **प्रकाशें** नां ) ; ५ **ऋद्धि**° नि तं ; ६ **वोळंगतो** नि. गो२ मध्यें हो ओंवी नाहीं.

५८. १ **होत** गो·२ ; २ **इह** ख मुं औं पु गो२ ; ३ **प्रति** रा धु गो , **माझें** नि ; ३–४ **पावो माझें** औं.

५९. १ **कांहीं** नां ; २ **पाहीं** नां ; ३ **वैगुण्यें** धु , **अवगुण** नि खवर्ग ; ४ **जाणावीं** नि , **जाणावे** ख स.

६०. १ **भेदतां** स पु४ , **भेदता** ख मुं नां पु , **भेदकां** निपा , **भेदें** औं , २ **भेदवी** खवर्ग , **अभेद** निपा ; ३ °**द्रोहीं** नि ख धु गो२ , °**द्रोह** रा गो ; ४ **नित्य नेम** नि , **नित्य धाम** औं पु·४ ; ५ **हिंसाकर्म** नि औं , **ही अधर्म** नां ; ६ **सदाचारही** गो·२ ; ७ **तयाचा** औं.

६१. १ **मांदिरीं आपण** मुं ; २ **करी** नि खवर्ग ; ३ **राहाटे** नि ख पु४ , **राहाटवी** मुं , **राहाटीत** नां , **राहाटी** औं पु ; ४ **वाजे** गो·२ तं , **जयाचें** नि , **त्याचें** खवर्ग ; ५ °**छळणेचे** मुं औं पु ; ६ **साधूवरी** मुं.

तपोशब्दांचिया[1] चिंधिया । गुंडुनि[2] देहनाम बाहुलिया[3] ।
वाचेचिया चौबारिया । ज्ञान देती पोषणें ॥ ६२ ॥

लोभमल्लारीचा[1] चोहटां[2] । दांभिक[3] वाघे[4] हळदीकुटा[5] ।
मिथ्याचारें लावोनि पोटा[6]— । साठीं[7] श्वान जे[8] जाले[9] ॥ ६३॥

वेदशास्त्राचें[1] सदन । सांडुनी[2] फळतें[3] नंदनवन ।
पाषांडाची[4] बरडे[5] जाण[6] । अनीश्वरवादें सोकरी[7] ॥ ६४ ॥

आगमअभिचारिकपंथीं[1] । दिवाभीत माजले[2] रातीं ।
राहाटों नये ते ते रीती । विहिताचार जयांचा ॥ ६५ ॥

भक्षित[1] परनिंदेची विष्ठा । पापदेह[2] पोसिती मोठा[3] ।
शूकरकुकर्माचे[4] वाटां[5] । कुसंगसंगीं[6] चालती[7] ॥ ६६ ॥

---

६२. १ तपोव्रताचिया नि ( तपोवृत्ताचिया स ), तेणे श्रेष्ठाचिया पु४ तपोश्रेष्ठाचिया खवर्ग ( तपोष्टाच्या मुं ); २ गुंडाळोनि नि ; ३ आहुतिया औं पु.

६३. १ °मल्लारीच्या [ °मल्लारीचां] औं ; २ चोहोटा नि , चोहटा मुं ना गो·२ तं; ३–४ दांभिकता ही नि ; ४ बाह्य ख मुं नां , वादें गो·२ पु४ , वाहे औं पु , वाद्ये तं , वाघ धु ; ५ °पुटा औं पु ; ६ ललाटा मुं ; ७ पोटासाठीं मुं, त्यासाठीं धु ; ८–९ जाले ते पु·४ . ह्या ओवीचा क्रमांक नि व खवर्गमध्यें वरोल ६५ नंतर आहे.

६४. १ देवत्रयाचें निपा, वेदत्रयाचें खवर्ग , °शास्त्राचार्य रा गो·२ ; २–३ सकळतेचें सांडोनि नि , फळतें सांडुनि खवर्ग ; २ खांडुनी रा गो , खुंडुनी गो२ ; ४ पाखांडाचें गो , पाषांडाचें नि ; ५ बीरडे धु पु४ , बरडें नि ; ६ रान नि ; ७ सोकारी नि , सोंकारी नां औं पु , शोककरी मुं.

६५. १ °अनिवारक पंथी ख, °व्यभिचारिक° पु४ , °अविचारिक° पु ; २ जाले नि खवर्ग.

६६. १ भक्षिती नि ; २ पापें देह मुं , पापदेहो औं गो·२ ; ३ खोटा औं ; ४ सूकरकुकर्माचा नि ; ५ वांटा नि , चोहटा ख ; ६ कुसंगींच नि ; ७ घालिती नि , पाळिती मुं.

वाचे[१] सत्याचा[२] विटाळ। इंद्रियनेमाचा[३] पिसाळ[४]।
कामनाकामाक्षी[५] गोंद्ळ[६]। अखंड घाली मानसीं ॥ ६७ ॥
येका अवगुणाची मासी। दावुनि सत्कविकथारसीं[१]।
अनंतगुणांचे[२] गोड ग्रासीं। अरुचि आणी भोजना ॥ ६८ ॥
आपुल्या कवित्वाचा कवडा[१]। मिरवी सधनसभेपुढां।
साटी करिन[२] ह्मणे होडां[३]। महंत[४] कविरत्नांसीं ॥ ६९ ॥
एवं असंत[१] ह्मणिजे[२] जयातें। त्यासही प्रार्थी आदरें बहुतें।
आमंत्रणा[३] येइजे[४] येथें[५]। कथापीयूषभोजना[६] ॥ ७० ॥
श्रीगुरुआज्ञेच्या[१] आदरें। पवित्रकथेच्या बडिवारें।
दुष्ट गुणाचें हें[२] वारें[३]। दुःखदरिद्र[४] हरेल ॥ ७१ ॥
ऐसें आज्ञापितां[१] वहिला। अविवेकाचा विटाळ फिटला[२]।
ह्मणउनि आचार्यपादुका जाला। स्पर्शावया अधिकारु ॥ ७२ ॥
व्यास[१] वेदांती[२] नेटका[३]। जयमुनि[४] वसिष्ठमीमांसका।
आणि गौतमनैयायिका[५]। दंडप्रणाम[६] सद्भावें ॥ ७३ ॥

---

६७. १ **वाचेसि** गो·२ तं ; २ **त्याचा** गो·२ तं ; ३ °**नियमाचा** नि धु ख पु४ ; ४ **इसाळ** नि ख गो·२ , **विसाळ** पु४ , **विशाळ** पु , **विषाळ** औं ; ५ **कामिनीकामाशीं** नि , **कामिनिकाक्षि** पु४ ; ६ **गोंधळ** नि पु४ ख.

६८. १ **सत्कथाकविरसीं** खवर्ग ; २ **आनंदगुळाच्या** नि , **आनंदगुणाचे** खवर्ग , °**गुणाचां** तं२ , °**गुणांचा** धु , **अन्नदगुणाचा** तं.

६९. १ **कुवाडा** नि पु ((+) ख पु४ ) , **पवाडा** मुं औं ; २ **करी** नि ख ; ३ **होडा** धु नां औं सोडून इतर ; ४ **महान्** नि , **महत्** औं पु , **महत्त्व** धु तं.

७०. १ **असत्य** मुं नां ; २ **ह्मणती** नि ; ३ **आमंत्रणें** नि ; ४ **देइजे** गो२; ४–५ **ये स्वच्छाचित्तें** मुं ; ६ **कथामृतभोजना** धु.

७१. १ **श्रीगुरुच्या आज्ञे** नि ; २ ( – ) नि खवर्ग ; २–३ **त्रिविधशारें** औं ; ४ °**दारिद्य** नि.

७२. १ ( + ) **चि** नि ; २ **फिटला** गो·२ , **फुटला** मुं , **फाटला** आ.

७३. १ **आतां व्यास** नि खवर्ग ; २ **वेदांत** पु४ , **वदतां** मुं ; २–३ **वेदांतिका** औं ; ४ **जैमिनी** नि नां ( **जयमिनी** स ), **जयमिनि** ख पु४ मुं औं गो ;

सांख्याचार्य कपिल मुनि । भाष्याचार्य[1] परमज्ञानी ।
पातांजळ[2] सहस्रफणी । शेष[3] विशेष[4] वंदिला[5] ॥ ७४ ॥
गौडपाद श्रीशंकरु । विवर्णाचार्य[1] श्रीधरु ।
टीकाकारांमाजी चतुरु । नमस्कारिले[2] गुरुरूपें[3] ॥ ७५ ॥
प्राकृतकवीश्वराचार्य[1] । ज्ञानदेव ज्ञानैकवर्य[2] ।
जयाचे बुद्धीचें गांभीर्य । अगाध सिंधूसारिखें ॥ ७६ ॥
त्याचे[1] चरण चिंतिले मनीं । तेणें पावन जालों जनीं ।
मातृजनक जनार्दनी[2] । येकनाथ नमियेला ॥ ७७ ॥
आतां वंदूं[1] सभासमुद्र । येथें जन्मला चातुर्यचंद्र ।
बोधसुधेचा सुधेंद्र । जीवन[2] जिज्ञासचकोरां[3] ॥ ७८ ॥
अखिलनिगमाचिये जीवनीं । शास्त्रकल्लोळाचिये[1] वेणीं[2] ।
पुराणगाथे[3] तरंगिणी । युक्तिवार्ते[4] उचलिती[5] ॥ ७९ ॥

---

५ °नय्यायका ख पु४ नां मुं , गौतमादि° औं ; ६ दंडप्रमाण रा गो॰२ , दंडप्रणम्य खवर्ग.

७४. १ भीष्माचार्य निपा , भारद्वाजाचार्य ख औं पु , भटाचार्य नां , भद्राचार्य पु४ ; २ पतंजली नि , पाताळ धु ; ३ भाष्य खवर्ग निपा ( भविष्य मुं ) ; ३–४ भूविशेषीं औं पु ; ४ विशेषें नि ख नां पु४ ; ५ वंदिले औं पु , वदविले ख नां पु४.

७५. १ विवरणा° नि ; २ तयां नमिलें औं पु ; ३ गुरुमुखें रा, गुरुत्वें गो२.

७६. १ °कविविश्वाचार्य मुं ; २ गुणैक° मुं.

७७. १ यांचे धु , ज्याचे गो॰२ ; २ विनयें मनीं औं , जननी पु.

७८. १ नमूं धु नां ; २ जिववी नि ; ३ जिज्ञासूचकोरा नि , जीवचकोरां गो.

७९. १ °कल्लोळाचि मुं औं गो२ ; २ त्रिवेणीं नि मुं , खाणीं गो२ ; ३ °गाथेची नि , पुराणकथा मुं , °गायित्री नां , पुराणगंगा औं , पुराण अगाध गो , °गातां गो२ ; ४ उक्ति° नि, उक्तिवंत नां औं पु , °वाचे तं ; ५ उचंबळती मुं नां.

विद्वज्जन[1] रत्नांचे पुंज[2] । ज्ञानविज्ञानें[3] अतिसुतेज[4] ।
पवित्रपणें तीर्थराज । गंभीर[5] ते[6] अगाध[7] ॥ ८० ॥
न्यायगुरुमर्यादावेळा[1] । जेथें नुलंघे[2] कदा काळा[3] ।
तया परमपुरुषांचा मेळा[4] । सिंधुरूपें नमियेला[5] ॥ ८१ ॥
तेथील[1] श्रोते हो परिसणें[2] । तुमचे[3] अवधान परिसें[4] येणे[5] ।
माझें वग्त्रुत्व[6] लोह[7] हें[8] उणें[9] । होईल[10] अमोल्य[11] कांचन ॥८२
मग जगाचिया[1] कर्णभूषणा । योग्य होईल निश्चयें[2] जाणा ।
यालागीं तुमतें[3] पुनःपुन्हां[4] । प्रणिपातु साष्टांगीं ॥ ८३ ॥
धरवेना तें धरिलें मनीं । तें सिद्धी पाववा कृपेकरुनी ।
जेवीं[1] वानरां[2] स्वेतबंधनीं[3] । सामर्थ्य देता रघुनाथ ॥ ८४ ॥
अंजुळी[1] वोडवी[2] सिंधोदका[3] । ब्रह्मांड उचलूं ह्मणे अळिका ।
तुह्मीं कराल[4] तरी[5] हो[6] नये[7] का[8] । साह्य[9] अगस्ति[10] कां[11] शेषु[12] ८५

---

८०. १ **बुधजन** नां, **विद्यासज्जन** औं पु ; २ **पूज्य** मुं, **कुंज** औं ; ३ °**विलासें** नि ( स प्रसंप्रा ), °**विज्ञान** खवर्ग ; ४ **सुतेज** ख मुं तं ; ५ **भागीरथी** नि खवर्ग, ६ ( + ) **चा** धु, ( – ) नि ख औं ; ७ **अगाध ते** नि ख.

८१. १ °**वेळ** खवर्ग ( °**वेगळा** मुं ), °**मर्यादेवेगळा** गो·२, °**वेगळा** तं ; २ **नुलंघवे** नि ; ३ **काळ** खवर्ग ; ४ **मेळ** खवर्ग ; ५ **नेमियेला** तं.

८२. १ **येथील** नि ; २ **परिसपणें** नि ख मुं नां ; ३ ( – ) रा ; ४ **अवधानस्पर्श** नि, **अवधान हो** ख मुं ; ५ **तेणें** नि खवर्ग ( **देणें** औं ) ; ६ **वक्तृत्व** नि तं औं पु ; ७–९ **हें लोहगुणें** नि, **लोह हीणें** धु ; १०–११ **अमोल्य होईल** नि खवर्ग.

८३. १ **जयाच्या** नि ; २ **निश्चय** नि ख तं ; ३ **तुह्मांतें** नि ख औं पु·४ ; ४ **पुन्हापुन्हा** नि ( स प्रसंप्रा ), **पुन्हपुन्हा** धु.

८४. १ **कीं** नि ; २ °**रांतें** ख गो·२, °**रांचे** मुं, °**रां हातीं** पु ; ३ **सेतुबंधनीं** नि रा ख औं, **श्वेत**° तं.

८५. १ **अंजळी** नि ( स प्रसंप्रा ) ; २ ( – ) गो·२ ; ३ **सिंधूदका** नि ; ४–८ **शेष होउनियां देखा** खवर्ग, **सिष्ट ह्मणोनि देखा** मुं ; ६–८ **होय निका** नि ; ९ **तोचि** नि, ९–१२ **साह्य करणें मजलागीं** निपा खवर्ग ; ११ **कीं** नि.

वेदशास्त्र स्मृतिपुराणें[१] । नाना इतिहास व्याकर्णें[२] ।
गाळूनि यांचीं[३] रसायणें । द्वैपायनें कुशळतें[४] ॥ ८६ ॥
सुरस[१] सुंदर[२] पवित्र शृष्टी । बोनें[३] निपजवुनी पाठीं ।
संस्कृतशब्दसुवर्णताटीं । श्रेष्ठश्रेष्ठां[४] वोगरिलें[५] ॥ ८७ ॥
तेचि[१] रसोय[२] दुर्बळपणीं । महाराष्ट्रभाषारंभापर्णीं[३] ।
वाढिली[४] तरी[५] भुकाळु जनीं । न सेविजे किमर्थ ॥ ८८ ॥
समर्थपणें कविपंडितीं । सर्वज्ञतेच्या[१] रत्नदीप्तीं ।
गीर्वाणपद्योत्तरीं[२] निगुतीं[३] । कनककमळीं[४] आर्चिजे[५] ॥ ८९ ॥
तेथ[१] हा[२] भावार्थाचा[३] बेल[४] । धत्तुरपुष्प[५] आम्रुचे[६] बोल[७] ।
अल्पमतिचेनि मोल[८] । काडवाती[९] केउतीं[१०] ॥ ९० ॥
तथापि दोहीं ठायीं सरिसा । मोहो कराल हा भरंवसा ।
सानें[१] थोर हें[२] महेशा । भजतां असे कडसणी ॥ ९१ ॥

---

८६. १ श्रुतिपुराणें मुं धु तं ; २ व्याकरणें नि पु·४ नां, व्याख्यानें औं ; ३ विचार नि खवर्ग ; ४ कुशलत्वें नि ख मुं.

८७. १–२ सुंदर सुरस मुं औं पु ; २ सुंदरी नि ; ३ पक्कान्नें नि खवर्ग ; ४ °श्रेष्ठें तं ; ५ ओगरिलीं नि.

८८. १ तेंचि नि खवर्ग ; २ रसायण नि खवर्ग , रससोये धु , रसाळ गो२ ; ३ मार्‍हाष्ट्र° ख नां औं ; ४ वाढिती धु , वाढिलें नि ; ५ जरी ख , ते परि नां .

८९. १ सर्वज्ञेच्या धु तं ; २–३ निर्गुणनिर्विकार पशुपती नि खवर्ग ; ४ कनकपुष्पीं मुं ; ५ अर्पिजे रा गो·२.

९०. १ तेथें नि , जेथें मुं , येथ नां ; २ ( – ) नि खवर्ग ; ३ भावार्थी मी नि खवर्ग , सामर्थ्याचा धु तं , भावार्थाचि गो ; ४ दुर्बळ नि खवर्ग , बोल गो·२ तं , दुर्बळें औं पु ; ५ °पुष्पें पु४ गो·२ तं ; ६ माझे नि खवर्ग (मिसें औं पु); ७ भोळ तं , बोले औं , बोलिलें पु ; ८ मोलें औं पु ; ९ काढविती नि खवर्ग ( नां प्रसंप्रा ); १० ते केवीं नि खवर्ग , ते केवीं घडे औं पु.

९१. १ कां सान नि , कां साने खवर्ग ; २ ( – ) नि खवर्ग.

आणि ईश्वरस्वरूपीं[१] डोळस । त्यांसी वर्णावर्णीं[२] द्वेष ।
नुपजे जैसा सूर्यप्रकाश । नेणें प्रकाशतमातें[३] ॥ ९२ ॥

तेवीं[१] अर्थीं घालितां दृष्टि । न[२] ह्मणे संस्कृत मऱ्हाठी[३] ।
रत्नकुंभीं[४] कां[५] मृद्धटीं[६] । गंगोदक[७] सारिखें[८] ॥ ९३ ॥

श्रोते ह्मणती नवलप्रीती[१] । आमंत्रणींच जाली तृप्ती ।
पुढील भोजनाची[२] गती[३] । अनिर्वाच्य[४] सर्वथा[५] ॥ ९४ ॥

आतां वक्तिया पावलें[१] सर्व । कथा आरंभीं अति अपूर्व ।
संमंध[२] लावीं पर्वीं[३] पर्व । अनुसंधानशृंखळे[४] ॥ ९५ ॥

जी जी प्रसाद ह्मणोनि वक्ता । नमस्कारूनि होय बोलता ।
तेचि सादरें परिसा[१] आतां । कथा कळिमळनाशनी ॥ ९६ ॥

आधींच भारत महासमुद्र[१] । वरी विस्तारी कवीश्वर ।
तरी[२] श्रोतियां भासे[३] भयंकर । विवर्तिं पडलियासारिखें ॥ ९७ ॥

---

९२. १ विश्वरूपीं मुं ; २ वर्णावर्ण खवर्ग , सुवर्णवर्णीं मुं ; ३ कदा तमातें नि खवर्ग ( कदा मातें मुं ) , प्रभा तमातें त.

९३. १ तैसी मुं , जेथ औं ; २ ( – ) खवर्ग ; ३ आणि मराठी मुं , माऱ्हाष्ट्री औं तं , मऱ्हाष्ट्री ख , माहाराष्ट्री पु ; ४ रत्नकुपीं मुं औं पु ; ५ कीं नि ; ६ मृत्तिकाघटीं नि , अमृतघटीं औं पु , अमृतवृष्टिं नां ; ७ गंगादका नां औं पु , गंगादकें ख पु४ ; ८ सारिखा ख.

९४. १ °प्रती गो२; २ भोजनाचे खवर्ग ; ३ अंतीं खवर्ग ; ४ गोडी अनिर्वाच्य खवर्ग ; ५ परियेसा गो२.

९५. १ पावलों नि ; २ संबंध नि , समंधें पु४ मुं , समंधी ख , सुपंथें गो , सुगंध गो२ ; ३ पर्वें खवर्ग गो२ ; ४ °संधान लागलें खवर्ग ( °संधान चांगलें औं , पु४ प्रसप्रा ).

९६. १ परियेसा पु४ , परिसत औं.

९७. १ हा समुद्र नि खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ) ; २ ( – ) ख मुं ; ३ भासेल नि औं पु४ .

उपोद्घातें[1] वेटाळित । सिंहावलोकनें पडिताळित[2] ।
चतुरश्रवणचातकां[3] गमत । अमृताची वाकुडी[4] ॥ ९८ ॥
ह्मणोनि कथा न ये गाळितां । सविस्तर[1] न ये पाल्हाळितां ।
जैसें विहितकर्म कर्ता[2] । थोडेन सांग संपादी ॥ ९९ ॥
आतां[1] उग्रश्रवा लोमहर्षणी । सौति[2] पुराणिक सज्ञानी[3] ।
आर्तवंत[4] ऋषिदर्शनीं । नैमिषारण्या[5] पातला[6] ॥ १०० ॥
तेथें द्वादशवार्षिक[1] सत्र[2] । शौनकें आरंभिलें विचित्र ।
मिनले ब्रह्मरुषी पवित्र । संशितवृत्ति[3] अपार[4] ॥ १०१ ॥
ते[1] मुनिवर्य[2] देखोनि दृष्टी । भावें[3] जोडला[4] करसंपुटी[5] ।
नमस्कार धरिणीतटीं । सकळिकांतें घातला ॥ १०२ ॥
सन्मानुनी परम ऋषि[1] । आदरें आसन दिधलें त्यासी ।
गौरवुनी ह्मणती कैसी । लाभवेळा आजिची[2] ॥ १०३ ॥

---

९८. नि व खवर्ग मध्यें दुसरा चरण पहिला म्हणून घातला असून दुसरा चरण " **अविवेकी तेथें वेडा ( वेडाळूं** नि **) लागत** " असा आहे.
१ **उपाधिघात** धु, **उपाद्धातें** रा, **उपाद्यातें** गो·२ ; २ **पडिताळितां ग्रंथ** नि खवर्ग ; ३ **श्रवणें चातकां** नि खवर्ग, ( **श्रोते** मुं ) ; ४ **बा कुपी** नि, **वाकडी** खवर्ग.

९९. १ **सुविस्तारें** नि ; २ °**कारितां** ख मुं औं पु धु .

१००. १ (–) नि खवर्ग गो·२ रा ; २ **ऐसा** खवर्ग, **श्रोती** गो, **श्रोते** गो२ ; ३ **सुज्ञानी** नि, **सुजनी** खवर्ग ; ४ **आर्तिवंत** खवर्ग, **अर्थवंत** नि ; ५ **नैमिषारण्यीं** नि ; ६ **पातले** ख मुं औं पु धु तं .

१०१. १ **द्वादशाब्द** औं ; २ **अन्नछत्र** औं पु ; ३ ०**व्रती** नि औं पु, **सुशीळवृत्ति** नां ; ३–४ **अपार संशितवृत्ति** गो·२.

१०२. १ **तो** नां ; २ **मुनिवर्यें** नि, ०**वर** औं पु ; ३ **भयें** धु तं ; ४ **जोडिली** नि, **जोडिल्या** ख मुं औं, **जोडिले** पु, [ **जोडिलां करसंपुटीं** असा खरा पाठ दिसतो. ] ५ ०**संपुटीं** औं पु नां धु गो·२.

१०३. १ **पुरुषीं** नां औं पु ; २ **आमुची** गो·२, **आजची** नि.

सत्कथेच्या आवर्षणीं[1] । भरूनि अमृतसिंधूचें पाणी ।
मेघ[2] धाडिले कृपेकरुनी । जगदेश्वरें[3] या ठायां ॥ १०४ ॥

तुझिया वक्तृत्वलक्षणपीयूषा[1] । सकळीं सादरतेनें देखा ।
वोडविल्या[2] कर्णकुपिका । परमरस ह्मणोनि ॥ १०५ ॥

सौति[1] ह्मणे[2] स्वामी वहिला । जन्मसंग्रह सार्थक जाला ।
दरिद्रियाचे कन्येनें[3] वरिला । भाग्यादृष्टें[4] भूपति ॥ १०६ ॥

जनमेजयाचे[1] सर्पसत्रीं[2] । वैशंपायन पवित्र वक्त्रीं[3] ।
वदला[4] तिया धरिल्या श्रोत्रीं । विचित्र[5] कथा कौतुकें ॥ १०७ ॥

व्यासशंकरापासील[1] गंगा । भारतकथालक्षण सुभगा ।
तिसी भगीरथ जाला जगा[2] । वैशंपायन विवेकी ॥ १०८ ॥

ते कर्णद्वारां हृदयकळसीं[1] । थारले[2] स्मरणाचे अवकासीं ।
तो[3] मी निवेदीन स्वामींसी । तीर्थप्रसादबिंदु हा ॥ १०९ ॥

क्षीराब्धिशायी नारायण । तोचि कृष्णद्वैपायन ।
होऊनि भारतमिसें जाण । पंचम वेद प्रगटिला ॥ ११० ॥

---

१०४. १ **अवर्षणीं** नि , **आकर्षणीं** पु , **वर्षणीं** औं ; २ **तेथ** गो ; ३ **जगदीश्वरें** नि तं .

१०५. १ °**पीयूखा** नि ( स प्रसंप्रा ) ; २ **ओढविल्या** नि.

१०६. १ **श्रोते** औं पु ; २ **ह्मणती** औं पु ; ३ **कन्ये** ख पु ; ४ **सभाग्यश्रेष्ठ** नि खवर्ग ( **भाग्यश्रेष्ठ** मुं ).

१०७. १ **जन्मेज**° ख मुं औं गो·२ पु तं , **जन्मो**° पु४ ; २ **संतपात्रीं** औं पु ; ३ **वक्त्रीं** नि पु औं रा ; ४ **वदल्या** नि ; ५ **चिंतीं** धु तं.

१०८. १ °**पासीं** धु तं , °**पासाव** गो ; २ **जागा** गो·२.

१०९. १ **हृदयकोसिं** ख , °**कमळेंसीं** मुं नां ; २ **धरिली** नि , **धरिलें** खवर्ग, **थारलें** गो ; ३ **तें** ख पु गो·२ , **ते** औं पु४ नां.

ह्मणोनी भारतीं न[1] दिसे[2] कांहीं । तें ब्रह्मसृष्टींत जन्मलें नाहीं ।
शब्दब्रह्मीं[3] असे तें[4] पाहीं । सांठवलें[5] भारतीं ॥ १११ ॥
ते[1] साठी लक्ष भारतसंख्या[2] । अर्ध वोपिलें देवलोका[3] ।
पंधरा लक्ष स्थापिलें देखा[4] । पितृलोकीं[5] पितरार्थ ॥ ११२ ॥
चौदा[1] लक्ष गंधर्वभुवनीं । ठेविता जाला व्यासमुनि ।
येक[2] लक्ष कृपेकरुनी[3] । मनुष्यलोकीं[4] ठेविलें[5] ॥ ११३ ॥
नारद[1] सांगे[2] समस्त[3] सुरां । आसित देवल[4] कथी[5] पितरां ।
यक्षराक्षसविद्याधरां । शुकस्वामी[6] स्वयें सांगे ॥ ११४ ॥
या मनुष्यलोकालागीं[1] । वैशंपायन सर्वज्ञ[2] जगीं ।
सांगता जाला ते प्रसंगीं । पारीक्षिति[3] परिसता ॥ ११५ ॥
आदिपर्व सभापर्व । वनविराटउद्योगपर्व ।
भीष्मद्रोणकर्णपर्व । शैल्यगदा[1] दहावें[2] ॥ ११६ ॥
सौप्तिक स्त्रीपर्व शांतिपर्व । अनुशासन[1] अश्वमेधपर्व ।
व्यासाश्रममुसलपर्व[2] । सोळावें[3] हें[4] जाणिजे ॥ ११७ ॥

---

१११. १–२ **नसे** नि खवर्ग ( **जें नसे** मुं ) ; ३ **ब्रह्मब्रह्मीं** पु औं ; ४ **जें** नि खवर्ग ; ५ **तें सांठ°** नि खवर्ग.

११२. १ **तें** धु ; २ **भारत देखा** धु ; ३ **वेदलोका** पु४ ; ४ **जे कां** औं ; ५ **तृतीयलोकीं** औं पु , **पितृभुवनीं** गो२.

११३. १ **पावणेचवदा** खवर्ग ( **पावणपंधरा** ख ) ; २ **सवा** खवर्ग ; ३ **कृपा करुनी** खवर्ग ( नां प्रसंप्रा ) ; ४ **°लोका** नि खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ) ; ५ **दिधल** नि गो.२.

११४. १ **बृहदश्वा** नि औं मुं , **बृहदस्व** पु४ , **बृहदंगे** नां पु ; २ ( – ) खवर्ग ( मुं प्रसंप्रा ) ; ३ **सर्व** औं पु ; ४–५ **पितृलोकीं** नि खवर्ग ; ६ **श्रीशुक°** औं पु.

११५. १ **मनुष्यलोकीं** मुं ; २ **पवित्र** गो२ ; ३ **जनमेजय** नि, **जन्मेजय** खवर्ग, **परीक्षिति** धु तं गो२. पुढील ११६ ते ११८ या ओव्या खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) मध्यें नाहींत.

११६. १ **शल्य°** नि ; २ **नववें हें** रा तं२.

११७. १ **अनुसंधान°** गो२ ; २ **°मौसलपर्व** नि , **व्यासप्रमेय-मुसलपर्व** गो.२ ; ३–४ **हें सोळावें** नि.

महाप्रस्थानिक सतरावें[१] । स्वर्गारोहण तें[२] अठरावें ।
भारतपर्वांचीं हे[३] नांवें । अनुक्रमें जाणावीं[४] ॥ ११८ ॥

तेंचि[१] हरिवंशासहित । सवालक्ष[२] महाभारत[३] ।
माजी[४] आख्यानें बहुत[५] । सनत्सुजातगीतादि[६] ॥ ११९ ॥

आठ[१] सहस्र आठ शतें[२] । व्यासकूत[३] कठिण येथें[४] ।
व्यास कां[५] शुक जाणती अर्थ । जाणे[६] नेणे संजयो ॥ १२० ॥

मातृनियोगें[१] द्वैपायन[२] । विचित्रवीर्यक्षेत्रीं[३] जाण[४] ।
वाढतें केलें[५] कुळसंतान[६] । रेतोदकें आपुलिया ॥ १२१ ॥

धृतराष्ट्र दुजा पंडु[१] नृपति । तिसरा मांडव्यशापें[२] सुमति[३] ।
विदुर क्षत्ता[४] पक्षपाती । सर्वकाळ[५] धर्माचा ॥ १२२ ॥

धृतराष्ट्राचे[१] शत[२] गांधार । पांच पांडव पंडूचे[३] कुमर ।
यांचिये[४] राहाटीचा प्रकार[५] । वृक्षदृष्टांतें[६] पारिसिजे ॥ १२३ ॥

---

११८. १ **सत्रावें** नि ; २ ( – ) नि , **हें** गो·२ ; ३ **हीं** नि , (–) गो·२ ; ४ **सांगितलीं** रा , **अवधारीं** गो२.

११९. १ **तेंहि** नि, खवर्ग ( **तें हें** मुं ) ; २ **सपादलक्ष** नि रा गो·२ ; ३ **मुख्य भारत** औं पु ; ४ **जीं जीं** गो ; ५ **अति अद्भुत** नि औं पु४ , **अद्भुत** मुं पु ; ६ **संतसज्जन वानिती** गो२.

१२०. १ **अठरा** नि पु·४ औं धु गो नां ; २ **शत** नि औं पु ; ३ **व्यास-कूटें** नि , **व्यासक्लिष्ट** रा खवर्ग , **व्यासकृत्य** गो·२ ; ४ **येथ** नि औं पु ; ५ **कीं** नि ख , ( – ) तं मु ; ६ **जो** गो.

१२१. १ **मातृयोगें** धु मुं, **मंत्रयोगें** रा ; २ **द्वैपायनें** पु४ ; ३ ०**क्षत्रीं** धु नां ; ४ **जाणें** पु४ ; ५ **करी** नि ; ६ **संतान** खवर्ग.

१२२. १ **पांडु** नि ; २ ०**श्रापें** औं ; ३ **प्रेतपती** नि खवर्ग ; ४ **रक्षिता** मुं औं पु ; ५ **सार्व**० रा गो·२.

१२३. १ **धृतराष्ट्रज** ख पु४ नां , **धृतराष्ट्रवंशज** मुं ; २ ( – ) मुं ; ३ **पंडु** मुं गो२ ; ४ **त्यांचे** नि ; ५ **विचार** नां ; ६ ०**दृष्टी जोवें** मुं .

अहंकारद्रुम[१] दुर्योधन । शकुनि शाखा[२] खांदिया[३] कर्ण ।
पुष्पिफळीं[४] दुःशासन । मूळ राजा धृतराष्ट्र ॥ १२४ ॥

आतां[१] धर्म तो[२] धर्मस्वरूप[३] द्रुम[४] । खांदिया[५] पार्थ[६] शाखा[७] भीम ।
फळींपुष्पीं[८] अति उत्तम । माद्रीपुत्र[९] मिरवले ॥ १२५ ॥

मूळ त्या[१] वेदब्राह्मण[२] कृष्णु[३] । जो परमात्मा जगद्विष्णु[४] ।
ह्मणोनी छळितांही[५] सहिष्णु[६] । धर्मराज[७] धर्मात्मा[८] ॥ १२६ ॥

पहिलें कौरवपांडवजनन । त्यावरी लाखागृहीं[१] दहन[२] ।
द्युतीं द्रौपदीवस्त्राहरण[३] । वनाभिगमन तद्योगें ॥ १२७ ॥

मत्स्यालयीं[१] अज्ञातवास । गोग्रहणीं कौरवां[२] त्रास ।
संधि[३] मोडूनि[४] द्वारकाधीश । आलिया[५] संग्राम माजला[६] ॥ १२८ ॥

---

१२४. १ ०द्रुम नि तं ; २ शाखादि ख नां ; ३ खांदी नि , पल्लव औं ; ४ पुष्पफळें नि.

१२५. १ ( – ) नि गो·२ रा खवर्ग ; २–३ स्वरूप धर्म आ; ३ यथार्थ धर्म मुं , ०स्वरूपी नि ; ४ द्रुम नि तं ; ५ ( – ) औं ; ६–७ शाखा अर्जुन नि ख , शाखा पार्थ पु४ रा , शाखादि औं , शाखा तो पु , ( – ) गो२ ; ८ पुष्पें फळें नि , पुष्पींफळीं रा गो·२ ; ९ माद्रीकुमर गो२.

१२६. १ त्याचें रा ; २ ब्रह्मण्यदेव धु , ब्राह्मण गो , देवब्राह्मण गो२ ; १–२ तो जगदात्मा नि खवर्ग ; ३ श्रीकृष्णु नि खवर्ग (श्रीकृष्ण औं पु) ; ४ जगद्वंद्य विष्णु नि , जगज्जिष्णु मुं , जगजीवन औं पु ; ५ छळितां नि ; ६ साही जन औं पु ; ७–८ छळिला न वचे धर्मराजा औं , न छळे जाण धर्मराज धर्मात्मा पु ; ८ धार्मिक गो२.

१२७. १ लाक्षागृहीं नि तं ख ; १–२ लाखाग्रहण धु ; ३ ०वस्त्रहरण। नि.

१२८. १ मच्छालयीं ख औं गो , मच्छग्राहिं मुं , मत्छालयीं पु ; २ कौरव नि ख गो२ ; ३ युद्धें नि , युद्ध खवर्ग ; ४ नेमी नि खवर्ग ; ५ मग नि पु, सर्वी मुं , मग सांवी ( सावियां ) ख औं , सविया नां ; ६ मांडला नि धु खवर्ग.

अकरा अक्षोहिणी[1] सेना । त्यामाजी दोघे[2] अमर जाणा[4] ।
साह्य[5] जाले दुर्योधना । धर्माचेनि इसाळें ॥ १२९ ॥

सात अक्षोहिणी आंत । निःशस्त्री श्रीकृष्णनाथ[1] ।
अरि रायावरी धूमकेत । पांडव[2] पाठीं सूदले[3] ॥ १३० ॥

दहा दिवस गंगात्मज । पांच दिवस भारद्वाज ।
दोनी दिवस कर्णराज[1] । सेनारक्षक संग्रामीं ॥ १३१ ॥

अर्ध शैल्य[1] अर्ध गदा[2] । अठरा दिवसां[3] समाप्त[4] युद्धा[5] ।
तेचि[6] रात्रीं[7] स्मरोनि[8] द्वंदा[9] । द्रोणपुत्रें घातलें[10] ॥ १३२ ॥

धृष्टद्युम्नादि[1] द्रौपदीकुमर । वधुनि पळाला अतिसत्वर ।
हें[2] देखोनि प्रळयवैश्वानर । भीम भीमपराक्रमी[3] ॥ १३३ ॥

पाठीलागुनी[1] धांविला[2] काळ । देखोनि ब्रह्मास्त्र गुरूचा बाळ ।
प्रेरूनि ह्मणे हा भूगोळ । अपांडवी[3] हो[4] येणें[5] ॥ १३४ ॥

---

१२९. १ **अक्षौहिणी** नि, **क्षोहिणी** गो२ ; २–३ **अमरत्व दोघां** नि खवर्ग ; ४ **जणां** नि ( **जना** औं पु ) ; ५ **सहाय** नि.

१३०. १ **कृष्ण त्रैलोक्यनाथ** नि गो·२ रा खवर्ग ; २ **पांडवां** नि खवर्ग ; ३ **राहिला** नि खवर्ग ( **ठाकला** ख ).

१३१. १ **सूर्यात्मज** औं.

१३२. १ **शल्य** नि ; २ **गदायुद्ध** खवर्ग ; ३ **दिवसीं** नि ख धु , **दिवस** पु·४ औं मुं ; ४ **समाप्ति** नि ; ५ **युद्ध** खवर्ग ; ६ **तोंचि** नि , **तेचि** खवर्ग ; ७ ( – ) नि खवर्ग ( नां प्रसंप्रा ) ; ८ **स्मरोनियां** नि खवर्ग ( **सारुनियां** नां ); ९ **द्वंद्वा** नि , **दंद्व** खवर्ग ( **द्वंद** नां पु४ ) ; १० **घात केला** नि.

१३३. १ **धृष्टद्युम्न** नि गो·२ खवर्ग ; २ ( – ) खवर्ग गो·२ ( ख प्रसंप्रा ) ३ **थोर पराक्रमी** औं पु.

१३४. १ **°लागीं** नि खवर्ग ( **°लागें** नां ) , **°लागें** रा ; २ **धाविन्नला** गो·२ , **धांवला** नि ; ३–५ **चूळ केला पांडवीं** औं , **केला चूळ पांडवी हो येणे** पु.

हें देखोनि[1] निर्वाण[2] पार्थे । शस्त्रें[3] शस्त्रा[4] करी शांत ।
मणि हिरोनि जीवन्मुक्त[5] । प्राणदानें सोडिला ॥ १३५ ॥

आद्याहुति[1] नदीनंदन[2] । पूर्णाहुति[3] दुर्योधन ।
इतुकेन संग्राम संपोन[4] । पांडव पृथ्वी पावले ॥ १३६ ॥

हेची अनुक्रमाची[1] युक्ती । पश्चात्ताप मानुनी[2] चित्तीं[3] ।
धृतराष्ट्र संजयाप्रती । सत्तरी[4] श्लोकीं बोलिला ॥ १३७ ॥

लक्ष[1] भेदोनि[2] साक्षेपें[3] । द्रौपदी जिंतिली[4] प्रतापें[5] ।
तेव्हांचि[6] जयाशा[7] संकल्पें । म्यां[8] सांडिली[9] संजया[10] ॥ १३८ ॥

सुभद्रा प्राप्त जालिया[1] पार्था । यादव पातले इंद्रप्रस्था ।
हें ऐकतां जयाची आस्था । म्यां सांडिली संजया ॥ १३९ ॥

लाक्षाजोहराहुनी[1] वांचले । पांचाळाचे जामात जाले ।
ऐकतक्षणीं[2] जयाशा[3] बोलें । म्यां सांडिली[4] संजया ॥ १४० ॥

---

१३५. १–२ **निर्वाण देखोनि** रा गो·२ नि खवर्ग ; ३–४ **अस्त्रें अस्त्र** नि खवर्ग ; ५ **जीवें जीत** नि , **जीवें मुक्त** खवर्ग , **जीवन्मृत्य** रा गो·२.

१३६. १–२ **यानंतरें भीमसेन** नि खवर्ग (पु४ प्रसंप्रा) ; ३ **घाली पूर्णा°** नि खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) ; ४ **घूर्ण** नि , **संपूर्ण** खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ).

१३७. १ **°क्रमाचे** रा गो·२ पु ; २ **धरुनी** मुं ; ३ **चितिं** पु४ नां धु ; ४ **सतरा** नि ख , **सत्रा** स औं पु.

१३८. १ **ह्मणे जैं लक्ष** खवर्ग , **ह्मणे लक्ष** नि , **ह्मणे जयलक्ष** पु ४ ; २ **ह्मणोनि** पु ४ , **भेदिलें** मुं ; ३ **साटोपं** रा गो·२ खवर्ग; ४ **जिंकिली** ख पु४ मुं धु ; ५ **साटोपें** धु , **साक्षेपें** तं ; ६ **तेधवांची** नि , **तेधवां** खवर्ग ; ७ **यशजय** खवर्ग (**जय** ख) ; ८–९ **सांडिलें म्यां** खवर्ग (**म्यां सांडिलें** औं पु, **सोडिलां म्यां** ख ) ; १० **रे संजया** नि धु. नि मध्यें १६१ पर्यंत चवथ्या चरणांत असाच पाठ आहे.

१३९. १ **जाली** पु.४ नां, **झालि या** नि. ही ओवी मुं मध्यें नाहीं.

१४०. १ **लाखाजोहरीं** नि , **लाखाजोहरापासोनि** खवर्ग ; २ **हें ऐकोनि** आ , **हें ऐकत०** पु , **ऐकतां°** नि रा ; ३ **जययश** खवर्ग ; ४ **सांडिलें** खवर्ग.

जरासंध[1] वीर विक्रमें[2] । शस्त्रेंवीण मारिला[3] भीमें[4] ।
तेव्हांचि[5] जयाशा[6] कामें[7] । म्यां सांडिली[8] संजया ॥ १४१ ॥
रजश्वला[1] अनाथा[2] ऐसी । सभे[3] कृष्णा[4] मुक्तकेशी ।
गांजितां[5] जयाशा मानसीं[6] । म्यां सांडिली संजया ॥ १४२ ॥
श्रमले[1] दुःशासनाचे हात । ऐसे[2] वस्त्रांचे[3] पर्वत ।
कृष्णें[4] पुरवितां[5] विजयस्वार्थ[6] । म्यां सांडिला संजया ॥ १४३ ॥
वना जातां संतप्त पोटीं । संकेत दाविले[1] जनांचे दृष्टी[2] ।
विदुरें[3] सांगता जयाची गोष्टी । म्यां सांडिली संजया ॥ १४४ ॥
इछाभोजनदानें[1] वनीं[2] । युद्धिं[3] जिंकिला पिनाकपाणी ।
हें[4] ऐकतां विजयो[5] अंतःकरणीं[6] । म्यां सांडिला[7] संजया ॥ १४५ ॥
कर्णबुद्धीनें[1] सदा वर्ततां । दुर्योधन गंधर्वीं धरुनी[2] नेतां[3] ।
पार्थें[4] सोडवितां जयाची कथा । म्यां सांडिला संजया ॥ १४६ ॥

---

१४१. १०**संद** ना औं पु धु तं ; २ **विक्रम** ख औं पु ; ३ **मारी** ख पु ; ४ **भीम** ख पु ; ५ **तर्थींच** नि खवर्ग ; ६ **यशाचें** ख पु४, **जयाचें** पु, **जयाशेचा** औं तं ; ७ **काम** ख औं पु ; ८ **सांडिलें** ख औं पु, **सांडिला** तं.

१४१. १ °**स्वला** नि ख पु तं ; २ **अनार्थी** खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ), **आतौता** गो·२ ; ३ **सभेसी** नि ; ४ **आणिली** नि खवर्ग ( मुं प्रसंप्रा ) ; ५ **कृष्णा गांजितां** नि ; ६ **मनेंसी** गो२. रा मध्यें ही ओवी नाहीं.

१४३. १ **भरले** गो ; २ **पडले** औं पु ; ३ ( + ) **पडले** नि ; ४ **कृष्ण** नि खवर्ग ( **देव** औं पु ) ; ५ **पूजितां** धु ; ६ **विजयीं स्वार्थ** नि ख.

१४४. १ **दाविला** गो खवर्ग ( **दावी** ख ) ; २ **दृष्टीं** नि ; ३ **विदुर** नि मुं नां पु.

१४५. १ **इच्छाभोजन** नि तं, **इछाभोजन** धु नां, **इत्सा**° पु४, °**भोजन ऋषितें** मुं ; २ **मनीं** नां, **अद्वैतवनीं** धु नि ; ३ **बुद्धि** पु४; ४ ( – ) खवर्ग रा गो·२ ; ५ **विजयाशा** खवर्ग ; ६ **मनीं** ख, **अंतःकार्णी** मुं नां पु ; ७ **सांडिली** खवर्ग.

१४६. १ **सर्वबु**° ख, **वर्मबु**° मुं नां औं पु ; २ **बांधोनि** नि गो खवर्ग ; ३ **न्हेतां** गो·२ ; ४ ( + ) **तो** नि.

विराटयुद्धीं[1] येकेचि रथें । आमुचा[2] दळभार[3] भंगिला[4] पार्थें ।
तेव्हांचि विजयवासना[5] चित्तें । म्यां सांडिली संजया ॥ १४७ ॥
मत्स्यें[1] सन्मानमानें[2] करीं[3] । अभिमन्यातें[4] दिधली कुमरी ।
तेव्हांचि जयाशा अंतरीं । म्यां सांडिली संजया ॥ १४८ ॥
निर्जित[1] निर्धन दवडिले वनीं । त्यांसि सेना सात अक्षोहिणी[2] ।
मिनली ऐकतां जयाशा मनीं । म्यां सांडिली संजया ॥ १४९ ॥
संधी[1] पातला[2] जगद्बंधु[3] । न[4] मनीच[5] माझा[6] अविवेकसिंधु ।
तेव्हांचि[7] जयाशेचा[8] शब्दु । म्यां सांडिला संजया ॥ १५० ॥
कर्णदुर्योधनादि शकुनि । बांधों[1] भाविती[2] सारंगपाणी ।
बहुरूप[3] दावितां[4] जयाशा मनीं । म्यां सांडिली संजया ॥ १५१ ॥
विषमीं[1] कश्मल[2] पावतां[3] किरीटी । कृष्णें[4] विश्वरूप[5] दाविलें[6] पोटीं
तेव्हांचि[7] जयाशेची[8] गोष्टी । म्यां सांडिली संजया ॥ १५२ ॥

---

१४७. १ **विराटराष्ट्रीं** खवर्ग ( °**नगरीं** मुं , **वैराटीं** औं पु ); २ **अमूप** मुं , **आमुचें** औं पु गो२ रा ; ३ **दळ** मुं औं पु गो रा ; ४ **जिंकिला** नि , **भंगिलें** मुं औं पु गो२ रा ; ५ **जयाची वासना** नि.

१४८. १ **मत्छें** गो.२ , **मत्स्यराय** नि औं पु , **मछराय** मुं ख पु४ नां ; २ **सन्मान** नि खवर्ग , **सन्माननमनें** धु ; ३ **करी** नि खवर्ग ; ४ °**मन्यूतें** नि.

१४९. १ **निर्जीव** गो खवर्ग ( **निर्वस्त्र** औं ); २ **अक्षौहिणी** नि , **अक्षोणी** नां , **क्षोणी** रा.

१५०. १ **संधीसि** रा गो.२ ; १–२ **साम करावया** नि खवर्ग ; ३ **जगद्वंदु** गो२ ; ४–६ **पातला न मनी** नि खवर्ग ; ७ **तेव्हां** नि मुं नां ; ८ **जयाचा** ख पु४ गो , **जयाशा** पु.

१५१. १–२ **बांधोनि भाविती** धु गो ; ३ **बहुतरूपें** नि ख औं , **अनेकरूप** धु तं ; ३–४ **तेव्हांचि** मुं .

१५२. १ **युद्धीं** नि खवर्ग ( पु ४ प्रसंप्रा ) ; २ **विश्वरूप** खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) ; ३ ( – ) खवर्ग ( पु ४ प्रसंप्रा ) ; ४ **लागीं** खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) ; ५ **त्रैलोक्य** पु४ रा गो ; ५–६ **दावी त्रैलोक्य** ख मुं नां पु ; ७ **कृष्णें तेव्हां** खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) ; ८ **जयाची** नि गो.२ खवर्ग.

करुनी शिखंडीचें बुझवणें । भीष्म अर्जुनें घेतला प्राणें ।
तेव्हांचि[1] जयाची[2] आशा[3] मनें[4] । म्यां सांडिली संजया ॥ १५३ ॥
ऐकिलें[1] सौभद्र[2] वीर[3] येकला । प्रतापें विहू[4] भेदुनी गेला ।
तेव्हांचि[5] जयाशेच्या बोला । म्यां सांडिलें संजया ॥ १५४ ॥
कर्ण द्रोण शैल्य[1] गुरुसुत । देखतां मारिला जयद्रथ ।
तेव्हांचि[2] जयाशेचि[3] मात । म्यां सांडिली संजया ॥ १५५ ॥
गुरूमर्यादा सांडुनी बाणें । द्रोण विंधिला[1] धृष्टद्युम्नें ।
तेव्हांचि जयाची कामना मनें । म्यां सांडिली संजया ॥ १५६ ॥
दुःशासन माझी[1] धेनु[2] धाकुटी । भीमव्याघ्रें[3] झोंबोनि[4] कंठीं ।
अशुद्ध प्रासितां जयाशा[5] पोटीं[6] । म्यां सांडिली संजया ॥१५७ ॥
धनुर्धरां[1] सिरोमणि[2] । तो[3] कर्ण पार्थें विंधिला[4] रणीं ।
तेव्हांचि जयाशा[5] मनीं । म्यां सांडिली संजया ॥ १५८ ॥
जो कृष्णातेंहि[1] न मनी माजें[2] । तो[3] शैल्य[4] वधिला धर्मराजें ।
तेव्हांचि जयाशेचें वोझें । म्यां सांडिलें संजया ॥ १५९ ॥

---

१५३. १ **तैंच** नि खवर्ग ; २–३ **जयाशा** रा नि खवर्ग , **विजयाशा** औं ; ४ **निजमनें** नि खवर्ग ( औं प्रसंप्रा ).

१५४. १ **एकोन** नि खवर्ग ( **कीं** पु४ ) ; २ **सुभद्रेय** ख , **सौभद्री** खवर्ग ; ३ ( – ) गो·२ ; ४ **व्यूह** रा तं , **विभु** नां गो·२ ; ५ **तेधवांच** नि खवर्ग ( मुं प्रसंप्रा ).

१५५. १ **शल्य** नि तं ; २ **तेधवांची** नि खवर्ग ; ३ **जयाची** नि.

१५६. १ **वधिला** नि गो·२ रा खवर्ग ( नां प्रसंप्रा ).

१५७. १–२ **धेनु माझी** नां औं पु ; ३ **भीमें व्याघ्रें** नां रा गो·२ , °**व्याघ्र** नि खवर्ग ; ४ **धरिली** तं , **झोंबला** औं , **झोंबिनला** पु ; ५–६ **जयाची गोष्टी** नां.

१५८. १–२ **जो धनुर्धरशिरो**° नि , **जो धनुर्धरां**° खवर्ग ; ३ ( – ) रा गो·२ नि खवर्ग ; ४ **वधिला** रा गो·२, खवर्ग ( नां प्रसंप्रा ) ; ५ **जयाची आशा** रा गो२.

१५९. १ **कृष्णातें** खवर्ग धु गो२ , **कृष्ण तो** नि ; २ **माझें** नि , **सहजें** औं ; ३ ( – ) नि ; ४ **शल्य** नि.

द्यूतकलहमूळ[1] शकुनी । तो[2] पापी[3] सहदेवें मारिला[4] रणीं ।
तेव्हांचि जयाची[5] दुराशा[6] मनीं[7] । म्यां सांडिली संजया ॥१६०॥

अकरा अक्षोहिणींचा[1] पति । सुयोधन[2] विरथ[3] भग्नशक्ति[4] ।
जळीं लपतां जयसंपत्ति[5] । म्यां सांडिली संजया ॥ १६१ ॥

पांडव घेऊनि[1] गोपाळ । बळें[2] छळिला माझा बाळ ।
तेव्हांचि अपजयाचा अनळ[3] । मज[4] लागला संजया ॥ १६२ ॥

चित्रमार्गें[1] विविधा[2] गती । गदायुद्धीं भद्रजाती ।
भीमें पाडितां जयसंपत्ति । हारपली[3] संजया ॥ १६३ ॥

मिथ्या वासुदेवाचिये[1] बुद्धी[2] । पांडव राहाटले राक्षसविधी ।
राजा दुर्योधन गुणाब्धि । कपटें कोंडोनि[3] मारिला ॥ १६४ ॥

शतपुत्र विउनी[1] गांधारी । सेखीं वांज[2] दिसे[3] संसारीं ।
असपत्न राज्य ऐसियापरी । क्लेशीं पांडव पावले[4] ॥ १६५ ॥

---

१६०. १ **कलहद्यूतीं मूळ** नि , **कलहमूळद्यूत** ख , **कलहा मूळ द्यूत** नां पु·४ मुं गो·२ रा , **कलहाकृत मूळ** औं ; २ ( – ) रा गो·२ ; २–३ **त्यासी** नि खवर्ग ; ४ **मारिलें** नि खवर्ग ; ५ **जयाशेची** रा ख ; ५–६ **जयाशा** धु तं ; ७ **अन्तःकरणीं** धु.

१६१. १ **क्षोहिणीचा** नां रा गो·२ धु ; २ **दुर्योधन** नि खवर्ग ( औं पु प्रसंप्रा) गो·२ ; ३ **वीर** तं रा ; ३–४ **भग्नवीरूशक्ति** धु ; ५ **जयाची सं°** नि , **जयाशेची सं°** खवर्ग ( **जयाशा सं°** मुं , औं प्रसंप्रा ).

१६२. १ **घेउनियां** नि ; २ **जाउनी** नि रा गो·२ खवर्ग ; ३ **अंचळ** ख पु४ , **आळ** मुं औं पु ; ४ **मग** तं. ही ओवी नां मध्यें नाहीं.

१६३. १ **०मार्ग** औं पु·४ , **विचित्रमार्ग** नां मुं ; २ **विविध** नि खवर्ग ( पु४ औं प्रसंप्रा ) ; ३ **हरपली माझी** नि खवर्ग.

१६४. १ **वासुदेवाची** नि ; २ **युद्धीं** ख नां ; ३ **करुनी** नां औं पु.

१६५. १ **येवोनि** पु४ ; २ **वांझ** नि , **वंध्या** धु ; ३ ( + ) **ये** नि मुं, ( + ) **या** ख नां औं पु ; ४ **पातले** गो·२.

अष्टादश अक्षोहिणीआंत[1] । दहा उरले जीवें[2] जीत ।
तिघे आमुचे पैं गा[3] सात । पांडवांकडे[4] ऐकिलें ॥ १६६ ॥
ऐसें बोलतबोलतां[1] नृपति । मूर्छा दाटोनि[2] पडला क्षिती ।
शोकें पोळला उठे[3] पुडती । अश्रुपातीं मही तिंबे[4] ॥ १६७ ॥
श्वास टाकी जैसा व्याळ । हाहाकारी[1] वेळोवेळ ।
ह्मणे संजया तात्काळ । प्राण त्यागीन[2] सर्वथा ॥ १६८ ॥
संजयो ह्मणे कौरवराया । दुःख पाविजे धरितां माया ।
ते[1] विवेकी[2] जाणोनियां । सर्वस्वत्यागें[3] निघाले[4] ॥ १६९ ॥
दिसे तितुकें[1] पावेल[2] नाश । हाचि जाणिवेमाजी[3] सारांश ।
ह्मणोनि आत्मा[4] नित्य[5] अविनाश[6] । जोडे तेंचि साधावें ॥१७०॥
ब्रह्मसृष्टीमाजी निश्चिती । असंख्य राजे चक्रवर्ति ।
अवतारपुरुषांचिया[1] पंक्ती । उठोनि[2] गेल्या बहुवेळां ॥ १७१ ॥
सूर्यसोमवंशाआंत[1] । कीर्तिघोष प्रतापवंत ।
चित्रगुप्ताचे हात । नामें[2] लिहितां भागले ॥ १७२ ॥

---

१६६. १ क्षोणी° ख मुं नां औं पु, क्षोहिणी° रा गो.२ ; २ जिव नां ; ३ (–) मुं औं धु ; ४ (+) हें नि.

१६७. १ बोलतांची नि ख पु.४ औं, बोलतां मु रा धु ; २ येऊनी नि खवर्ग ; ३ उठी पु४ धु गो तं ; ४ भिजे नि, तळीं गों.२, तीमे तं.

१६८. १ हा हा करी नि, हाहाकारें मुं, अहाकरी गो ; २ सांडीन नि खवर्ग,

१६९. १ हेंची नि खवर्ग गो.२ रा, हा मुं ; २ विवेकें नि ख औं पु.४, विवेक मुं नां ; ३ सर्वत्यागें नि खवर्ग ; ४ निघावें नि खवर्ग.

१७०. १ तें विवेकें औं पु ; २ पावे नि खवर्ग ; ३ जाणिजे मुं औं नां, जाणिजे माजी धु गो ; ४ आह्मां मुं गो२ ; ५ (–) मुं नां ; ६ विनाश गो.२.

१७१. १ अवतारी पुरुषांच्या नि ; २ उडोनि औं पु.

१७२. १ सोमसूर्यवंशा° पु ४, सोमसूर्य आयुष्मंत धु, सोमसूर्य-पुण्यांत तं ; २ तेही नि खवर्ग.

अंबरीष मरुत्त इक्ष्वाकु क्षिती । मनु गयराज[1] भरत[2] ययाति ।
शशबिंदु भगीरथ राम दाशरथि । लोकत्रयीं प्रसिद्ध ॥ १७३ ॥
शैब्य[1] सृंजय[2] कक्षीवंत । सुहोत्र रंतिदेव शर्याति अजित ।
बाल्हीक दमन[3] नरनाथ[4] । विश्वामित्र नळनामा ॥ १७४ ॥
कृतवीर्य आणि जन्मेजयो । तव नामाचा प्रतापसूर्यो ।
ज्यांची कीर्ति स्वमुखें[1] तनयो । सत्यवतीचा अनुवादे ॥ १७५ ॥
पुत्रशोकपरिहारार्थी । पूर्वी नारदें[1] श्वेत्याप्रती[2] ।
चतुर्विंशती राजनृपती । पुण्यश्लोक सांगीतले ॥ १७६ ॥
पुरुकुरुइत्यादिकां[1] । शतसहस्रीं नव्हे लेखा ।
जयाचीं[2] दिव्यकर्में देखा । त्यागविक्रमें[3] गर्जती ॥ १७७ ॥
जयांच्या चरित्रांचीं लेणीं । भूषणें जालीं जगाचे[1] श्रवणीं[2] ।
स्वस्तुतीच्या[3] तांबोलदानीं[4] । मुखें रंगलीं देवांचीं ॥ १७८ ॥
जयांच्या सुकृतरासी उमपा[1] । भरितां[2] ब्रह्मांडाचिया मापा ।
प्रळयीं उरवितां आटोपा[3] । गणना नव्हे[4] कल्पांतीं ॥ १७९ ॥

---

१७३. १ गांगेयराज धु तं, °राजा नि ; २ भगदंत गो॰२.

१७४. १–२ सैन्याश्रुत जय नि, सैन्यासुतजय खवर्ग ; २ संजय रा धु गो तं ; [ सृंजय संस्करण–मूळ संस्कृत महाभारत. ] ३–४ चैद्य मगधनरनाथ नि.

१७५. १ मुखें धु पु.

१७६. १ नारद नि ; २ शौनकाप्रती नि खवर्ग, शेल्याप्रती रा धु, शेल्याप्रती गो.२, सैज्याप्रती तं. [ श्वेत्याप्रती संस्करण–मूळ संस्कृत महाभारत. ]

१७७. १ पुरुप्रवीरकुरु° नि खवर्ग ; २ त्यांचीं नि खवर्ग ; ३ त्यागें° नि औं गो॰२ ख, त्यागेंविक्रम पु.

१७८. १–२ जगत्रयाचे कर्णीं धु ; ३ स्वर्गीं स्तुतीच्या नि, स्वकीर्तीच्या धु तं, संस्कृतीच्या गो ; ४ तांबोलेंकरुनी खवर्ग, तांबूलेंकरुनी नि.

१७९. १ उमापा नि गो॰२, उमोपा तं ; २ पूर्ण भरितां नि खवर्ग, ३ साटोपा नि खवर्ग ; ४ नोहे खवर्ग गा॰२ रा.

बहुयज्ञ बहुदक्षणा । देतां बहुसाल ऋषिब्राह्मणा ।
नेतां उबगोनि सांडिल्या[1] धना । नाम जालें कनकाद्रि ॥ १८० ॥

सत्य शौच दया[1] आर्जव[2] । स्वधर्मकर्मी ईश्वरभाव ।
न्यायनीतीचें गौरव । जींही[3] बहुसाल वाढविलें ॥ १८१ ॥

जींहीं[1] दानोदकीं[2] प्रबळ । जळसेन[3] केला ब्रह्मगोळ[4] ।
तेही पावला[5] असतां[6] काळ[7] । वस्य[8] जाले मृत्यूतें[9] ॥ १८२ ॥

अभ्रें[1] वितुळलीं[2] निराळीं । नाना बुद्बुद[3] विराले जळीं ।
तैसे अचुक काळानळीं । भस्म जाले असंख्य ॥ १८३ ॥

तुझे पुत्र तवं[1] दुरात्मे । नाश पावले केलेनि[2] कर्में ।
त्यांचा शोक मनोधर्में । करणें हाचि अविवेक ॥ १८४ ॥

वेदांतशास्त्रांच्या[1] अर्थविचारें[2] । आचार्याचेनि[3] वाक्यनिर्धारें[4] ।
प्रपंचापासूनि बुद्धि चतुरें[5] । स्वरूपनिष्ठ[6] करावी ॥ १८५ ॥

देहेंशीं[1] विश्व मिथ्या सकळ । जाणोनि चिंतीं[2] ब्रह्म[3] निर्मळ ।
तेणें शमेल शोकजाळ । स्वानंदसुख पावसी ॥ १८६ ॥

---

१८०. १ **सांडिलें** नि.

१८१. १–२ **दयार्जव** ख रा गो·२ ; ३ **जेहीं** मुं नां .

१८२. १ **जेहीं** नां ; २ °**दर्कें** नि खवर्ग ; ३ **जळमय** नि ( स प्रसंप्रा ), **जळशयन** तं ; ४ **ब्रह्मांडगोळ** पु४ ; ५ **पातला** नि खवर्ग; ६–७ **पावले अंतकाळ** गो२ ; ८ **वश** नि ; ९ **मृत्यातें** नां औं पु रा गो .

१८३. १ **भ्रमें** गो·२ ; २ **वितळोनि** धु ; ३ **बिंदु** मुं .

१८४. १ ( – ) ख , **तरी** पु४ ; २ **केलिया** मुं , **कु** गो.

१८५. १ **वेदशा°** नि , ° **शास्त्रींचा** खवर्ग ; २ °**विचार** खवर्ग ; ३ **आचार्य** मुं ; ४ °**निर्धार** ख पु४ मुं औं , **वाक्येंनिर्धार** पु , **वाक्यें°** धु ; ५ **चतुर** खवर्ग ( **विचार** ख ) ; ६ °**निष्टें** ख पु४ नां , °**निष्ठा** नि मुं औं पु, °**निष्ठूर** गो·२.

१८६. १ **हें** मुं, **देहासि** ख ; २ ( – ) मुं ; २–३ **ब्रह्म चिंतीं** नि खवर्ग.

नानादेहांतर[1] उर्मी । उठती चतन्यचिद्व्योर्मी[2] ।
तें[3] जाणे[4] त्या[5] मोहाची घुर्मी[6] । कल्पांतींही बाधीना[7] ॥ १८७ ॥
ऐसें बोलोनि मुनी संजयो । स्वस्थ केला अंबिकातनयो ।
इतुका[1] कथेचा निजान्वयो[2] । येथें[3] संक्षेपें[4] सांगीतला ॥ १८८ ॥
हेंचि सविस्तारीं[1] परिसा पुढें । उघडुनी श्रवणआर्तिचीं[2] तोंडें[3] ।
वचन सेवा[4] सुपक्कें[5] गोडें[6] । भारतकथाअमृतवल्लीचीं[7] ॥ १८९ ॥

---

१८७. १ °देहांतरांत नि, °देहांतश्रम ख पु·४ औं, °देहांतराभ्र रा गो२, °देहांतराभ्रम गो, °देहातिश्रम नां; २ चैतन्याचिये व्योर्मी नि खवर्ग, चतन्य उद्वोर्मी ध; ३ (–) ध; ४–५ जाणत्या नि रा धु; ६ गुर्मी नि; ७ बाधेना नि ( स प्रसंप्रा ) रा धु गो२.

१८८. १ इतुकेनी नि खवर्ग, इतुक्या धु; २ अन्वयो नि; ३ यथा औं, तेथ गो·२; ४ संक्षेप नां पु, संकल्पें औं, साक्षेपें धु.

१८९. १ विस्तारें नि, सविस्तर खवर्ग रा गो; २ श्रवणार्तीचीं नि खवर्ग; ३ कवाडें नि खवर्ग; ४–५ सुवासपक्कफळें मुं औं; ५ सुपक्कफळें नि खवर्ग, सुख ध, सुकें तं; ६ कोडें धु; ७ °कथामृत° नि खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ).

यापुढें पुढील ओव्या नि व खवर्ग मध्यें जास्त आहेत.

ऐसी सविस्तर कथा । संजयें सांगितली गांधारीकांता ।
श्रद्धेनें ऐकती[1] जे तत्त्वतां[2] । मोक्षसुख[3] त्यां लाभे ॥ १८९ अ ॥

( १ ) ऐकिजे मुं; ( २ ) सर्वथा पु; ( ३ ) मुमुक्षुता मुं.

आदिपर्वकथामृत । मन करूनियां सुनिश्चित[1] ।
जैसे चातक मेघातें आर्तभूत[2] । तैसें श्रवण करावें ॥ १८९ आ ॥

( १ ) साव चित्त नि; ( २ ) इच्छित मुं.

भारत हा[1] पांचवा वेद । श्रीव्यासें कथिला विशद ।
निर्धारेंसी पद्बंध[2] । श्रवण करा श्रोते हो ॥ १८९ इ ॥

( १ ) पाहतां नि; ( २ ) पदबद्ध नि, पदप्रबंध नां.

कथामृत परम सुस्वाद । ऐकतां आनंद उद्बोध ।
पावती सज्जन सानंद । निजांगींचा[1] अतिवेगें ॥ १८९ ई ॥

( १ ) निजांगीं नि.

कुरुक्षेत्रीं सूर्योपरागीं[1] । सहस्र कपिला सुवर्णशृंगी ।
विप्रां[2] वेदविदुषांलागीं[3] । देतां सुकृत जें[4] जोडे ॥ १९० ॥

तें भारतीचें पर्व येक । श्रवण करितां पावती लोक ।
पापसिंधु प्रासितां[1] देख । इतिहासरूपें अगस्ति ॥ १९१ ॥

श्राद्धीं आवंतिजे[1] ब्राह्मण । तरी[2] पितर[3] अक्षई[4] अन्नपान[5] ।
पावती[6] ऐसें[7] मुळींच[8] जाण[9] । व्यासवचन[10] पैं[11] असे[12] ।१९२।

इति श्री भारत आदिपर्वणि । पुढां[1] परिसावें विचक्षणीं ।
कवतुकें[2] वदेल[3] कवीची[4] वाणी । मुक्तेश्वरप्रसादें[5] ॥ १९३ ॥

इति श्रीभारते आदिपर्वणि प्रथमोऽध्यायः ॥

---

इतर आदरें ऐकतां । सकळ दोष जाती तत्त्वतां ।
तया सायोज्यपद(१) ये हाता । श्रवण करितां भावार्थें ॥ १८९ उ ॥

( १ ) सायुज्य° नि.

आदरें जे(१) वाचिती प्रीती । जे श्रवण करिती सुचित्तीं(२) ।
त्यांसि निजपद चढे(३) हातीं । पातकें जाती निःशेष ॥ १८९ ऊ ॥

( १ ) ( – ) नि ; ( २ ) भावार्थी मुं ; ( ३ ) सांपडे नि.

१९०. १ आणि प्रयागीं नि खवर्ग ; २ गाई विप्रा नि ; २–३ गाई विप्रविदुषा° खवर्ग ; ३ °विदुषालागीं नि ; ४ पैं मुं.

१९१. १ प्राशिती नि , पावतां पु ४ , प्रासिता तं.

१९२. १ ब्रह्मविद नि ( कोविद निपा ) खवर्ग ( वेदविद नां ), अैकविजे ( येक जेवी ? ) रा , येक जेवितां गो·२ ; २ परि तं गो ; २–५ आमंत्रितां तृप्ति पितरां संपूर्ण नि , येक तृप्त पितर संपूर्ण खवर्ग ; ६–९ तैसें एक पर्व करितां श्रवण नि खवर्ग ; १०–१२ सर्व शास्त्रांचें फळ लाभे नि खवर्ग .

१९३. १ पुढें नि खवर्ग ( ख प्रसंप्रा ) ; २–४ वदेल मुक्तेश्वराची नि खवर्ग ; ५ लीलाविश्वंभरप्रसादें नि खवर्ग ( विश्वंभरप्रसादें ख ).

॥ श्री ॥

# अध्याय दुसरा

## श्रीगणेशाय नमः

ऐश्वर्याचेनि मदें[1] समर्थें[2] । हेळणा[3] करूनि[4] दीनअनार्थें[5] ।
गांजितां[6] विघ्न[7] पावोनि[8] त्यातें । हाणी[9] करी[10] तें ऐका ॥ १ ॥
जन्मेजयराजा कुरुक्षेत्रीं । परमधार्मिक दीर्घसत्रीं[1] ।
सहवर्तमान ब्रह्मक्षत्री[2] । बंधुत्रय नेटके ॥ २ ॥
श्रुतसेन उग्रसेन । तिसरा अनुज भीमसेन ।
पारपत्य तया[1] अधीन । रायें केलें यज्ञाचें ॥ ३ ॥
तेहीं[1] देवसुनीचा[2] तनय । दुरी देखोनि सारमेय ।
न विचारितां न्याय[3] अन्याय[4] । दंडप्रहरें[5] ताडिला[6] ॥ ४ ॥
तो रुदन करितचि वेगें । जाउनी वृत्तांत मातेसि सांगे ।
येरी ह्मणे[1] त्वां[2] अन्याय आंगें । केला असेल तयाचा ॥ ५ ॥
पुत्र ह्मणे जननीप्रति । अन्याय असलिया[1] कायसी खंती ।
ऐकोनि कुमर[2] धरोनि[3] हातीं । सुनी सभेसी[4] पातली[5] ॥ ६ ॥

---

१. १–२ मदसामर्थ्यें ख औं धु, ; २ समस्तें नां ; ३–५ गांजितां विघ्न पावती निमित्यें औं पु ; ५ दीनें अनाथें नि , दीनानाथें पु४ , दीन अनथें तं ; ६–८ नानापरी छळुनि औं पु ; ९ हानी नि ; १० केली गो२.

२. १ दीर्घसूत्री मुं गो ; २ ब्रह्मक्षेत्रीं नि , °क्षेत्री खवर्ग रा तं.

३. १ त्यां गो·२ .

४. १ तिहीं ख औं धु , तेंहीं पु , ( – ) गो२ ; २ °शुनीचा नि मुं औं ; ३–४ न्यायान्याय नां रा गो·२ पु ; ५ °प्रहारीं नि , °प्रहरीं नां पु ख ; ६ ताडिलें गो·२.

५. १–२ ह्मणतां नां.

६. १ असतां नि खवर्ग ; २ कुमरा नि मुं ; ३ धरिला मुं ; ४ सभेप्रति नि खवर्ग ; ५ पावली मुं . आली ख.

लक्षूनि राजचूडामणी । ह्मणे गा अनीतिवेश्याव्यसनी ।
जालासी ह्मणोनि[1] स्वधर्मपत्नी । कीर्ति रुसोनि जातसे ॥ ७ ॥
राजा विचारी बंधुवर्गा । तवं अन्याय सिवतला[1] दिसे[2] अंगा ।
हें[3] जाणोनि व्यापार उगा[4] । वाग्देवीनें पैं केला ॥ ८ ॥
मुनी ह्मणे अधर्में[1] येणें[2] । शाप घेईं माझेनि वचनें ।
अकस्मात विघ्न येईल तेणें[3] । याग न पवे सिद्धी हा[4] ॥ ९ ॥
राजा उद्विग्न निज[1] मानसीं । मृगयाव्याजें निघे वनासी ।
विजनीं[2] देखियला परमऋषि[3] । श्रुतश्रवा[4] महातपी[5] ॥ १० ॥
नमस्कारूनि मुनिसत्तमा[1] । ह्मणे जी पुरोहित मेळवा[2] आह्मां ।
जो कां सिद्धी[3] पाववी धर्मा[4] । आडमोडोनि[5] अरिष्टें ॥ ११ ॥
ऋषि ह्मणे माझा कुमर । सोमश्रवा तपस्वी थोर ।
याचेनि[1] हातें हा[2] अध्वर । समाप्तीतें पावेल ॥ १२ ॥
माझेनि वीर्यें वीर्यज पुष्टी । परि[1] जन्मला सर्पिणिच्या[2] पोटीं ।
विघ्नें पळती त्याचे[3] दृष्टी[4] । जेविं पातकें हरिनामें ॥ १३ ॥

---

७. १ ह्मणे ख.

८. १ शिवला नि ( स प्रसंप्रा ) ; १–२ दिसे सिवतला नां ; २ ( – ) ख मुं गो ; ३ ( – ) खवर्ग ( मुं प्रसंप्रा ) ; ४ वाउगा ख पु४.

९. १ अधर्म ख पु४ ; २ यणें धु रा , याणें गो·२ ; ३ त्याणें गो·२ ; ४ तें धु.

१०. १ ( – ) नां ; २ त्या वनीं नि ; ३ ब्रह्मऋषी नि , महाऋषि खवर्ग ; ४–५ महातपी श्रुतश्रवा गो·२.

११. १ ऋषिसत्तमा नि गो·२ खवर्ग ; २ ( – ) धु तं ; ३ सिद्ध धु , सीधी तं ; ४ होमा नि ; ५ अड° नि ख.

१२. १ त्याचेनि ख गो·२ , ज्याचेनि औं ; २ ( – ) औं पु.

१३. १ ह्मणे मुं ; २ सर्पिणिचा ( सार्पिणिचां ) पु४ औं ; ३ याच्चिया नि मुं पु४ , याच्चिये ख नां रा ; ३–४ बारा वाटीं गो२.

हा सांगेल तें त्वां[1] करणें । राजा गोउनियां[2] नियमवचनें ।
पुरोहित करुनी परममानें[3] । ब्रह्मसत्रीं स्थापिला ॥ १४ ॥
यावरी धौम्यनामा ऋषि । तपोवनीं[1] स्वाश्रमवासी[2] ।
तिघे शिष्य पैं तयासी । आरुणि[3] उपमन्य[4] आणि वेद ॥ १५ ॥
त्यांतें धौम्य आज्ञापी वचनीं । पांचाळासि[1] जाउनि आरुणि ।
केदारखंड गा[2] बांधोनी[3] । शीघ्र आणीं या[4] ठायां ॥ १६ ॥
आज्ञा होतांचि निघे[1] त्वरित । पाणी पाटें[2] वाफया[3] नेत ।
फुटलें तेथें निरोधार्थ । शरीर आड[4] सूदलें ॥ १७ ॥
उदक गेलिया कोपेल गुरु । ह्मणोनि सांडिला देहव्यापारू ।
धैर्य[1] करूनि पिंडपाथरु[2] । जळीं जळसेन[3] तो जाला ॥ १८ ॥
ऐसे लोटले दिवस कांहीं । सद्गुरु[1] ह्मणे आरुणि[2] नाहीं ।
पाहों आला तवं प्रवाहीं[3] । जळचरप्राय पडिलासे[4] ॥ १९ ॥
श्रीगुरु ह्मणे ये[1] कां[2] आरुणि । येरु ह्मणे येतां सुटेल[3] पाणी ।
उपाध्यायें कृपेकरुनी[4] । करीं धरूनी काढिला[5] ॥ २० ॥

---

१४. १ तां धु , तों ख ; २ गोंवोनियां नि ; ३ मानें नि खवर्ग.

१५. १ तेणं वर्नीं धु , तपोधनी गो ; २ स्वाश्रमासी धु गो॰२ ; ३ अरुणि खवर्ग गो॰२ तं ; ४ उपमन्यु नि ख औं गो२ .

१६. १ हिमांचळासि धु ; २ ( – ) नि पु औं , गंगा धु ; ३ ( + ) पाणी नि ; ४ त्या नि.

१७. १ ( – ) गो॰२ औं पु ; २ पाट ख मुं औं पु , वाटे गो॰२ ; ३ मार्गें औं , वापिया धु पु ; ४ आडवें नां.

१८. १ धर्में ख , (–) मुं , धैर्यें तं नां औं पु ; २ पडिला° धु , पडी° तं ; ३ जळशयन ख तं , जळसंत गो॰२.

१९. १ गुरु मुं ; २ (+) कां नि , (+) आला मुं ; ३ पाहीं धु तं ; ४ पडियेला मुं गो॰२.

२०. १ हें औं पु ; २ गा नि ; ३ फुटेल पु४ मुं नां धु ; ४ कृपा करुनी नि ख मुं धु औं मुं ; ५ ठाकिला धु.

उदक रोधिलें गुरूच्या कामा । ह्मणोनि[1] उद्दालक या नामा ।
ठेवूनि ह्मणे[2] शिष्योत्तमा । वरप्रदान[3] घे माझें ॥ २१ ॥

ज्ञान पूजासन्मान[1] कुळ शील । तप लावण्य संतती[2] बळ ।
अष्टैश्वर्य सर्वकाळ । तुझिया ठायीं हो[3] वसतें[4] ॥ २२ ॥

बहुतकाळ[1] भोगिलें[2] श्रमा[3] । ह्मणोनि पाठविलें[4] स्वाश्रमा ।
यावरी जो कां उपमन्यनामा । दुसरा शिष्य आज्ञापी ॥ २३ ॥

तुवां सवत्स[1] धेनु रक्षावी[2] । धर्मारण्यामाजी चारावी ।
कंडूयमानें[3] तोषवावी । अवश्य ह्मणे उपमन्यु ॥ २४ ॥

आज्ञेनें[1] रक्षित[2] असतां[3] धेनु । शिष्य देखोनि[4] प्रसन्नवदनु ।
श्रीगुरु ह्मणे बाळका प्राणु । किमोपायें[5] जीवविसी ॥ २५ ॥

ह्मणे जी भिक्षान्नें[1] पाळिलें । आचार्य ह्मणे अविहित[2] केलें ।
गुरूसि नेदितां तें[3] जालें । निसिद्धान्न[4] सर्वथा ॥ २६ ॥

अर्ध[1] भिक्षा गुरूसि[2] द्यावी[3] । शेष[4] श्रेयस्कर[5] भक्षावी[6] ।
शिष्य[7] ह्मणे बहुत[8] बरवी[9] । आज्ञा समर्थ स्वामींची ॥ २७ ॥

---

२१. १ यालागीं औं पु ; २ (+) गा नि पु४ नां गो॰२ ; ३ वरप्रमाण तं.

२२. १ प्रज्ञा नि खवर्ग ; २ संपत्ति नि ; ३–४ वसोत नि.

२३. १ बहुतेक गो२ , बहुकाळ मुं पु ; २ भोगिले गो॰२ ; ३ श्रम तं गो२ ; ४ पाठविला नि पु४ रा गो॰२ तं.

२४. १ सवछे नां धु , सवत्छ पु गो२ ; २ न्यावी ख ; ३ कंडूयनें नि , कंडूमानें धु.

२५. १ आज्ञेन रा गो॰२ ; २–३ रक्षितां गो॰२ ; ४ देखे नि ; ५ किमुपायें नि .

२६. १ भिक्षेनें धु पु ; २ अवहित ख रा नां तं , अहित पु ; ३ ( – ) नां पु ; ४ निषिद्धान्न नि , नींद्य जाण धु , निवेध्यान तं.

२७. १ आर्धी धु गो॰२ तं ; २–३ द्यावी गुरुसी मुं ; ४ शिष्यें मुं पु ,

याचि[1] सांगीतलिया रीती । पक्ष मास क्रमिल्या[2] पुढती ।
अवलोकी[3] तवं[4] अंगकांती । दिसे दोंदील[5] साजिरा ॥ २८ ॥
जाणोनि ह्मणे गा[1] शिष्यसुमति । अर्ध देणें अनुचित विहितीं ।
संपूर्ण भिक्षा अवंचकभक्ती । आजिपासोनि दे आह्मां ॥ २९ ॥
आज्ञेसारिखा[1] वर्ते येरू । सर्व भिक्षेनें तोषवी गुरू ।
दुसरेनि माधुकरें[2] जठरू । तृप्त करी आपुला ॥ ३० ॥
धष्ट[1] पुष्ट मांसागळा । देखोनि मागुती ह्मणे रे बाळा ।
कवणेपरी क्षुधानळा । शांतविसी[2] तें सांगें[3] ॥ ३१ ॥
येरू ह्मणे दुसरेनि[1] भिक्षा करीं । श्रीगुरु ह्मणे हिंसाचारी[2] ।
द्विवार भिक्षा क्लेशकारी । ग्रहस्तातें[3] सर्वथा[4] ॥ ३२ ॥
आजिहुनी[1] ऐसें न कीजे[2] प्राज्ञा । जाणत[3] जावी[4] श्रीगुरुसंज्ञा[5] ।
महाप्रसाद ह्मणोनि आज्ञा । शिष्यें माथां वंदिली ॥ ३३ ॥
धेनु चारित असतां वनीं । क्षुधाभुजंग लागतां[1] क्षणीं[2] ।
द्रोणमात्रदुग्धपानीं । शांत करी तयातें ॥ ३४ ॥

---

अर्धशेष धु, असेंस तं; ५ भक्षावी मुं, (+) ते नि; ६ परियेंसी मुं; ७ उपमन्यु मुं; ८ बरवें मुं; ९ आज्ञेसी मुं.

२८. १ त्याचि नि ख; २ क्रमितां नि खवर्ग, क्रमला गो·२; ३–४ अवलोकन करितां नि, अवलोकितां खवर्ग पु·४ (औं प्रसंप्रा); ५ देहीं पु४.

२९. १ (–) मुं नां.

३०. १ °सारिखें धु गो२; २ मधुकरें नि धु; मागोनि, गो२.

३१. १ हृष्ट पु४ औं, धृष्ट नां पु; २ °वितोसी धु; ३ सांग नि.

३२. १ दुसरेन ख मुं औं गो·२ पु; २ ही साचारी नि ख, हें साचारी पु; ३ गृहस्थातें नि रा तं, ग्रहस्थातें नां, गृहस्तातें गो; ४ सर्वदा नि ख गो·२.

३३. १ आजिपासोनि धु नि, आजिहोनि ख गो२; २ करीं नि; ३–४ जाणजे ख; ४ जाणावी पु४ गो, जीवीं गो२; ५ श्रीगुरुअवज्ञा गो.

३४. १ (–) ख, लागला नि नां, लागे मुं औं, लागत रा गो२; २ तत्क्षणीं नि, ततक्षणीं ख पु४ नां, क्षीणीं गो२.

मागुती मांसागळा[1] देखोनि पुसिलें । येरें यथार्थचि[2] कथिलें ।
श्रीगुरु ह्मणे गा[3] उचिष्टिलें । होमद्रव्य नेणतां[5] ॥ ३५ ॥
करूं नये तें[1] न[2] कीजे[3] पुडती । वारंवार सांगणें किती ।
क्लेश न मनुनियां[4] चित्तीं[5] । क्षमा[6] ह्मणे उपमन्यु ॥ ३६ ॥
पयपानही वर्जिल्यावरी । धेनू पाजूनि वत्सा वारी[1] ।
दुग्धफेण[2] तुष्टि करी । अधरसंधीं जो निघे ॥ ३७ ॥
तो[1] सेवुनी[2] कंठी[3] काळ[4] । आनंदभरित सर्वकाळ[5] ।
सद्गुरु ह्मणे हे[6] बाळ । वृत्ति कासेनि[7] काल्पिसी[8] ॥ ३८ ॥
शिष्यें साचचि[1] सांगतां देख[2] । आचार्य ह्मणे अतिपातक ।
वत्साहार[4] अपहारक[5] । त्यातें धेनू शापिती ॥ ३९ ॥
तूतें आह्मीं हेंचि मागणें[1] । जे[2] जीवमात्रातें[3] न पीडणें ।
त्राहे त्राहे ह्मणोनि वचनें । शिष्य निघे निजकार्या ॥ ४० ॥
वनीं करितां गोशुश्रूषे । पीडिला क्षुधेचेनि[1] हुताशें[2] ।
दुग्धभरित भावूनि[3] ढेसे । अर्ककुसुमें भक्षिलीं ॥ ४१ ॥

---

३५. १ **मांसाळ** गो·२ खवर्ग ( **मांसागळे** नां ) ; २ ( + ) **हो** नि रा तं ; ३ ( – ) मुं औं गो२ पु ; ४ **उच्छि°** नि , **उछि°** औं तं ; ५ **येणें तां** नां.

३६. १–२ ( – ) मुं ; ३ **करी** नां ; ४ **मानूनियां** नि ख , **मानी** गो२ ; ५ **चीर्ति** पु४ , **निवांतीं** गो२ ; ६ ( + ) **करा** नि.

३७. १ **वरी** ख पु·४ , **वान्ही** धु तं ; २ **°फेणें** नि ( स प्रसंप्रा ) ख पु४ रा गो२.

३८. १–२ **सेवोनियां** नि खवर्ग ; ३ **काढी** नि , **कठीण** गो·२ ; ४ **वेळ** नि खवर्ग ; ५ **सार्व°** गो·२ ; ६ ( – ) ख नां गो·२ ; ७ **काशानें** नि ; ८ **कंठिसी** नि·

३९. १ ( – ) ख मुं ; २ **देखा** धु गो तं ; ३ **°पातका** धु गो तं , **माहापातक** पु ; ४ **वत्साहाराचा** नि ; ५ **°हारका** धु गो तं.

४०. १ **सांगणें** नि गो·२ ; २ **जें** गो·२ पु ; ३ **जीवमात्रा** नि पु.

४१. १–२ **क्षुधेंचे बहु त्रासें** गो·२ ; ३ **पाहोनि** रा.

तें[1] अतिक्षार उष्ण कटुक । अंगीं व्यापिलें दाहक विख ।
दृष्टी[2] जाऊनि[3] निःशेख[4] । अंध जाला घांगुसे[5] ॥ ४२ ॥
सांजे गृहा[1] आणितां धेनू[2] । कूपीं पडिला न देखोनु ।
धौम्य ह्मणे अतिसहिष्णु । आजि उपमन्यु न येची ॥ ४३ ॥
उबग मानूनि तो नवजाये[1] । मार्गीं येउनी त्या[2] बोभाये ।
उपमन्या तूं सीघ्र ये ये । केउता अससी अपत्या ॥ ४४ ॥
येरू ह्मणे स्वामी[1] न ये येतां । दृष्टि जाउनी कूपा आतौता ।
पडिलों असें[2] हें ऐकतां । ना भीं ह्मणे[3] कळवाळिला ॥ ४५ ॥
मी सांगेन तयाचि[1] परी । अश्विनौदेवस्तवन[2] करीं ।
ते दृष्टि देऊनि बाहेरी । काढतील तुजलागीं ॥ ४६ ॥
तेणें उपदेशिल्यां[1] वचनीं । अश्विनौदेव स्तवितक्षणीं[2] ।
देव धन्वंतरी ते दोन्ही । कृपेनें आले त्या ठायां ॥ ४७ ॥
तिहीं[1] मस्तकीं ठेवुनी हात । अपूप दिधला घृतपाचित ।
ह्मणती[2] बाळका क्षुधापीडित । भक्षण करीं तूं याचें ॥ ४८ ॥
येरू ह्मणे गुरुसी नेदितां सहसा । भक्षण न करीं हा[1] भरंवसा ।
अनन्य विश्वास देखोनि हर्षा । अश्विनौदेव पावले ॥ ४९ ॥

---

४२. १ तीं ख तं धु ; २ तेणें दृष्टी नि ; ३ (+) हो पु४ ख औं रा , होय पु ; ४ निःशेष रा गो.२ खवर्ग , निःशंक तं , विशेष पु४ ; ५ ते क्षणीं नि , घांगुस खवर्ग ( तत्काळ ख ).

४३. १ ग्रहा ख मुं औं रा धु गो२ , ग्राहा पु४ ; २ गोधन नि.

४४. १ वना जाये नि ; २ तो रा गो२ , यां धु.

४५. १ ( – ) ख ; २ आहें नि खवर्ग ; ३ ह्मणोनि नि ख मुं औं पु.

४६. १ तयाचे नि ख पु.४ , तया औं धु तं ; २ °देवांचें स्तवन खवर्ग.

४७. १ उपदेशिलिया नि ख पु , उपदेशिलियां नां ; २ स्तावितां क्षणीं नि , स्तविते क्षिणीं गो.२.

४८. १ तेहीं नां तं ; २ ह्मणे स गो.२ खवर्ग ( औं प्रसंप्रा ).

४९. १ मीं मुं.

कृपेनें स्पर्शतां[1] करतटीं । प्रकट जाली दिव्य दृष्टी ।
धरूनि स्नेहाच्या[2] बाहुवटीं । अंध कूपाहुनि[3] काढिला ॥ ५० ॥
गुरुदास्यविषयीं[1] निज[2] निर्धारू । देखोनि देते जाते वरू ।
ह्मणती धन्यधन्य रे[3] ईश्वरू । तुवां गुरुरूपें[4] सेविला ॥ ५१ ॥
वेदशास्त्र अनुभवज्ञान । रिद्धिसिद्धी[1] स्वछंदमरण[2] ।
शेखीं पावसी पदनिर्वाण । आसीर्वादें आमुच्या ॥ ५२ ॥
वरद[1] वदोनि[2] गेले दोन्ही । येऊनि लागला श्रीगुरुचरणीं ।
तेणेंही तोचि वर देउनी । गृहाश्रमा पाठविला ॥ ५३ ॥
यावरी तृतीय शिष्य वेदु । बुद्धिनिपुण[1] चातुर्यसिंधु ।
गृहशुश्रूषा[2] करितां वेधू । गुरुसी तेणें लाविला ॥ ५४ ॥
न संगत[1] जाणे मनोगत । न मगत[2] पुरवी समयोचित[3] ।
अप्रिय ते राहटीआंत । आचरोनि[4] दावीना ॥ ५५ ॥
क्लेशीं शरीर अचोरणें[1] । केलें लौकिकीं[2] प्रगटूं नेणें ।
मरण मांडल्याही मनें । मर्यादेतें नुलंघी ॥ ५६ ॥

---

५०. १ स्पर्शितां नि गो२ ; २ स्नेहें मुं , [ नि तं मुं सोडून इतर सर्व प्रतींत स्नेहाचा असा पाठ आहे. यावरून स्नेहाचां असा मूळ पाठ दिसतो. ] ; ३ कूपांतुनि नि गो·२ , कुपींहुनी ख औं पु.

५१. १ °दास्याविषयीं नि , °दास्यीं औं ; २ ( – ) नि मुं ; ३ ( – ) नि गो·२ खवर्ग ; ४ कृपेनें धु.

५२. १ ऋद्धि° नि ; २ स्वच्छंद° नि.

५३. १ वर तं नि ; २ देउनी तं धु मुं.

५४. १ बुधी° पु४ धु ; २ गुरुशुश्रूषा नि खवर्ग.

५५. १ सांगतां औं पु सोडून इतर ; २ मागत पु४ नां , मागतां पु·४ नां सोडून इतर ; ३ यथो° धु ; ४ कदा आच° नि.

५६. १ अम्चोरणें नि , आचरणें ख नां धु गो·२ तं , आचोरणें पु·४ ( औं पु२ प्रसंप्राा ) ; २ लोकीं नि पु·४ नां गो·२ रा.

अग्राकडूनि[१] युक्षरस[२] । मुळा येतां आगळा सुरस ।
तैसा वाढता मनोल्हास । दिवसेंदिवस भजनाचा ॥ ५७ ॥
गुरूहुनी ईश्वर असे[१] आन। ऐसें कल्पूंचि[२] नेणे मन ।
सेवा सकळ अनुष्ठान । वेदप्रमाण गुरुवाक्य ॥ ५८ ॥
देखोनि तोषला श्रीगुरुनाथ[१] । माथां ठेविला वरदहस्त ।
आलिंगुनी ह्मणे बहुत । तुझेनि[२] सुख[३] पावलों[४] ॥ ५९ ॥
विवेकासारिखा जोडणें[१] गुरू । जीवासारिखा मित्र[२] उदारू ।
चित्तासारिखा[३] शिष्य चतुरू । हें दुर्लभ तिहीं लोकीं ॥ ६० ॥
कुलीन[१] रू स[२] पतिव्रता । धनिक उदार प्रिय बोलता ।
सर्वज्ञतेवरी[३] अगर्वता । हें दुर्लभ तिहीं लोकीं ॥ ६१ ॥
पुत्र गुणाढ्य पितृभक्त । शास्त्रवेत्ता[१] वैराग्यभरित ।
ब्रह्मज्ञानी शुचिष्मंत । हें दुर्लभ तिहीं लोकीं ॥ ६२ ॥
अगा परिसाची[१] ईश्वरप्रतिमा । दैवें जोडे[२] द्विजसत्तमा[३] ।
भरितें[४] आणी गुरूच्या प्रेमा । ऐसा शिष्य तूं[५] येकु ॥ ६३ ॥
न संगत[१] जाणे तो ईश्वरु । न मगत[२] दे तो नरेश्वरु ।
सांगीतल्यावरि करणी[३] सारू[४]। तो जात्यश्व[५] परि[६] पशु[७] ॥६४॥

---

५७. १ °कडेनें पु४ , अग्र काडोनि गो·२ ; २ युक्षसुरस गो·२.

५८. १ ( – ) नि खवर्ग ; २ कल्पूं पु४ मुं नां गो·२.

५९. १ गुरुनाथ ख गो·२ ; २–४ सुखी जालों तुझेनी नि खवर्ग गो·२ रा.

६०. १ जोडे ख औं गो २ ; २ मैत्र गो२ पु ; ३ चीता° पु४.

६१. १ कुल गो·२ ; २ सुरूप नि , रूप गो ; ३ सर्वज्ञेवरी धु.

६२. १ शास्त्रवेद नां. धु गो·२ मध्यें ही ओवी नाहीं.

६३. १ पारिसा गो·२ : २ जोडिली पु·४ औं ; ३ द्विजोत्तमा गो·२ ; ४ भरतें नि ; ५ तो औं पु गो·२.

६४. १ सांगतां धु नि तं गो·२ मुं ; २ मागतां नि औं पु गो·२ धु तं ; ३ करणीचा नि , ( – ) धु तं ; ४ विसर नि ध्र , कसार तं ; ५–७ जात्या द्विपाद पशू धु नि , जात्यंधापरि° नां , प्राप्त परि° पु४.

सांगीतल्याही[१] जीवीं न धरी । तो पाषाण नरशरीरी ।
ह्मणोनि सकळकळांशिखरीं[२] । कळस[३] चातुर्य[४] जाणिजे[५] ॥६५॥
न लगती[१] कौटालका[२] मार्णे[३] । मनासारिखें राहाटों[४] जाणे ।
सकळ विश्व जिंतिलें[५] तेणें । वशीकरण[६] न करितां[७] ॥ ६६ ॥
असो ऐसिया[१] चातुर्यमूर्ति । आतां घेउनी[२] वरद उचितीं ।
आश्रमा जाऊनि सहज स्थिती । विहितपाळण करावें ॥ ६७ ॥
संतती संपत्ती आणि ज्ञान । पावोनि होसी सुखसंपन्न ।
यापरी वेद[१] गौरवून । स्वाश्रमासी बोळविला[२] ॥ ६८ ॥
तेणें स्वस्थळासि जाऊनि जाण । तिथे शिष्य केले आपण ।
त्यांचेनि संगें स्वधर्माचरण । गुरुचिंतनीं वर्तत[१] ॥ ६९ ॥
गुरुगृहीं भोगिलें क्लेशा । ह्मणोनि काज न संगे[२] शिष्यां ।
पांजिरामाजी[३] पक्षी जैसा । तैसा[४] पाळी शिष्यातें ॥ ७० ॥
तेणें उत्तंक[१] शिष्य सुमति । गृहीं ठेवूनि रक्षणार्थी ।
जन्मेजयाच्या सत्राप्रती । यांचेलागीं[२] स्वयें गेला ॥ ७१ ॥

---

६५. १ सांगीतल्यावरी नि , सांगीतलें मुं ; २ सकळांसी खरी नि , सकळ कळांच्या शिखरीं औं पु ; ३-५ चातुर्यकळा पाहिजे ।न.

६६. १ लागती नि ; २ कौटाळिका नि , °ल्यका पु४ गो ; ३ मौनें नि , मनें खवर्ग ( मानें ख पु ) ; ४ राहाटणें नि ख ; ५ ।जकिलें पु४ धु नि ; ६ वश्यकरणें ख पु·४ गो ; ७ लगतां गो·२.

६७. १ ऐसा ख , ऐसी नां पु ; २ घे मुं.

६८. १ वरें धु ; २ पाठविला औं पु.

६९. १ वर्तता खवर्ग गो·२ रा.

७०. १ या लागीं औं पु ; २ सांगे नि मुं गो·२ रा ; ३ पिंजरियामाजी नि ( पंजिरिया° स ), पांजिऱ्या° गो·२ रा , पांजिरा पु·४ ; ४ तैसें धु नां तं .

७१. १ उत्तम नि ; २ याचिमार्गी नां , याचलागीं ख पु , यज्ञालागीं धु तं , याच्यालागीं गो·२ .

मागें भार्या परम[१] तरुणी । रुतस्नात[२] जालिये दिनीं ।
कामानळें पीडितां[३] मनीं । पुरुषसंगा अपेक्षी[४] ॥ ७२ ॥

उत्तंकातें पाचारुनी । ह्मणे[१] गुरुतुल्य[२] गुरूची[३] पत्नी[४] ।
माझी आज्ञा तुजलागोनी । अलोट जाण सर्वथा ॥ ७३ ॥

यालागीं माझे[१] मनोरथ । पूर्ण करावे[२] न विचारित ।
ऐकोनि येरू आछादित । कर्णद्वारें हस्तकीं ॥ ७४ ॥

ह्मणे मात्रागमन दोषाब्धि । ऐसें प्रगट बोलिजे वेदीं ।
असो निषेधीं[१] भेटवी विधी । ते गुरुआज्ञाही असेना ॥ ७५ ॥

ह्मणोनि भुजंगा न घलीं[१] हात । उठोनि[२] अंतरें[३] गेला त्वरित[४] ।
यावरी स्वल्पचि[५] काळें[६] तेथ । वेदही[७] गृहा पातला ॥ ७६ ॥

त्या[१] सर्वज्ञें[२] जाणोनि सकळ । ह्मणे हा[३] ईश्वरांश केवळ ।
ऐसा निर्विकार निर्मळ । विरळा असेल[४] येकादा ॥ ७७ ॥

वनिता मनोरम येकांतीं । आपण होउनी[१] पुरुष[२] प्रार्थी ।
तेथें जो निर्विकल्प[३] चित्तीं । तो शंकर ह्मणों ये ॥ ७८ ॥

विजनीं भरलीं कनकलोहे[१] । देखिल्यावरी लोटी पायें ।
ऐसी[२] निर्लोभता[३] लाहे[४] । तोचि शंकर ह्मणों ये ॥ ७९ ॥

---

७१. १ **केवळ** नि ; २ **ऋतुस्नात** नि मुं तं ; ३ **पीडित** पु·४ मुं ; ४ **आक्षेपी** धु . [ नां मध्यें ही ओवी गाळिली आहे ]

७३. १ (–) औं पु धु ; २ **गुरुचितुल्य** धु ; ३–४ **गुरुपत्नी** नि ख मुं रा धु.

७४. १ **माझा** नि ; २ **करावा** नि.

७५. १ **निषेध** नि , **निषेधी** ख मुं तं , **निषिद्धीं** पु औं.

७६. १ **घालीं** नि ख नां धु तं पु गो२ ; २ **ठेवूनि** नि तं ; ३ ( – ) मुं नां , **अंतरी** गो२ ; ४ **आंत** मुं ; ५–६ **स्वल्पकाळेंचि** नि ख मुं गो ; ७ **वेद** नि ख पु४.

७७. १ **तो** नि , ( – ) मुं , **यावरी** नां ; २ **सर्वज्ञ** नि धु नां पु४ ; ३ **होय** औं पु४ , **होइल** पु ; ४ **असे** नि औं गो·२.

७८. १ **हुनि** धु , **होनि** पु ; २ **पुरुषा** नि ख मुं धु गो·२ ; ३ **निर्विकार** मुं.

७९. १ **कनकें पाहे** नि ; २–४ **छळितांही क्रोधा नये** औं पु ; ३ (+) **जेथ** ख , **जैं** धु.

जया आधीन मन इंद्रियें[1] । न मनीं[2] सुखदुःखाचे घाये ।
छळितांही[3] परिक्रोधा[4] न ये । तोचि शंकर ह्मणों ये ॥ ८० ॥
सकळ ज्ञानियांचा रावो । जितेंद्रिय देवाधिदेवो ।
ऐसा माझा[1] निश्चयो भावो । सत्य सत्य त्रिवाचा ॥ ८१ ॥
जया इंद्रियनियम[1] नाहीं । तो श्वानसूकरासमान पाहीं ।
आप परावें[2] हें[3] कांहीं[4] । न विचारितां[5] स्वीकारी[6] ॥ ८२ ॥
ऐसा[1] मानवोनी मनीं । शिष्य बोळवी[2] आज्ञापुनी ।
येरू ह्मणे कांहीं वचनीं । गुरुदक्षणा म्यां देणें ॥ ८३ ॥
गुरु ह्मणे गा सर्व पावलें । शिष्य[1] ह्मणे मज न वटे[2] भलें ।
यावरी स्त्रियेतें विचारिलें[3] । इछित कांहीं या[4] सांगें[5] ॥ ८४ ॥
ते ह्मणे पुष्यभूपाळपत्नी[1] । दिव्य कुंडलें लेइलीं कर्णीं ।
ते[2] मज दिधल्यां[3] आणुनी । गुरुदक्षणा[4] पावली ॥ ८५ ॥
आजिपासुनी चौथे दिनीं । मांगल्यकृत्य मंडपस्थानीं ।
लेउनी बैसें[1] पुण्याहवचनीं[2] । ऐसें केलें[3] पाहिजे[4] ॥ ८६ ॥

---

८०. १ मनेंद्रियें पु४ ; २ मनुनी ख नां गो·२ ; ३ छळितां धु तं ; ४ परक्रोधा नि , क्रोधा मुं औं पु , परिक्रोध रा गो·२.

८१. १ याचा पु४.

८२. १ इंद्रियनेम नि नां औं पु ; २ पर मुं औं पु ; २–४ परावेंहि न पाही ख ; ५ विचारित पु·४ औं नां रा तं ; ६ विकारी औं पु .

८३. १ ऐसें पु४ नां औं रा तं ; २ बोलावी औं पु , बोळविला नि.

८४. १ येरू औं मुं ; २ वाटे नि मुं तं पु ; ३ बोलाविलें मुं , पाचारिलें औं पु ; ४ मज औं पु गो२ ; ४–५ सांग पां ख .

८५. १ पौष्य° नि ; २ तीं नि ; ३ दिधालिया रा नि औं , °लियां पु·४ नां °लेया गो·२ ; ४ °दक्षिणा नि.

८६. १ बैसेन नि ; २ °वाचनीं नि औं मुं ; ३–४ कांहीं करावें मुं.

अमृतस्रावी महीमौल्यें[1] । पद्मरागमणिकुंडलें[2] ।
ते[3] मज देसी तरी पावलें । दक्षणारुण[4] गुरूचें ॥ ८७ ॥

आज्ञा घेऊनि चालिला येरू । मार्गीं देखे[1] वृषभ थोरू ।
त्यावरी आरूढला नरू । तेणें गोमय वोपिलें ॥ ८८ ॥

ह्मणे हें भक्षीं रे बाळका । येरें आज्ञेनें[1] सेविलें देखा ।
हस्त पुसोनियां मुखा । त्वरें पुढारां[2] चामके ॥ ८९ ॥

वनें अटव्यें उलंघुन[1] । पावला पुष्यरायाचें भुवन ।
गृहा जाउनी आसीर्वचन । प्रभुलागीं दीधलें[2] ॥ ९० ॥

पुष्य ह्मणे चोज अद्भुत । मनुष्य कैसेनि[1] पावलें[2] येथ ।
वृत्तांत पुसतां पैं[3] यथार्थ । गमनहेतु[4] सांगीतला[5] ॥ ९१ ॥

गुरूच्या कार्यालागीं थोरु[1] । दुरी[2] पातला[3] धरुनी धीरू[4] ।
ग्रहस्त ह्मणे याचें करूं[5] । आलें[6] काज[7] सर्वथा ॥ ९२ ॥

सांगे[1] जाईं[2] गृहा आतौता । पत्नी माझी पतिव्रता ।
तीप्रती[3] सांगोनि वृत्तांता । मागोनि घेईं कुंडलें ॥ ९३ ॥

---

८७. १ महामौल्यें नि खवर्ग (अडलें ? ख) ; २ °महाकुंडलें औं पु ; ३ (–) नि ; ४ दाक्षिणाऋण नि तं .

८८. १ देखिला नि गो·२ खवर्ग .

८९. १ अनन्य औं पु ; २ पुढें नि औं पु , पुढां ख मुं नां.

९०. १ उल्लंघून नि तं ; २ गौरविलें धु , वोपिलें ख.

९१. १–२ पातलें कैसेनि नि ; ३ (–) नि खवर्ग ; ४ आगमन° नि , मनोगतु औं , मग मन° पु ; ५ निवेदिला औं.

९२. १ थोर धु तं ; २ दुरुनी ख पु४ ; ३ पातलों नि धु गो२ औं ; ४ धीर धु तं ; ५ कार्य धु तं ; ६ करूं धु तं ; ७ कार्य मुं औं , (–) तं.

९३. १ सांग रा गो·२ , सांगों औं पु ; २ जाय नि खवर्ग ; ३ तिजप्रती नि.

उत्तंक प्रवेशे[1] निकेतनीं । तवं गृहामाजी न देखे[2] कोण्ही ।
बाहेरि पातला परतोनी[3] । ह्मणे केउती[4] नेणवे[5] ॥ ९४ ॥
येरू ह्मणे उचिष्ट[1] असेल मुख[2] । क्षाळीं चरणद्वय हस्तक[3] ।
आचमन करूनि सम्यक[4] । जाई ह्मणे मागुता ॥ ९५ ॥
जाऊनि पाहिली ब्रह्मचारी । तवं देखिली जैसी गौरी ।
नमस्कारोनि जोडल्यां[1] करीं । समाचार निवेदी ॥ ९६ ॥
तुझिया कुंडलांचा काम । माझिये गुरुपत्नीसी परम ।
यालागीं पातलों[1] दुर्गम । महापंथ क्रमूनी[2] ॥ ९७ ॥
तिणें[1] पतीचे आज्ञेकरून[2] । कुंडलें[3] ब्राह्मणां[4] दिधलीं दान ।
पुष्य ह्मणे गुह्य सांगेन । तें तूं ऐकें ब्राह्मणा ॥ ९८ ॥
इयें[1] कुंडलें अमोल्य तेजें । बहुवेळा तक्षक नागराजें ।
मागीतलीं परी मन माझें । नेदीचि मैत्री[2] सांडुनी[3] ॥ ९९ ॥
तो तुज[1] सिंतरील[2] दुर्मति । संभाळूनि जाईजे पंथीं ।
मागुती ह्मणे आजिचे तिथी । श्राद्ध मम[3] गृहीं[4] संपादीं[5] ॥ १०० ॥

---

९४. १ निघे औं पु ; २ दिसे नि ; ३ तेथानि गो·२ ; ४ केउते नि ; ५ ते नव्हे नि.

९५. १ उच्छिष्ट नि ; २ मुखीं गो·२ ; ३ हस्तकीं गो·२ ; ४ सम्यकीं गो·२ , निःशंक औं , साशंक पु .

९६. १ जोडिल्या नि ख , जोडल्या पु४ मुं औं गो२ , जोडिलां गो , जोडला धु .

९७. १ पावलों औं पु ; २ क्रमूनियां नि औं पु .

९८. १ तिनें ख नां धु पु·४ , तिया औं ; २ °वरून नि ख रा ; ३–४ ब्राह्मणा कुंडलें नि खवर्ग.

९९. १ हीं नि ख पु गो·२ , हे रा नां ,(–) औं पु मुं ; २–३ मोह सोडुनी नि.

१००. १–२ तुजशीं हरील नि ;२ सींकरील ख रा गो·२ , सींतरी आ पु ; ३–४ असे नि , माझे खवर्ग रा गो·२ ; ५ पितयाचें औं पु.

संकल्प सारूनि[1] कल्पोक्त मंत्रीं । अन्न वाढिता जाला पात्रीं ।
निवालें देखोनि परम श्रोत्री । उत्तंक कोपें कोपला[2] ॥ १०१ ॥
ह्मणे रे[1] पर्युषित अन्न । श्राद्धीं देसी मज हेळून ।
तात्काळ जाऊनियां नयन । अंध होई[2] मदांधा ॥ १०२ ॥
ग्रहस्त[1] ह्मणे मी भोळेपणें[2] । सहसा कापट्य कांहीं नेणें ।
न विचारितां त्वां[3] कृतघ्नें । अनर्थ केला मजवरी ॥ १०३ ॥
निरपराधें शापिलें[1] पाहीं । तरी अपत्यहीन होसील[2] तूंही ।
ब्राह्मण ह्मणे लटिकें[3] नाहीं । पात्र दृष्टी विलोकीं ॥ १०४ ॥
ग्रहस्त शोधूनियां[1] पाहत[2] । तवं[3] अनुष्ण[4] आणि[5] केशयुक्त[6] ।
हें देखोनि साशंकित । शब्द कांहीं न बोले ॥ १०५ ॥
उत्तंक ह्मणे ग्रहस्तातें । अन्न सकेश[1] शीत मातें ।
देऊनि तूंचि[2] शापोक्तीतें । बोलसी हा अधर्म ॥ १०६ ॥
पुष्य ह्मणे मुक्तकेशी[1] । भार्येनें निवेदिलें[2] अन्नासी ।
तें मी नेणें कृपारासी । क्षमा कीजे[3] सर्वथा ॥ १०७ ॥
ब्राह्मण बोले उशापशब्द[1] । क्षणयेक[2] होऊनियां अंध ।
मागुती[3] चक्षुष्मंत[4] शुद्ध । होसी[5] सर्व देखणा ॥ १०८ ॥

---

१०१. १ सोडोनि ख पु४ , सांगोनि मुं , सांडुनी ना औं पु , करोनी गो२ ; २ खवळला औं पु.

१०२. १ ह मुं , ( – ) नां औं पु ; २ होसी नि, होय औं पु.

१०३. १ गृहस्थ नि तं , ग्रहस्थ औं रा ; २ भलेपणें पु ; ३ तां धु तं.

१०४. १ श्रापिलें नां ; २ होसी नां पु औं गो·२ ; ३ लटकें नि . अनृत औं.

१०५. १ पाहातांचि औं ; २ तेथ औं ; ३ ( – ) धु ; ४ तें देखिलें औं ; ५ ( – ) औं ; ६ अयुक्त औं पु .

१०६. १ संकेसी औं पु , सकेशित तं ; २ तोचि ख पु४.

१०७. १ °केसीं नां ; २ निर्मिलें मुं ; ३ करणें औं पु , करीं ख .

१०८. १ उःशाप° नि , उश्राप° औं पु तं ; २ क्षिणेक पु४ गो ; ३ मागुता पु·४ औं गो ; ४ चाक्षुषांत नि ; ५ होशील नि.

मातें शाप[1] दिधला रोषें । तो परिहारीं[2] प्रसन्न तोषें ।
येरू ह्मणे नवनीता[3] ऐसें । ब्राह्मणहृदय बोलिजे ॥ १०९ ॥
क्षत्रियाचें हृदय जाण । अतिकठोर[1] करुणाहीन ।
यालागीं उशापाचें वचन । मजपासूनि न पवसी[2] ॥ ११० ॥
उत्तंक ह्मणे अशुद्ध[1] अन्न[2] । असतां मातें शापवचन ।
बाधीना[3] हें सत्य जाण[4] । कृपाबळें श्रीगुरूच्या[5] ॥ १११ ॥
ऐसें परस्परें पाहीं । समाधान कल्पूनि तेहीं[1] ।
कुंडलें घेऊनि लवलाहीं । उत्तंक तेथूनि निघाला ॥ ११२ ॥
त्वरें जातसे वातवेगें । क्षणक्षणा पाहतसे[1] मागें ।
तवं अंतरें[2] पाठीलागें । क्षपणिक येक येतसे ॥ ११३ ॥
कांहीं दृष्टी पडे न पडे । उत्तंकें धांव घेतली पुढें ।
कंठ शोकला[1] उदकचाडें । तृषानळें[2] तापला[3] ॥ ११४ ॥
तवं वापिका देखिली दृष्टी । कुंडलें ठेवुनी[1] तिच्या[2] कांठीं[3] ।
माजी[4] उतरोनि अंजुळिपुटीं[5] । तोय प्राशन जवं[6] करी ॥११५॥
तवं तक्षकें वेगु केला । कुंडलें घेउनी सत्वर[1] गेला ।
देखोनि उत्तंक धावीनला[2] । पाठी लागे लवलाहें[3] ॥ ११६ ॥

---

१०९. १ श्राप औं पु ; २ परिहरीं ख मुं औं रा गो·२ ; ३ नवनीत नि.

११०. १ °कठीण औं पु ; २ पावसी नि मुं , पवें पु·४ .

१११. १ शुद्ध गो·२ ; १–२ अशुद्धान्न खवर्ग ; ३ बाधेना नि ; ४ वचन गो·२ ; ५ गुरूच्या नि खवर्ग गो२.

११२. १ ठाईं नां .

११३. १ पाहे नि ; २ अंतर पु४ नां गो·२ .

११४. १ शोषला नि ( स प्रसंप्रा ) ख मुं नां ; २ तृष्णानळें तं ; ३ पीडिला नि , व्यापिलें धु तं.

११५. १ ठेवी नि खवर्ग ( ठेविलीं पु४ ) ; २ तिचा नां धु गो२ पु [ मूळ तिचां असा पाठ दिसतो ] ; ३ निकटीं रा ; ४ तीमाजी नि ; ५ अंजळी° नि ; ६ तो ख.

११६. १ त्वरें ख गो ; २ धाविन्नला नि रा गो·२ ; ३ लवलाहीं नि तं मुं नां , लगबगीं औं.

ब्राह्मण लागला[1] देखोनि[2] पाठी । तक्षक रिघे[3] महीच्या[4] पोटीं ।
पाताळ भेदुनी सेवटीं[5] । नागभुवनीं[6] प्रवेशे[7] ॥ ११७ ॥
उत्तंक हावें भरला[1] पोटीं[2] । दंडकाष्ठ धरूनि[3] मुष्टी ।
खाणों[4] आदरिली[5] पृष्ठी[6] । धरित्रीची[7] आवेशें ॥ ११८ ॥
स्वर्गींहूनि अमरनाथें । दृष्टी देखिलें[1] करुणाभरितें[2] ।
प्रेरिता जाला पैं[3] वज्रातें । छिद्र धरे[4] पाडावया ॥ ११९ ॥
आज्ञा होतां[1] वज्रदंभोळी । धरा भेदिली जगतीतळीं ।
उत्तंक प्रवेशे तये बिळीं[2] । तवं पाताळ[3] पावला[4] ॥ १२० ॥
देखे[1] सर्पांचीं दिव्य भुवनें । पद्मिनींचीं क्रीडतीं[2] स्थानें ।
ब्राह्मण निर्भय अन्तःकरणें । नागवर्णन करीतसे ॥ १२१ ॥
तवं आश्चिर्य[1] देखे[2] नयनीं । तंतुकारस्त्रिया दोन्ही ।
श्वेतकृष्णतंतु धरूनी । उकलितातीं निजकरें ॥ १२२ ॥
चक्र येक द्वादशधार । तयाजवळीं[1] षट्‌कुमार ।
पुरुष येक बैसला थोर । प्रतिष्ठित आसनीं ॥ १२३ ॥

---

११७. १–२ **देखोनि लागला** धु ; ३ **निघे** नि पु४ मुं नां तं, **निघाला** ख औं, **रिघाला** पु ; ४ **महीचा** धु गो·२ [ **महीचां** ] ; ५ **शेवटीं** नि पु४ ; ६ **नागलोकीं** मुं ; ७ **प्रवेशला** औं पु गो·२.

११८. १ **भरोनि** मुं औं ; २ **पाठीं** ख पु४ मुं नां तं ; ३ **घेवोनि** पु४ ; ४ **खणों** मुं गो·२ ; ५ **आदरिलें** नि, **आरंभिली** ख, **आराधिली** गो ; ६ **पुष्टी** पु·४ नां औं रा गो·२ ; ७ **धरित्रीच्या** नि.

११९. १ **देखोनि** ख ; २ **कृपाभरितें** नि खवर्ग ; ३ ( – ) मुं धु पु ; ४ **धरणी** पु४, **धरित्रीत** नि औं पु ख नां, **धरते** तं.

१२०. १ **होतांचि** पु४ मुं गो ; २ **वेळीं** औं पु ; ३ **पाताळा** नि मुं औं तं ; ४ **पातला** गो·२.

१२१. १ **देखोनि** नि ; २ **क्रीडा** ख मुं गो, **क्रीडण** गो२.

१२२. १ **आश्चर्य** नि गो·२ तं ; २ **देखोनि** नि नां.

१२३. १ °**जवळ** नि खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) ; पु४ मध्यें ३–४ चरण **जोडल्या करीं सुखनिर्भर । पुजूं आदरिला सुरेश्वरू ॥**

तेणें संकेत दावूनि करीं । ह्मणे इंद्राचें स्तवन करीं ।
तो कृपाळु ये अवस्वरीं[1] । इछा[2] तुझी पुरवील ॥ १२४ ॥
आज्ञा वंदूनि ब्राह्मणकुमर । जोडल्या[1] करीं सुखनिर्भर ।
पुजूं[2] आदरिला[3] सुरेश्वर । शब्दसुमनीं[4] आपुल्या[5] ॥ १२५ ॥
ह्मणे जय जय सहस्रनयना । शैलदळणा[1] शचीरमणा ।
त्रैलोक्यावरी[2] तुझी आज्ञा । ध्वजप्राय[3] मिरवतसे ॥ १२६ ॥
मर्यादारेखेहुनि[1] आरुती[2] । सिंधुसी यावया कंचि प्राप्ति ।
उदयाचळावरी गभस्ति । उभा ठाके निशांतीं[3] ॥ १२७ ॥
भूगोलकुंभ धरुनी शिरीं । शेष तिष्ठे कल्पांतवरी ।
मध्यें उतरावया तिळभरी[1] । धैर्य पोटीं त्या नव्हे ॥ १२८ ॥
ग्रीष्मकाळ[1] सरतांक्षणीं[2] । भरुनी लवणाब्धीचें पाणी ।
मेघीं सिंपोनियां धरणी[3] । धान्यमंडित करावी ॥ १२९ ॥
मृत्युकाळ[1] मारक परम । तो[2] आयुष्य असतां वांकुडी[3] रोम ।
करूं न शके येथ नियम । तुझे आज्ञेचा अलोट[4] ॥ १३० ॥
वज्रधर्ता भुवनगोप्ता[1] । वृत्रशत्रु नमुचिहंता ।
गौरवर्ण वरी वेढिता । कृष्णांबरें साजिरीं ॥ १३१ ॥

---

१२४. १ **अवसरीं** पु·४ मुं ना रा ; २ **इच्छा** नि , **इत्सा** पु४.

१२५. १ **जोडला** धु नां, **जोडलां** गो; २ **पुजूनि** नि गो·२ ; ३ **आरंभिला** ख ; ४ **शब्दकुसुमें** पु ४ ; ५ **आपुला** धु नां तं [ **आपुलां** ].

१२६. १ **शैलदमना** नि गो२ , **शैल्यदळणा** पु ४ मुं नां , **शैल्यदळीं** पु , **शल्यदमनीं** औं ; २ **त्रैलोकयांत** नि ; ३ **ध्वजाप्राय** ख नां औं पु .

१२७. १ **मर्यादा देखोनी** ख पु४ , **मर्याद**° मुं नां तं गो·२ ; २ **अरती** मुं नां, **अरुती** ख रा ; ३ **न शांती** धु, **निशाचरीं** ख. नि मध्यें ही ओवी नाहीं.

१२८. १ **क्षणभरी** धु तं.

१२९. १ °**काळीं** औं पु तं ; २ **सरिता**° औं पु ; ३ **मेदिनी** गो .

१३०. १ **मृत्य**° पु४ नां ; २ ( – ) नि ; ३ **वांकडें** नि ; ४ **अवलोट** पु४ गो·२.

१३१. १ °**गुप्ता** ख पु४.

तिहीं लोकीं सत्यासत्य । प्राणी राहटे प्रगट[1] गुप्त[2] ।
तें तूं जाणसी यथार्थ । सर्वज्ञ नाथ ह्मणोनि ॥ १३२ ॥
ऐसिया स्वामी सर्वसमर्था[1] । करुणा[2] कीजे[3] मज अनाथा ।
सद्गुरुवरद[4] कुसुमीं माथा । भरे माझा तें करीं ॥ १३३ ॥
ऐसें स्तवन[1] करितां[2] गाढें । श्वेत अश्व देखिला पुढें ।
पुरुष ह्मणे रे[3] बालका तोंडें । अपान याचें फुंकीं कां ॥ १३४ ॥
वदनानिळें[1] अपान फुंकी । तवं कर्णनयनमुखनासिकीं ।
ज्वाला धडकलिया प्रत्येकीं[2] । धूमें पाताळ कोंदलें ॥ १३५ ॥
सर्प ह्मणती मांडला प्रळयो । मस्तकें[1] झाडिती[2] कोंडला वायो ।
ते वेळीं[3] धाकें कद्रुतनयो । कुंडलें आणूनि देतसे ॥ १३६ ॥
ह्मणे मज सांपडलीं काननीं[1] । तुझीं ऐसीं न संगे[2] कोण्ही ।
आतां क्रोधक्षमा करूनी । कुंडलें घेऊनि जाइंजे ॥ १३७ ॥
तक्षक सांगोनि गेलियावरी । पुरुष ह्मणे वारुवावरी[1] ।
आरुढोनि निर्विघ्न करीं । गमन पंथीं[2] बाळका ॥ १३८ ॥
येरू वंदूनि[1] वारुवा[2] वळघे । कौतुकें पातया पातें न लगे[3] ।
वेदाश्रमा पावला वेगें । चतुर्थदिनीं सोहळयां ॥ १३९ ॥

---

१३२. १–२ गुप्तागुप्त रा.

१३३. १ सर्वज्ञसमर्था नि , समर्था पु४ , सर्वासमर्था गो.२ ; २ कृपा नि खवर्ग ; ३ करीजे नि ; ४ सद्गुरुवर नि.

१३४. १–२ करितां स्तवन नि ; ३ ( – ) मुं औं धु.

१३५. १ वदनानळें नि ख पु४ रा गो ; २ देखी नि , प्रत्यकीं औं रा धु गो.२ पु , प्रतेकीं नां तं , प्रत्यंकीं मुं. [ प्रत्यंगीं ? ]

१३६. १–२ मस्तकांत नि ; २ सांडिती ख रा धु ; ३ वेळे नि.

१३७. १ का वनिं तं ; २ सांगे नि मुं धु.

१३८. १ वारुवरी नि मुं पु ; २ अतां मुं.

१३९. १ तंव नि ; २ वारुवीं नि , वारूवावरी धु तं ; ३ लागे नि.

नमस्कारूनि मंडपस्थानीं । कुंडलीं पूजिली आचार्यपत्नी ।<br>
श्रीगुरु पुसे बाळका नयनीं[1] । आश्चिर्य[2] कांहीं देखिलें ।। १४० ।।<br>
शिष्यें कथिली[1] समूळ[2] कथा । न कळे तें मज[3] सांगिजे[4] ताता[5] ।<br>
श्रीगुरु ह्मणे मार्गीं जातां । पहिलें[6] भेटला[7] वृषभेंसी[8] ।। १४१ ।।<br>
तो जाण इंद्र अमरपति । वृषभ[1] वोळखें[2] ऐरावती ।<br>
मूत्र पुरीष वोपिलें हातीं । तें पीयूष प्राशविलें ।। १४२ ।।<br>
तेणें विषोल्बणांच्या भुवनीं । कल्याण जालें तुजलागुनी ।<br>
माझा परम मित्र[1] ह्मणोनी । तुज निर्वाणीं[2] रक्षिलें ।। १४३ ।।<br>
तंतुकारिणी दोघी[1] वनिता । त्या[2] जाण धाता आणि[3] विधाता ।<br>
दिवसरात्री गा तत्त्वता । श्वेतकृष्ण तंतू ते ।। १४४ ।।<br>
चक्र कां[1] द्वादशधार । ते द्वादश मासेंसि[2] संवत्सर ।<br>
साही ऋतु[3] ते षट्कुमार । प्रत्यक्ष दृष्टी दाविले[4] ।। १४५ ।।<br>
पुरुष जाण गा[1] पर्जन्य[2] । अश्व वोळखें हुताशन ।<br>
ऐसें सांगोनि आलिंगन । स्नेहें शिष्या दीधलें ।। १४६ ।।<br>
माथां ठेवूनि उदार[1] कर । वर[2] दे[3] सर्व[4] श्रेयस्कर[5] ।<br>
यापरी बोळविला कुमर । उत्तंक तेणें[6] स्वाश्रमा[7] ।। १४७ ।।

---

१४०. १ **लागुनी** मुं ; २ **आश्चर्य** नि रा गो·२ .

१४१. १–२ **समूळ कथिली** नि खवर्ग ( २ **सकळ** ख ); ३ ( – ) ख औं पु ; ४ **सांगीजो** गो ; ५ **आतां** गो·२ ; ६ **पहिलेंनि** नि ख ; ७ **भेटी** नि , **भेटलों** पु , **भेटला** ख मुं ; ८ **वृषभ** धु तं.

१४२. १–२ **तो जाण वृषभ** नि ख , **जाण तो वृषभ** पु·४ मुं , **वृषभ तो**

१४३. १ **प्रिय** धु तं ; २ **सर्वांनीं** पु४.

**गा** औं.

१४४. १ ( + ) **जणी** ख नां ; २ **ते** नि, ( – ) औं पु ; ३ ( – ) मुं गो२.

१४५. १ **जें** नि तं खवर्ग ( पु प्रसंप्रा ) ; २ **मास** औं पु ; ३ **रुतू** पु४ नां रा धु गो·२ ; ४ **दाखविलें** धु , **दाखलें** तं.

१४६. १ ( – ) नां औं गो·२ ; २ **प्रजन्य** ख औं धु.

१४७. १ **वरद** ख ; २–३ **वर वदे** नि , **वरद वदे** औं ; ४ ( – ) नि औं ; २–४ **देता जाला** धु तं ; ५ **यशास्कर** ख , **श्रद्धाकर** गो·२ ; ६–७ **गेला स्वस्थाना** औं पु.

तो स्वाश्रमीं विश्रामोन[1] । तक्षकद्वेष[2] स्मरोनि जाण[3] ।
कुरुक्षेत्राप्रती[4] जाऊन[5] । जन्मेजयातें[6] भेटला ॥ १४८ ॥
ह्मणे राया विचारचतुरा[1] । सकारण[2] अर्थ सांडुनी[3] पऱ्हां[4] ।
निष्कारण[5] कर्माचारा[6] । करितां कोण पुरुषार्थ ॥ १४९ ॥
तुझिया पितयाचा घेतला[1] प्राण । त्या सर्पाचें करावें दहन[2] ।
हें कां[3] तुज[4] नेदिती[5] स्मरण । रुषेश्वर[6] कोण्हीही ॥ १५० ॥
ऐसा[1] पितृसुडाचा[2] लोभ[3] । राजहृदया[4] आणूनि क्षोभ ।
सर्पसत्राचा आरंभ[5] । करिता जाला तें[6] ऐका ॥ १५१ ॥
कथिलें पवित्र[1] पुण्याख्यान[2] । सत्सिष्याचें[3] निजलक्षण ।
सद्गुरुभजनें[4] पाविजे जाण । धर्मार्थकाममोक्षादि ॥ १५२ ॥
इति श्रीभारते[1] आदिपर्वणि । पुढां[2] पौलोमास्तिकाख्यानीं ।
वदेल मुक्तेश्वराची वाणी । तें पंडितीं परिसिजे ॥ १५३ ॥

इति श्रीभारते आदिपर्वाणि द्वितीयाध्यायः ॥

---

१४८. १ **विश्रामोनी** धु तं; २ °**क्लेश** नि खवर्ग; ३ **मनीं** धु तं; ४ °**क्षेत्रासि** नि, °**क्षेत्रावरी** खवर्ग (°**क्षेत्रासि** मुं); ५ **जाउनी** धु तं; ६ **जनमेजयातें** नि, **जन्मो**° ख पु४ नां.

१४९. १ **विवेकचतुरा** नां रा; २ **सकार** नि; ३ **सोडून** नि; ४ **परा** नि ख औं पु नां, **पैऱ्हां** तं, **पैऱ्हा** रा, **सैरा** गो·२; ५ **निष्काम** ख, **निष्कर्माचिया** औं, **निष्कर्माचा** पु; ६ **कारणाचारा** ख, **चारा** औं, **वारा** पु.

१५०. १ **घेतले** गो·२; २ **हनन** धु गो२; ३ (–) नि खवर्ग; ४ (–) खवर्ग; ५ **नेदीच** औं पु गो२, **नेदितीच** नि ख पु४ रा गो; ६ **ऋषी**° नि, **ऋषे**° मुं रा तं गो·२.

१५१. १–३ **पितृसुडाचा ऐसा लोभ** धु तं; २ **पित्रु**° ख पु४ नां गो; ३ **लाभ** नि खवर्ग (**प्रारंभ** नां, **कोंभ** औं); ४ °**हृदयीं** नि खवर्ग (पु४ प्रसंप्रा) गो·२; ५ **प्रारंभ** गो·२; ६ **तो** नां धु तं.

१५२. १–२ **पुण्य पवित्राख्यान** औं पु; २ **पुण्याख्यान** रा स, **पौष्याख्यान** नि; ३ **सच्छिष्याचें** नि; ४ **श्रीगुरुपदीं** नि, **श्रीगुरु**° खवर्ग.

१५३. १ **श्रीभारत** नि औं पु; २ **पुढें** ख मुं रा गो·२.

इति श्रीभारते आदिपर्वणि द्वितीयाध्यायः ॥

ज्यालागीं केले क्लेश बहुत । वैरीं[1] हरिलें[2] तें[3] अमृत ।
परम खेद मानूनि तेथ । धांवा[4] करी[5] विष्णूचा[6] ॥ १२७ ॥
ऐसें विषम[1] देखोनि त्वरित[2] । विबुधवरद[3] वैकुंठनाथ ।
मोहनीअवतार धरूनि तेथ[4] । प्रकट जाला ते काळीं ॥ १२८ ॥
मायामूळपीठनिवासिनी[1] । अनंतशक्तीची निजस्वामिणी[2] ।
वेदवाचा वरयक्षिणी[3] । गोंधळ गाती जियेचा[4] ॥ १२९ ॥
ब्रह्मादिक[1] अजातबाळें । गर्भीं पाळी मोहसमेळें[2] ।
परि नुघडीच[3] येकाचेहि डोळे । आपणातें देखावया[4] ॥ १३० ॥
जे[1] ब्रह्मसुखाचा अमृतोदधि । माजी[2] वसवोनि[3] चाखों नेदी ।
मृगजळप्राय विषयनदी[4] । भ्रमें रमवी जगातें ॥ १३१ ॥
असो[1] ऐसी[2] विश्वमोहनी[3] । मूळमायेची कुळस्वामिणी ।
सुरासुरीं[4] देखतां नयनीं । पतंगप्राय दीपले[5] ॥ १३२ ॥

---

१२७. १–३ **तें वैरींनीं हरिलें** नि, **तें वैरीं हिरतलें** खवर्ग, **तें वैरीं हरिलें** नां पु ४, **वैरीं हिरतलें** गो२ ; ४–६ **प्रगट झाला ते काळीं** औं पु गो॰२ [ हा पुढच्या ओवीचा चरण आहे. ].

१२८. १ (–) खवर्ग ; २ **तेथ** नि धु ; ३ **विबुधवर** औं पु , **विषुद्ध वचनें** ख ; ४ **त्वरित** नि धु.

१२९. १ **माता°** ख ; २ **स्वामिणी** खवर्ग ; ३ **वरयक्षणी** ख रा गो॰२ नां , **वरदक्षीणि** पु४ , **वरदायिनी** नि , **वरदायेनी** धु , **वरदक्षणी** मुं ; ४ **इयेचा** नि गो.

१३०. १ **ब्रह्मादिकें** नि नां रा पु ; २ **मोहें समेळें** नि , **मोहो समेळें** गो , **मोहो सकळें** गो२ ; ३ **नुलंगीच** गो , **नुघडी** नि खवर्ग ; ४ **देखाव्या** गो॰२.

१३१. १ **जो** नि स धु ख ; २ ( + ) **जीवा** नां ; ३ **सांठउनि** नां ; ४ **विषयानदी** ख मुं नां रा, **विषमानंदी** गो , **विषयानंदी** गो२, **विषया निंदी** औं.

१३२. १ ( – ) औं ; २ ( + ) **जें कां** औं ; ३ **विश्वमोहिनी** नि मुं गो॰२, **विश्वजननी** ख ; ४ **सुरासुर** नि (स प्रसंप्रा) खवर्ग (**सुरीं** पु४); ५ **मीनलें** औं पु.

अवलोकितां कंदर्पकोटी । सांडणें होतें[1] चरणांगुष्ठीं ।
त्रैलोक्यलावण्याची[2] पेटी[3] । देवां[4] दैवें[5] उघडली[6] ॥ १३३ ॥
झगटतां[1] दंतदीप्तिचा[2] रंग । पाषाण होती पद्मराग ।
स्मित[3] होतां[4] भूतळीं चांग । रत्नरासी विखुरती[5] ॥ १३४ ॥
पाय ठेवितां महीमंडळीं[1] । सुवर्णकमळें सहस्रदळीं ।
उगवती तेथें परागधूळी । माजी लोळे[2] वसंतु ॥ १३५ ॥
ते चातुर्यचंपककळिका । शृंगारकासारमराळिका[1] ।
नानाकैवल्यकनकलतिका । वैकुंठींहूनि उतरली ॥ १३६ ॥
ब्रह्मांडकरंड्याबाहेरी[1] । अंगींचा परिमळ धांवणें करी ।
वेधकाचिया चित्तभ्रमरी । यात्रे आणी त्या ठाया[2] ॥ १३७ ॥
भ्रूचाप[1] सज्जूनि आकर्ण । सोडितां कटाक्षांचे बाण ।
असुरमृगीं सांडिले[2] प्राण । धैर्य आणि स्मरणाचे[3] ॥ १३८ ॥
नाना कटाक्षांच्या[1] जाळीं । असुरसमुहो[2] सागरजळीं ।
मनोमछ[3] येके काळीं । वोढोनि[4] पासीं गोविले ॥ १३९ ॥

---

१३३. १ **होतसे** नि पु४ नां, **करी** ख, **हो कीजे** औं, **हो तैसें** पु, **होत** गो२, **होतां** गो; २–३ **त्रैलोक्याची लावण्यपेटी** ख; ४–५ **देवदैवें** खवर्ग (**दैवें देवें** पु ४); ६ **उघडिली** नि खवर्ग (मुं प्रसंप्रा) गो·२.

१३४. १ **झळकतां** नि औं पु, **झगडतां** नां तं, **झगठतां** धु; २ **दंतपंक्तींचा** नि ख मुं औं, **दंतदिपाचा** गो·२; ३ **विस्मित** पु४ नां, **सस्मित** औं पु; ४ **बोलतां** खवर्ग रा गो·२; ५ **विखरती** नां तं.

१३५. १ **महीतळीं** मुं; २ **लोपे** धु.

१३६. १ **शृंगारागरमराळिका** धु, **शृंगारकारमराळिका** तं, °**कासारमल्लिका** औं पु, °**कासारवनमाळिका** गो.

१३७. १ °**करंडाबाहेरी** नि ख पु४ मुं गो·२, °**करंडियामाझारी** औं पु; २ **ठायीं** नि.

१३८. १ **भृचाप** पु४ नां धु; २ **सोडितां** नि, **सोडिला** गो२, **सोडिले** ख मुं औं पु; ३ **स्मरणाचें** नि गो ख औं तं रा.

१३९. १ **कटाक्षाचा (चां)** ख रा धु तं; २ °**समुदावो** नि; ३ **मनोमत्स्य** नि तं, **मनोमच्छ** स, **मनोमत्छें** पु, **मनोमछें** नां; ४ **वेधोनि** नि.

बळि ह्मणे इचा मुखशशांक । वर्षे[1] दर्शनानंदपीयुख[2] ।
तेथें माझे उभय[3] अंबक[4] । चकोर दोंदील जाहले[5] ॥ १४० ॥
इचे[1] लावण्यरासी उमपे[2] । शेषशक्रांचीं[3] नयनमापें[4] ।
सिगेंसीं भरितांही[5] साक्षेपें[6] । सळ[7] नव्हे सर्वथा ॥ १४१ ॥
रूपऐश्वर्य[1] पाहतां डोळां । दासीसमान भासे कमळा ।
आम्हुतें अंगिकारी[2] तरी[3] सकळां । वस्तुलाभा[4] पावलों[5] ॥ १४२ ॥
रमा रंभा डोळसा दोघी । देवीं नेलिया[1] आपुल्या भागीं ।
ह्मणोनि ईश्वरें आह्मांलागीं । हे[2] धाडिली[3] वाटतसे[4] ॥ १४३ ॥
ह्मणोनि उठिले अत्यादरें । अवघे जाले[1] तिये[2] सामोरे ।
वेष्टित उभे देखोनि करें । येरी वृत्तांत विचारी ॥ १४४ ॥
कवणा[1] अर्थाचेनि स्वार्थे । कळहो करितसां निघातें ।
दैत्य सांगती कृतघ्नते[2] । देवांचिये[3] तियेप्रती[4] ॥ १४५ ॥
ठकूनि नेल्या[1] सकळ वस्तु । संपूर्ण पोसिला आपला स्वार्थु ।
पुडती अमृताचिया[2] हेतू । युद्ध करिती आह्मांसीं ॥ १४६ ॥

---

१४०. १ (–) औं गो ; २ दर्शनें आनंदपीयूख नि , दर्शनीं पीयुष खवर्ग ( दर्शनीं वर्षताहे पीयुख औं ) ; ३–४ उभयांबक रा ; ५ झाले हे नि , पैं जाले मुं औं धु.

१४१. १ इची नि , इचें पु४ ; २ उमापें नि , उपमे ख गो२ , अमुपें मुं औं पु , उमप पु४ ; ३ शेषचक्रार्ची धु गो·२ ; ४ नयनें मापें नि , उभय मापें पु४ ; ५ भरितां हे नि ; ६ साक्षपें पु·४ औं रा गो·२ ; ७ सरले नि नां , सरळें तं , सळे ख पु४ रा , सळें गो.

१४२. १ रूपें ऐश्वर्य धु , रूपसाक्षेप पु४ ; २ अंगीकारील नि ; ३ तैं गो·२ ; ४ वस्तुलाभ नि औं पु ; ५ पावला औं पु , पावलें धु.

१४३. १ नेल्या नि औं पु ; २–३ धाडिली हे औं पु ; ४ वाटतें नि.

१४४. १ आले नि खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ) गो·२ रा ; २ तिज नि , ती खवर्ग ( तिस मुं ) रा गो·२.

१४५. १ कवण नि धु , कवण्या औं ; २ कृतघ्नतेतें नि , कृतघ्नाते ख पु·४ औं ; ३ देवांचिया नि ; ४ तिजप्रती नि , परोपरी औं.

१४६. १ नेलियां धु तं ; २ अमृताचिये नि ख गो·२ तं.

मोहनी[१] ह्मणे अकर्मी[२] दुष्ट[३] । मित्रद्रोही कामलोभिष्ट ।
तुह्मांसी पाववोनि कष्ट । काज[४] केलें आपुलें ॥ १४७ ॥
यत्न करवूनि[१] दारुण । सेखीं[२] न करितां[३] समाधान ।
आपस्वार्थी ठेवोनि मन । स्वेच्छा वस्तु हिरतल्या ॥ १४८ ॥
अनुचित राहटोनियां[१] मंद । सेखीं[२] पुढिल्या ठेविती शब्द ।
ते अविवेकी हें[३] प्रसिद्ध । काय लागे बोलणें[४] ॥ १४९ ॥
आतां दैत्य हो येक ऐका । अमृत दुर्लभ तिहीं लोकां ।
बहुत[१] भाग्यें जोडलें देखा[२] । सिंधुमथनीं[३] प्रयासें ॥ १५० ॥
श्रेष्ठ दुर्लभ जो पदार्थ । त्यावरी[१] सकळांचेंही[२] आर्त[३] ।
तेथें येकेंचि केलिया स्वार्थ । विरोध उपजे[४] सहजेंचि[५] ॥ १५१ ॥
विश्वास धरील[१] तुमचें[२] चित्त[३] । तरी मी न्याय करीन येथ[४] ।
ज्यासि योग्य[५] जो[६] पदार्थ[७] । तोचि वोपीन[८] तयातें[९] ॥ १५२ ॥
स्त्रियेचें वचन अनर्थकारी । ऐसें भावाल[१] जरी अंतरीं ।
तरी जें दिसेल स्वहितावरी[२] । तेंचि किजे[३] सर्वथा ॥ १५३ ॥

---

१४७. १ **मोहिनी** नि धु ; २ **अकर्म** गो·२ ; ३ **द्दष्ट** औं पु धु गो; ४ **काम** खवर्ग ( **कार्य** ख ).

१४८. १ **करुनि** मुं औं पु धु ; २ **शेखीं** नि ख औं पु ; ३ **करिती** ख मुं.

१४९. १ **राहाटोनि** नि ; २ **शेखीं** नि ख धु ; ३ ( – ) ख गो·२ ; ४ **सांगणें** नि खवर्ग. ही ओवी औं पु मध्यें नाहीं.

१५०. १ **बहु** मुं , **बहुतां** औं पु ; २ **जें कां** औं ; ३ **समुद्रमथनीं** पु , **समुद्र मथितां** औं. औं पु मध्यें चरणरचना ३–२ अशी आहे.

१५१. १ **त्याही** धु ; २ **सकळांची ही** नि रा , **सकळांही** पु४ ; ३ **अर्थ** ख , **आर्थ** रा ; ४ **होय** गो·२ ; ५ **सहजची** नि ख मुं पु४.

१५२. १ **धरिला** तं ; २ **तुमचेनि** धु तं; ३ **चित्तें** धु तं, **चित** पु४ नां ; ४ **यथार्थ** नि , **येथें** धु तं ; ५–७ **योग्यता ज्या अर्थें** धु ; ८–९ **तयातें वोपीन** धु.

१५३. १ **भावेल** नि ; २ **स्वहितावारी** पु·४ , **स्वाहितवारी** तं , **स्वाहितकारी** गो , **स्वाहिताचारी** नि मुं नां गो·२ रा ; ३ **करीन** औं पु.

उद्योग[1] साहस[2] मौर्ख्य[3] लुब्धता । माया अशौच निर्दयता ।
ऐसिये दोषीं व्याप्त वनिता । ह्मणोनि उपेक्षा न करावी ॥ १५४ ॥
अंगीकारील[1] हे[2] आपणा[3] । ऐसी बळीची मनवासना[4] ।
ह्मणौनि ह्मणे तुझिया वचना— । आधीन आह्मी सर्वथा ॥ १५५ ॥
विवेकें[1] न्याय कीजे चतुरीं । आमुच्या[2] पक्षीं[3] अभिमान धरीं ।
विश्वासोनि शक्तिच्या[4] करीं । अमृतकुंभ वोपिला[5] ॥ १५६ ॥
योग्य[1] अयोग्य[2] पाहोनि जाण[3] । करवीन अमृतरसभोजन[4] ।
ऐसें बोलोनि सुरासुरगण[5] । पाचारिले[6] जवळिकें ॥ १५७ ॥
शाळा निर्मिल्या[1] चित्रमंडिती । स्नानें करविलीं सकळां हातीं[2] ।
उंचीं[3] बैसविल्या पंक्ती । दैत्यांचिया आदरें ॥ १५८ ॥
अमृतकलश घेऊनि[1] हातीं । आज्ञा पुसे असुरांप्रती ।
प्रथम वाढूं कवणे[2] पंक्ती । येथें निरोप पाहिजे ॥ १५९ ॥
दैत्य बोलती विहितोत्तरा । अमृत[1] आधीं[2] द्यावें[3] अमरां ।
सुरांपाठीं[4] वोपिजे असुरां । निकें ह्मणे महाशक्ति ॥ १६० ॥
ते अवसरीं[1] सिंहिकासुत । राहो[2] कुटिल परमधूर्त ।
मनीं अनुमानी[3] पैं[4] येथ[5] । कपटाचार[6] दिसतसे ॥ १६१ ॥

---

१५४. १ उद्योगा औं, उद्रोग ख, उदेग पु४; २ सहास धु पु, सहसा मुं पु४, साहास नां औं; ३ औत्सल्य औं पु.

१५५. १-३ हे मी करीन अंगना औं पु; ४ वासना औं पु, मनकामना नि.

१५६. १ विवेक गो२ तं, विवेकी पु४; २ अमुचा तं; ३ पक्ष धु तं; ४ शक्तीचा (चां) मुं गो पु तं; ५ दिधला गो.

१५७. १-२ योग्यायोग्य नि पु४ मुं औं रा; ३ जाणा ख मुं; ४ °भोजना ख मुं; ५ °गणा ख मुं; ६ हाकारिले खवर्ग (मुं प्रसंप्रा) रा गो॰२

१५८. १ रचिल्या औं पु; २ प्रती औं; ३ उच्चीं नि.

१५९. १ धरोनि मुं, घेऊनियां नि; २ कवण्या नि.

१६०. १-२ आधीं अमृत नि खवर्ग; ३ दीजे ख; ४ सुरापान गो॰२.

१६१. १ अवस्वरीं ख नां धु, अवेस्वरीं गो॰२; २ राहु नि ख मुं रा गो॰२ तं; ३ अनुमानोनि गो॰२, अनुमानें तं; ४ (–) मुं धु गो॰२; ५ तेथ पु४ गो॰२; ६ कृत्रिमाचार मुं औं, कपट थोर गो॰२.

**भ्रमें[1] भुलला[2] असुरजनु । मोहनी[3] नव्हे हा महाविष्णु[4] ।**
**निश्चयें दैत्यांतें[5] ठकुनु[6] । अमृत वोपीलें[7] देवांतें ॥ १६२ ॥**
**असो पोटीचे[1] पोटीं मातु । विबुधवेष[2] धरूनि[3] त्वरितु ।**
**पातला अमरपंक्तीआंतु । दांभिक देवां नेणवे ॥ १६३ ॥**
**चंद्रसूर्यां हो[1] माझारी । बैसला[2] कपटवेशधारी[3] ।**
**न विचारित[4] अमृत करीं । वाढितां[5] सूदलें[6] मोहनियां ॥ १६४ ॥**
**पहिलें[1] घेतलें[2] नसतां[3] कोण्हीं । आज्ञा[4] नेदितां श्रेष्ठजनीं ।**
**राहूनें[5] मुखीं घालितां तरणी । आणि चंद्रेंहि लक्षिलें ॥ १६५ ॥**
**दैत्यलक्षण[1] जाणोनि निगुती[2] । भ्रूसंकेत दाविला शक्ती ।**
**वामताटंक वामहस्तीं । महामाया[3] मोकळिलें ॥ १६६ ॥**
**देखतां[1] कर्णताटंक हाले[2] । परी तें[3] सुदर्शन[4] प्रेरिलें[5] ।**
**तेणें राहूचें छेदिलें । शिर जैसें अरविंद ॥ १६७ ॥**
**मस्तक उसळतां[1] गगना आंत । निघालें मुखें[2] गर्जना करित ।**
**दैत्य हो ठकलेती समस्त । मोहनीरूपें विष्णु हा ॥ १६८ ॥**

---

१६२. १ **मोहें** ख ; २ **भरला** गो ; ३ **मोहिनी** नि धु ; ४ **विष्णु** मुं औं तं ; ५ **त्यांतें** मुं , **दैत्य ते** ख; ६ **ठकवणू** नि ( **ठकवनु** स ) ; ७ **ओपील** नि पु४ औं , **वोपी** मुं.

१६३. १ **पोटीची** ख नां औं पु ; २ **वधुवेष** गो२ ; ३ **धारिला** धु तं.

१६४. १ (–) मुं नां ; २–३ **बैसे वेषे कपट धरी** औं ; ३ **वेशाकपट-धरी** रा ; ४ **विचारितां** नि मुं औं पु ; ५ **वाढियेलें** मुं , **वाढिलें** धु ; ६ ( – ) मुं , **सूचलें** नां औं पु.

१६५. १ **पाहिलें** नि औं ; २–३ **नसतां घेतलें** नि ख मुं नां ; ४ **अज्ञा** स ख नां औं रा गो ; ५ **राहु** नि , **राहोनि** धु गो.

१६६. १ **दैत्यलक्षणें** ख पु४ रा ; २ **पुरती** औं ; ३ **महामाये** नि , **महामायेनें** ख मुं.

१६७. १ **देखत** नां , **देख** रा ; २ **आलें** नि मुं , **हले** ख ; ३ (–) मुं ; ४ **सुदर्शनचि** मुं नां ; ५ **प्रहारिलें** गो.

१६८. १ **उसळलें** पु ; २ **मुख** ख नां रा गो·२ पु. पु४ मध्यें ही ओवी नाही.

सहसा[1] अमृत नेदी असुरां । ऐसें ऐकतां[2] हाहाकारा ।
प्रवर्तले[3] हातियेरा । हातवसिती[4] समस्त[5] ॥ १६९ ॥

अमृतकलश घेऊनि तेथ । इंद्रें पळविला हातोहात[1] ।
संग्राम माजला[2] अद्भुत[3] । देवां दैत्यां ते काळीं ॥ १७० ॥

आरूढले नाना वहनीं[1] । शस्त्रास्त्रीं केशधरणीं[2] ।
युद्ध[3] होतां अपार अवनी । सुरंग जाली शोणितें[4] ॥ १७१ ॥

जयसिद्धि[1] ज्यापें[2] कमळा । तो विष्णु साह्य[3] अमरपाळा[4] ।
ह्मणोनि असुर तये[5] वेळां । नाश पावले अपार ॥ १७२ ॥

विशेष लाधलें अमृत । म्हणौनि[1] ह्मणती जैत[2] जैत[3] ।
दैत्यभागा[4] गेला[5] मृत्य । परि[6] संग्राम खंडेना ॥ १७३ ॥

त्यावेळीं नरनारायण[1] । प्रगट[2] जाले[3] दोघेजण ।
नराहातीं[4] धनुष्यबाण । चक्रधारी श्रीविष्णु[5] ॥ १७४ ॥

---

१६९. १ **सहसां** पु४ नां; २ **ऐकोनि** ख मुं गो२ ; ३ (+) **हो** नि गो·२ , (+) **ते** मुं ; ४ **हात वसविती** नि , **हाति°** ख मुं , **हातीं°** औं पु ; ५ **तांतडी** ख.

१७०. १ **पैं त्वरित** औं ; २ **जाला** पु·४ औं ; ३ **अत्यद्भुत** औं पु.

१७१. १ **वाहनीं** धु तं , **वाहानीं** गो·२ ; २ **झोंटधरणीं** मुं , **केश धरुनी** नि ; ३ **युध्य** ख पु४ नां धु गो·२ , **युत्ध** तं ; ४ **श्रोणितें** ख औं गो.

१७२. १ **जयसिद्धीसि** ख पु४ , **तेथें सिद्धीसी** औं , **जेथें सिद्धीसी** पु ; २ **व्यापी** ख , **जवळीं** मुं , **जयापें** औं पु धु तं , **जया पैं** नां ; ३ **साहाय** मुं ; ४ **अमरां सकळां** धु तं ; ५ **तया** धु तं पु४.

१७३. १ **यालागीं** मुं , **तेणें** गो२ ; २–३ **जैत्य जैत्य** नि तं गो२ ; ४ **दैत्य** औं ; ५ **गेले** गो·२ , **गेलें** नि औं मुं, (+) **कित्येक** औं ; ६ **तऱ्ही** औं पु.

१७४. १ **नर आणि नारायण** धु तं ; २–३ **प्रकटले** औं ; ४ **°हस्तीं** नि तं ; ५ **श्रीकृष्ण** नि ख. ही ओवी रा मध्यें नाहीं.

दैत्यदानवांचिया थाटी[१] । संहारिल्या कोट्यानकोटी[२] ।
तरी[३] युद्धाची हांव मोठी[४] । प्राणत्यागें[५] खंडेना[६] ॥ १७५ ॥

अमृतरसाचिये आशे[१] । मृत्यु[२] पावले[३] ते न मनुनि सोसें ।
उरले झुंजती[४] आवेशें । अमृतपान करावया ॥ १७६ ॥

दृष्टी देखोनि अकाळप्रळयो[१] । चतुराननें आपुला तनयो ।
नारद पाठविला पाहा[२] हो[३] । विरोधशांतीकारणें[४] ॥ १७७ ॥

सुरां[१] असुरां[२] समान[३] मान्यु[४] । न्यायनिष्ठुर सत्यसर्वज्ञु ।
देवां ह्मणे सांडा मानु[५] । संग्रामाचा विचारें[६] ॥ १७८ ॥

लेकुराकरीं देवोनि फळ । चोर[१] चोरी[२] भूषणें सकळ ।
तैसें काज सारूनि[३] सबळ[४] । दैत्य ठकिले[५] कुटिलत्वें[६] ॥ १७९ ॥

अझुणी[१] न[२] पवा[३] उपरमातें[४] । हा काय[५] विवेक वाटे तुमतें[६] ।
शंकोनि देवर्षिवचनातें[७] । माघारले सुर सकळ[८] ॥ १८० ॥

---

१७५. १ **कोटी** ख ; २ **एकसरें थाटी** ख ; ३ **तऱ्हीं** औं पु नां ; ४ **पोटीं** नि ; ५–६ **अमृतपान करावया** खवर्ग. रा मध्यें ही ओवी नाहीं.

१७६. १ **आसे** रा गो , **आशें** तं ; २–३ **निमाले** गो·२ ; ४ **झुंजारी** गो·२. खवर्गामध्यें ही ओवी नाहीं. या ओवीचा चौथा चरण खवर्गामध्यें मागच्या ओवींत चवथा आहे.

१७७. १ **अकाळसमयो** मुं ; २–३ **समयो** औं पु ; ४ °**शांती करावी** मुं.

१७८. १–३ **जो सुरांअसुरांतें** मुं ; ३–४ **सामान्य** ध्रु , **समान्यु** तं ; ४ **मान** गो·२, **मानु** औं पु ; ५ **अभिमानु** मुं नां औं पु; ६ **अविचार** खवर्ग रा गो·२.

१७९. १–२ **चोरी चोर** ध्रु ; ३ **साधुनि** मुं , **करुनी** औं ; ४ **केवळ** नि , **सकळ** ख गो, **प्रबळ** रा , **समूळ** नां; ५ **ठकविले** नि ; ६ **कुशलत्वें** गो.

१८०. १ **अजुनी** नि गो·२ , २ (–) मुं ; ३ **पावा** नि ख मुं नां गो·२ पु; ४ **उमजातें** गो ; ५ **कंवि** नि खवर्ग ; ६ **तुम्हांतें** नि मुं ख औं पु ; ७ **देवऋषी**° नि ख गो ; ८ **वर** मुं औं.

सर्वेंचि दैत्यांप्रती[१] येउन । बोधिला प्रल्हादसुतनंदन ।
ह्मणे काळ साह्य[२] नसतां[३] कोण । इच्छिलें फळ पावला ॥ १८१ ॥

काळ साह्य[१] जालिया[२] अर्थी । वस्तू चढल्या सुरांच्या हातीं ।
तुह्मीं विषाद[३] धरूनि चित्तीं[४] । खेद कांहीं न करणें[५] ॥ १८२ ॥

साह्य करूनि शुक्राचार्या । विश्वजित याग करीं[१] राया ।
तेणें जिंतोनि[२] देवां[३] ययां[४] । स्वर्गसंपत्ति लाधसी[५] ॥ १८३ ॥

हें[१] यथार्थ मानुनी[२] दैत्यीं । जाते जाले स्वस्थळाप्रती[३] ।
हें[४] उच्चैश्रवाचिये[५] उत्पत्ती- । लागीं पडलें सांगणें ॥ १८४ ॥

रुंडमूंडा[१] दोंही[२] । अमृत लागलें अळुमाळ कांहीं ।
ह्मणोनि दोन्ही अमर पाहीं । गगनोदरीं भ्रमताती ॥ १८५ ॥

---

१८१. १ दैत्यांकडे औं ; २ सहाय नि ; ३ नव्हतां ख पु४ नां गो२.

१८२. १ सहाय नि , २ झाले नि ; ३ (+) न औं पु नां , ४ चीतिं पु४ नां धु ; ५ धरणें नां , मानावा औं , करावा धु पु.

१८३. १ (+) कां धु ; २ जिंकोनि धु तं ; ३-४ देवराया नि ; ४ यां नां ; ५ लाधेल नि , लाभसी पु४.

१८४. १ (-) मुं ; २ ह्मणोनि नि ; ३ स्वस्थानाप्रती नां मो , ४ (-) खर्वां ( औं पु प्रसंप्रा ) ; ५ उच्चैःश्रव्याच्या नि.

१८५. १ रुंडा मुंडा नि , रुंड आणि मुंडा औं पु; १-२ राहूच्या रुंडा मुंडा दोंही ख ; २ दोन्हीतेंही नि. मुं मध्यें ही ओवी अशी आहे:-

राहूच्या रुंडमुंडा लागलें अमृत । तेणें अमर जाला निश्चित ।
अद्यापि गगनोदरीं भ्रमत । राहू केतू या नामें ॥

धु तं मध्यें यापुढें पुढील जास्त ओवी आहे:-

संकेतें दाविलें मोहिनीतें । ह्मणउनि प्रेरिलें सुदर्शनातें ।
तेणें छेदुनि कंठनाळातें । रुंडमुंडातें वेगळिलें ॥ १८५ अ ॥

तो द्वेष धरूनि अंतःकरणीं[1] । चंद्रसूर्यातें लागती[2] ग्रहणीं ।
अद्यापि लोक देखती नयनीं । राहु[3] केत[4] प्रत्यक्ष ॥ १८६ ॥
संपलें अगाध सिंधुमथन । सुरां श्रोतियां अमृतपान ।
समान जालें विचक्षण । पुढां[1] कौतुक[2] परिसतु[3] ॥ १८७ ॥

इति श्रीभारत आदिपर्वणि । कवि[1] मुक्तेश्वर शूलपाणी ।
त्याचेनि प्रसादें हे वाणी । सुखी करो श्रोतियां ॥ १८८ ॥

इति श्रीभारते आदिपर्वणि चतुर्थोऽध्यायः ॥

---

१८६. १ अंतःकर्णी मुं औं पु ; २ **लागोनि** मुं, **गिळिती** औं पु ; ३ **राहो** नां औं पु ; ४ **केतु** नि पु·४ ; ३–४ **राहोत** नां.

१८७. १ **पुढें** नि ख मुं नां , **पुढील** औं पु ; २ **कथा** औं , **कथन** पु ; ३ **परिसें तूं** नि.

१८८. १ अवि ख रा ( रा·२ ), **अविमुक्त** नां , **आदि** पु४ मुं , ( **अधि**–पु३ ).

*

॥ श्री ॥

# अध्याय पांचवा

## श्रीगणेशाय नमः

यापरी जन्मला[1] समुद्रमथनीं । उच्चैश्रवा[2] हयराज गुणी[3] ।
दृष्टी देखोनि दोघीजणी[4] । दक्षदुहिता बोलती ॥ १ ॥

कद्रू[1] ह्मणे विनते जाणी[2] । उच्चैश्रवा कवणे[3] वर्णी ।
येरी ह्मणे चंद्रकिरणीं[4] । डवरिला[5] असे[6] सुतेजें[7] ॥ २ ॥

कद्रू ह्मणे यथार्थवचन । परि पुछचि[1] येक शामवर्ण[2] ।
विनता ह्मणे तुझे नयन । अवलोकितां तरळले ॥ ३ ॥

पुढती कद्रू बोले[1] वचन । सपुछ वारु श्वेतवर्ण ।
तैं[2] म्यां सहस्र अयनें[3] जाण । दासी होणें तुज[4] घरीं ॥ ४ ॥

विनता ह्मणे जरी[1] शामता[2] । तैं[3] नेमिला[4] नेम[5] माझे[6] माथां ।
दोघी[7] शब्द[8] गोवूनि शफता[9] । गृहा[10] पातल्या दिवसांतीं[11] ॥५॥

---

१. १ **जन्म** धु तं ; २ **उच्चैःश्रवा** नि ; ३ **सगुणी** औं ; ४ °**जनी** औं पु.

२. १ **कद्द** ख पु·४ नां धु रा ; २ **साजणी** नि खवर्ग ( **साजनी** औं पु); ३ **कोण** औं पु , **कवण** नि मुं पु४ ; ४ °**किर्णी** मुं औं पु ; ५–६ **डवरलासे** औं पु ; ७ **सुतेज** मुं रा गो·२ तं.

३. १ **पुच्छचि** नि , **पुत्छेच** पु ; २ **श्यामवर्ण** नि.

४. १ **म्हणे** ख ; २ **पुढें** पु४ ; ३ **वर्षें** नि खवर्ग ; ४ **तुझ्या** नि मुं , **तुझा** [ **तुझां** ] ख पु·४ गो.

५. १ **वो** ख ; २ **श्यामता** नि ; ३–५ **तो नेम नेमिला** औं पु ; ४ **नियमिला** धु तं ; ५ ( – ) ख ; ६ **माझिया** धु तं , **माझा** [ **माझां** ] ख ; ७ **दोघीजणी** नि ख पु४ , **दोघीही** मुं , **दोहीं** गो२ , **दोघीनेंही** औं पु ; ८ (–) नि खवर्ग , **शब्दीं** गो२ ; ९ **शपथा** नि तं , **शपथां** रा , **शपता** औं पु ; १० **ग्रहा** धु पु४ ; ११ **दिनांतीं** ख मुं.

रात्रीं पाचारूनि सर्प । कद्रू करी सखेद जल्प ।
हारिकर्दमाचा[1] लेप । मज विनतेनें[2] लाविला ॥ ६ ॥
मनींच्या कापट्यकाजळें[1] । अश्ववाळ[2] न[3] करितां[4] काळें[5] ।
दासित्वगोमयाच्या[6] मेळें[7] । मी माखलें चिरकाळ ॥ ७ ॥
ह्मणोनि[1] तुह्मीं[2] सकळ[3] व्याळ । दंशुनि पुछ करावें सुनीळ ।
सर्प ह्मणती रवि तात्काळ । शापुनी भस्म करील ॥ ८ ॥
आह्मां न करवे अविचारकृत्य । कद्रू क्षोभली अत्यद्भुत[1] ।
ह्मणे[2] दुष्ट[3] हो[4] तुह्मीं[5] समस्त । भस्म व्हा[6] रे[7] मत्शापें[8] ॥ ९ ॥
वृथा पुष्ट[1] परमारक । मातृआज्ञा[2] अपाळक ।
तुह्मां सापत्न[3] आणि पावक । नाश करोत अविलंबें ॥ १० ॥
जनमेजयाचे सर्पसत्रीं । प्रवेश कराल पावकवक्त्रीं[1] ।
ऐसा शाप[2] सुरांच्या चक्रीं[3] । चतुराननें ऐकिला ॥ ११ ॥
तथेति[1] तथेति[2] ऐसें[3] वचन । त्रिवार[4] वदला[5] कमळासन[6] ।
आल्हादलें अन्तःकरण[7] । बरवें जालें ह्मणोनी[8] ॥ १२ ॥

---

६. १ दासीकर्दमाचा नि, हरि° ख पु ४ धु, हारिकर्माचा नां ; २ विनतेन रा गो·२.

७. १ कापट्यें काजळें पु ; २ अश्वबाल मुं ; ३ (–) ख मुं नां औं पु तं; ४ म्हणतां गो·२ ; ५ काळे मुं ; ६ दास्यत्व° धु, दाशत्व° तं; ७ मळें नि पु·४, मैळें नां.

८. १ म्हणउनी नि ; २–३ सकळ तुह्मीं ख.

९. १ त्यां अद्भुत नि, अद्भूत ख मुं ; २–४ मग ह्मणे नां ; ५ (–) औं पु; ६ हो गो ; ६–७ व्हावे नां ; ८ मच्छापें नि , मच्छ्रापें पु४ , मत्स्यापें धु तं.

१०. १ दुष्ट पु४ ; २ मात्रुआज्ञा नां औं पु गो२ ; ३ सपत्न नि ख.

११. १°वग्त्रीं पु ४ रा धु ; २ श्राप पु४ ; ३ श्रोत्रीं औं गो२.

१२. १ तथैति धु पु४ स , तेथ गो१ ; २ तथैति धु , ( – ) मुं औं पु गो , तथास्तु गो२ ; ३ ( + ) त्रिवार औं ; ४ ( – ) औं ; ५ ( + ) जाला औं ; ६ चतुरानन गो २ ; ७ अन्तकर्ण ख मुं रा तं ; ८ ह्मणोनियां नि गो , ह्मणउनी ख.

हिंसक पीडक यांची चिंता । बहुसाल वर्ते[1] माझिया चित्ता[2] ।
ईश्वरें तयांचिया घाता । मातृशाप[3] निर्मिला[4] ॥ १३ ॥
ऐसें वदोनि[1] जगज्जनकें । कश्यप बोलाविला[2] जवळिके ।
विचार सांगे[3] त्या विवेकें । साह्य न कीजे[4] नष्टांचें[5] ॥ १४ ॥
तुझे वीर्यज हे[1] सर्प । दुष्ट दुर्जन पापरूप ।
त्यांतें मातेनें[2] दीधला शाप । कल्याणकारी[3] जगातें ॥ १५ ॥
त्याच्या परिहारउपाया[1] । अभिमान न धरीं पवित्र[2] राया ।
ऐसें[3] सांगोनि दीधली तया । विषहरणविद्या हे[4] ॥ १६ ॥
असो मातेनें[1] शापितां कुमर[2] । अवघे करिती हाहाकार[3] ।
धाकें धाविनले[4] सत्वर[5] । वाळ[6] सुनीळ करावया ॥ १७ ॥
कृष्णकेश[1] होऊनि सकळ । पुर्छी[2] जडले सलंब[3] व्याळ[4] ।
प्रभात होतां उतावेळ[5] । कद्रू बोले विनतेसी ॥ १८ ॥
वाजीवाळ धवळ[1] कैसें । तें मज दावीं[2] वो[3] डोळसे ।
हातीं धरूनि अतिआवेशें[4] । बळात्कारें[5] वोढिली ॥ १९ ॥

---

१३. १ **वसे** पु४ ; २ **चीता** पु४ नां ; ३ **मातृशापें** मुं , **मात्रुशापें** औं पु ; ४ **निर्मिलें** औं.

१४. १ **बोलोनी** औं पु ; २ **गेला** औं पु ; ३ **सांगोनि** धु ; ४ **करीं** औं पु , **करिजे** गो ; ५ **नष्टांतें** रा गो२ , **दुष्टांचें** नि खवर्ग.

१५. १ **जे** रा धु तं ; २ **मातेन** नां गो·२ ; ३ °**करी** ख पु४ औं गो तं.

१६. १ **परिहारा**° नि पु४ ; २ **ऋषि** औं पु ; ३ **असें** नि ; ४ **हो** नि पु तं , **ते** मुं गो२.

१७. १ **मातेन** गो·२ ; २ **कुमरां** नि ख ; ३ **हाहाःकारा** नि ख ; ४ **धाविन्नले** नि गो·२ पु४ ; ५ **सत्वरा** नि ख ; ६ **वारु** मुं औं पु , **पुच्छ** गो.

१८. १ **कृष्ण** औं पु ; २ **पुच्छीं** नि , **पिछीं** पु४ , **पुष्टी** धु नां , **पुत्छीं** पु ; ३ **सबळ** औं पु ; ४ **बाल** ख गो , **वाळ** पु४ , **झोळ** धु तं ; ५ **उतावीळ** मुं रा गो·२.

१९. १ **धवळें** गो२ ; २ **दाखवीं** नि पु·४ औं नां ; ३ ( – ) नि खवर्ग ( पु४ प्रसंप्राा ); ४ **अत्यावेशें** रा पु४ औं , **आवेशें** मुं ; ५ **बलात्कारें** नि , **बळत्कारें** रा गो·२.

समुद्र उलंघूनि[1] वेगीं । अश्वासमीप पातल्या दोघी ।
विनता पाहे तवं पुछांगीं[2] । दिसे कृत्रिम शामता[3] ॥ २० ॥
शब्द कुंठित जाला मुखीं । चित्त चिंतेनें[1] केलें दुःखी ।
हारी पातली[2] मस्तकीं । सत्य[3] सत्यत्वें[4] स्थापितां[5] ॥ २१ ॥
कपटें जिंतोनि[1] विनता सती । नेउनी सर्पसदनाप्रती ।
दासी केली[2] जेंवि विरक्ती[3] । वश[4] करी[5] धनाशा[6] ॥ २२ ॥
दाक्षायणी दासीधर्मीं[1] । रुतली[2] जैसी धेनु कर्दमीं ।
यावरी वृत्तांत विनताश्रमीं । वर्तला तो परिसिजे[3] ॥ २३ ॥
उरलीं वरुषें[1] पांचशत । क्रमल्या[2] अंडें[3] भेदूनि त्वरित ।
गरुड उदेला[4] ब्रह्मांडांत[5] । देदीप्यमान तेजस्वी ॥ २४ ॥
प्रळयवन्हितुल्य तेजाळा[1] । कीं द्वादशादित्याचा[2] येकमेळा[3] ।
तैसा देखोनि प्रजां सकळां[4] । भयें[5] सुटला[6] चळकांपु[7] ॥ २५ ॥
दंडवतें[1] घालुनी धरणीं । प्रवर्तले पावकस्तवनीं[2] ।
ह्मणती स्वामी खडतर किरणीं । विश्व भस्मेल[3] क्षणार्धें[4] ॥ २६ ॥

---

२०. १ **लंघूनियां** नि मुं ; २ **पुच्छाग्रीं** औं ; ३ **श्यामता** नि.

२१. १ **चिंतनें** पु४ ; २ **आली** मुं ; ३ **असत्य** नि ; ४ **सत्यत्व** ख पु·४ मुं ; ५ **स्थापिलें** ख.

२२. १ **जिंकोनि** धु पु४ ; २ **किजे** ख मुं औं ; ३ **विरक्तीं** नि खवर्ग ; ४ **वश्य** औं नि ख , **वस्य** मुं पु·४ ; ५ **कीजे** नि खवर्ग ; ६ **विषयाशा** नि खवर्ग.

२३. १ **दक्षधर्मीं** ख , **दास्यधर्मीं** नि ; २ **गुंतली** नि ख मुं औं पु गो , **गुंफिली** पु४ गो२, **गुंपली** रा नां ; ३ **परियेसा** नि.

२४. १ **वर्षें** नि खवर्ग ( पु प्रसंप्रा ) ; २ **क्रमिल्या** नि ख पु४ मुं ; ३ **अंड** पु ४ गो२ मुं तं ; ४ **उडाला** ख , **भेदला** मुं ; ५ **ब्रह्मांडभरित** नि खवर्ग.

२५. १ **तेजाळ** नि ख मुं नां औं पु ; २ **द्वादशादित्य** नि धु तं ; ३ **येकमेळ** नि ख मुं नां औं पु ; ४ **सकळ** नि ख नां औं पु ; ५ **भर** नां ; ६ **उठला** गो ; ७ **चळकंप** नि.

२६. १ **दंडवत** पु·४ मुं नां औं ; २ **पावकस्थानीं** मुं ; ३ **भक्षील** मुं औं पु, **भक्षेल** गो·२ ; ४ **क्षिणार्धें** ख गो२.

चत्वारिशृंगा[1] हो[2] त्रिचरणा । सप्तहस्ता उभयवदना ।
स्वाहास्वधेचिया[3] रमणा[4] । तेज आपुलें आछादीं ॥ २७ ॥
ऐकोनि प्रजांचा करुणाजल्प[1] । प्रत्यक्ष जाला वन्हि सकृप[2] ।
ह्मणे हें भावूनि[3] माझें स्वरूप । ह्मणें[4] पावाल[5] भयातें[6] ॥ २८ ॥
कश्यपवीर्यें[1] विनतातनयो । गरुड पक्षेंद्र[2] प्रतापसूर्यो ।
जन्मला असे जयाचा[3] उदयो । दिसे अद्भुत प्रकाशें[4] ॥ २९ ॥
हा जगातें हितकारक । अवतरलासे[1] नागांतक ।
यातें प्रार्थिल्या[2] प्रकाशार्क[3] । दाहकता लोपील[4] ॥ ३० ॥
ऐसें परिसोनि[1] पावकवचन । प्रजीं[2] मांडिलें गरुडस्तवन ।
ह्मणती विष्णुवल्लभा नमन । समस्तांचें तुज पावो ॥ ३१ ॥
तुझें स्मरण केलिया[1] निखिळ[2] । उतरे संसारसर्पगरळ ।
इतर व्याळविष[3] व्याकुळ[4] । करूं न सके[5] तव[6] दासां[7] ॥ ३२ ॥
पक्ष स्पर्शतां मेदिनी । होती गरुडपाचूच्या[1] खाणी ।
चतुर्विंशति योजनें दोन्ही । विद्युत्प्राय फडकती ॥ ३३ ॥

---

२७. १ **चत्वारशृंगा** नां तं ; २ **हे** नि , (–) धु ; ३ °**स्वधाहिच्या** धु तं ; ४ **कारणा** औं पु.

२८. १ **करुण जल्प** नि ; २ **स्वल्प** औं पु ; ३ (– ) पु४ ; ४ **ह्मणी** नि ; ५ **पावलां** नि ( स प्रसंप्रा ), **पावेल** पु४ ; ६ **तयातें** ख.

२९. १ **कश्यपवीर्यें** नि ( स प्रसंप्रा ) ; २ **पक्षींद्र** नि औं पु ; ३ **त्याचा** नि मुं ; ४ **प्रकाश** नि मुं नां.

३०. १ **अवतरला असे** नि तं , **प्रगटला असे** मुं ; २ **प्रार्थिल्यां** धु ; ३ **प्रकाशक** रा नि खवर्ग ; ४ **लोपेल** नि , **लोपिला** ख पु४.

३१. १ **पैकोनि** ख गो ; २ **प्रजांहीं** नि , **प्रजांनीं** मुं धु तं.

३२. १ **केलियां** नां तं ; २ **निखळ** नि नां औं पु , **निश्चळ** ख ; ३ °**विषें** गो२ ; ४ **विकळ** नि ; ५ **शके** नि मुं औं पु , **सकती** ख ; ६–७ **तवाज्ञा** ख ; ७ **दासा** नि.

३३. १ °**पाचूची** नां गो२ पु.

आरक्त चंचू चरण नयन । किरीट कुंडलें विराजमान ।
स्वामी तुझें पवित्र ध्यान । हृदय[1] वसउं[2] आमुचें[3] ॥ ३४ ॥
जो वोळखे गुरूची खूण । तो शिष्य गुरुसारिखा[1] जाण ।
विष्णुभक्त तो आपण । विष्णुसमान मानावा ॥ ३५ ॥
ह्मणोनि देवा दीनदयाळा । आवरीं आपुली प्रकाशकळा ।
ऐसें स्तवितां जना सकळा । कृपा[1] बोले[2] पतगेंद्र[3] ॥ ३६ ॥
नाभी नाभी ह्मणे प्रजांतें । ह्मणें[1] शंकाल मद्रूपातें ।
माझें अभय सदा तुमतें[2] । मी दीनातें रक्षिता[3] ॥ ३७ ॥
मातृद्रोही पितृद्रोही । मित्रद्रोही साधुद्रोही ।
विष्णुद्रोही यांतें[1] पाहीं । मजपासाव भय असे[2] ॥ ३८ ॥
दुष्ट दुर्जन क्षुद्र अशांत[1] । गुरुतल्पक[2] सत्यरहित ।
दुराचारी ते[3] अनर्थ । मजपासाव पावती[4] ॥ ३९ ॥
कीर्तनद्वेषी[1] परपीडक । वदनीं[2] कठोरतेचें[3] विख ।
ते मज सर्पासारिखे[4] देख । भक्षण करीन[5] तयाचें[6] ॥ ४० ॥

---

३४. १ **हृदयीं** नि ख पु·४ औं गो·२ ; २ **वसो** नि ख मुं औं पु , **वसतु** पु४ ; ३ **अमरांचें** तं.

३५. १ **गुरुसमान** मुं औं.

३६. १ **कृपे** नि ( स प्रसंप्रा ) , **कृपेनें** ख ; २ **बोळला** गो , **बोळे** गो२ ; ३ **पक्षेंद्र** मुं औं पु , **खगेंद्र** धु नां.

३७. १ **ह्मनें** गो तं , **ह्मणी** नि खवर्ग ; २ **तुह्मांतें** नि गो मुं ; ३ **रक्षित** नां , **रक्षितां** पु ४ गो·२.

३८. १ **त्यांतें** धु ; २ **तयांतें** औं , ( + ) **कां** पु.

३९. १ **पाहत** औं , **असत्त** पु ; २ °**तल्पग** नि ; ३ ( – ) ख , **यां** औं पु ; ४ **भय असे** ख.

४०. १ **कीर्तनवेव्हारी** गो , **कीर्तनें द्वेषें** पु४ ; २ **वचनीं** औं ; ३ **काठिण्यतेचें** औं , **काठिणतेचें** पु ; ४ **सर्पासमान** औं ; ५ **करीं** पु·४ औं गो तं ; ६ **तयातें** तं

वैष्णव आणि शंकरद्वेषी । शैव[1] विष्णूतें[2] उपहासी ।
ते ते शत्रु मानूनि[3] त्रासी[4] । सर्पातुल्य निर्धारें ॥ ४१ ॥
शास्त्राभिमानें[1] माजली[2] बुद्धी[3] । नाम लाविती अर्थवादीं[4] ।
ते ते जाणावे[5] माझे द्वंदी[6] । सर्पऐसे विखंडीं[7] ॥ ४२ ॥
काशीमरणें[1] विष्णुस्मरणें । मोक्ष ऐसीं[2] वेदवचनें ।
ते[3] जो असत्य मानी मनें । तो मज वैरी निर्धारें ॥ ४३ ॥
ह्मणोनि प्रजा[1] हो[2] तुह्मीं[3] सकळ । हरिहरभजनीं सार्वकाळ[4] ।
निरंतर[5] जालिया केवळ[6] । घरटीकार मी तुमचा ॥ ४४ ॥
यापरी आश्वासूनि प्रजांतें । आच्छादिलें निजतेजातें ।
मग खांदी वाउनी[1] अरुणातें । मातेजवळिके[2] पातला ॥ ४५ ॥
तवं पूर्वदिशे अंशुमाळी । तपों लागला द्वादशकळीं ।
क्षोभें चौदालोकहोळी । करावया उदितु[1] ॥ ४६ ॥

---

४१. १ (–) मुं ; २ वैष्णवातें मुं ; ३ (+) मी नि ; ३–४ निश्चयेंसी मुं. धु व तं यांत ४१ व ४२ ओवींची अदलाबदल.

४२. १ °मानी ख ; २ मातली ख ; ३ बुधी धु ; ४ धर्मबोधीं गो, अर्धबोधीं गो२ ; ५ जाणा रा पु४, जाण नि खवर्ग ; ६ दंदी मुं रा धु ; ७ विखंडीन नि तं. औं पु मध्यें ही ओंवी नाहीं.

४३. १ काशीस्मरणें नि मुं, कासिये° औं, कां शिवस्मरण नां ; २ होय ऐसीं ख, बोलती औं ; ३ तीं मि, तैं मुं औं पु, तो स ख.

या पुढें औं मध्यें पुढील जास्त ओवी आहेः—

ह्मणोनि सांगतों सप्रेमळ । शिवविष्णु सर्वकाळ ।
निरंतर जालियां सकळ । आज्ञाधारक केवळ मी तुमचा ॥ ४३ अ ॥

४४. १–३ तुह्मीं प्रजा हो औं पु, तुह्मीं हो प्रजा तं ; ४ सर्वकाळ खवर्ग ( ख प्रसंप्रा ) धु ; ५ निरत पु·४ रा ; ६ येकवेळ गो२.

४५. १ वाहूनि नि, वाहोनि नां, घावोनि पु४ गो·२ ; २ °जवळी नि खवर्ग गो, मातप्रती गो२. औं पु मध्यें ही ओवी नाहीं.

४६. १ उद्यतु रा गो.

हें देखोनि देवसमूहो[1] । प्रार्थिते[2] जाले[3] पितामहो ।
ब्रह्मा ह्मणे ग्रहणीं[4] राहो । वैरें[5] ग्रासी सूर्यातें ॥ ४७ ॥
अमृतमथनीं सुरांच्या[1] हिता[2] । सूर्यें राहू प्रगट करितां ।
तेणें सांडुनि[3] समस्तां । सूर्यातेंचि[4] लागला ॥ ४८ ॥
तेणें क्षोभे सहस्रकिरण[1] । जाळूं पाहे त्रिभुवन ।
ह्मणोनि तया आड[2] अरुण । सारथी करुनी स्थापावा[3]॥ ४९ ॥
हें म्यां[1] पहिलेंचि[2] सुचूनि गोष्टी[3] । अरुण निर्मिला विनतेपोटीं ।
ऐकोनि सुरांच्या कोटी । अरुणासमीप पातल्या ॥ ५० ॥
गौरवें[1] नेउनी[2] समस्तीं । सारथी केला दिनकररथीं[3] ।
यावरी तोषला[4] गभस्ती । आच्छादिलें उष्णातें[5] ॥ ५१ ॥
असो सागरपैलपारीं[1] । विनता दासी कद्रूच्या[2] घरीं ।
गरुडपुत्र स्नेहेकरी[3] । तया[4] स्थाना[5] पातला ॥ ५२ ॥
तोही मातेचिया क्लेशा । क्लेशविभागी[1] जाला सरिसा ।
भृत्यत्व[2] करितां बहुत दिवसां । कद्रू ह्मणे[3] विनतेतें ॥ ५३ ॥

---

४७. १ देवसमुदावो गो·२ ; २–३ प्रार्थिता झाला नि ; ४ प्राण ख, अग्रणी गो·२ ; ५ वैरी पु४.

४८. १–२ सुधा प्राशितां नि, सूर्यांचाहता ख औं, सूर्यांचा हेता पु४, सूर्यांचा हंता नां पु; ३ सोडोनि पु४ नां, सोडोनि देवां मुं ; ४ रविचंद्रासि औं.

४९. १ सहस्रकीर्ण ख मुं औं पु; २ आडवा नि ख पु४ मुं गो·२ ; ३ स्थापिला मुं नां.

५०. १ मी औं पु; २ पाहिलेंच ख, पाहिलें पु४, पहिलें औं पु, पैलीच गो·२ ; ३ गांठी पु४, गोठी रा.

५१. १ गौरवीं गो ; १–२ गौरउनी ख ; ३ कनकरथीं मुं; ४ मावळला गो२ ; ५ तेजातें मुं, तीव्र तेजातें औं.

५२. १ °पैलतीरीं औं ; २ कद्रू– पु४ मुं औं, कद्रूचां गो; ३ स्नेहकरी नि मुं, स्नेहकरीं पु तं, स्नेहकारी नां, स्नेहआदरी गो२; ४–५ मातेप्रती गो२.

५३. १ विभागी नि औं गो·२ ; २ सत्यत्व पु ४; ३ बोल ख मुं.

समुद्रकुक्षीं रमणीकवस्ती । नागालय अतियेकांतीं ।
स्कंदीं[1] वाउनी[2] तयाप्रती । सीघ्र[3] नेई मजलागीं[4] ॥ ५४ ॥

मातृवचनें पृष्टीवरुतें[1] । गरुडें बैसविलें सर्पांतें[2] ।
मार्ग क्रमितां[3] दिवानाथें[4] । तीव्र उष्णें[5] ताविलें[6] ॥ ५५ ॥

तया ग्रीष्मीचें[1] खडतर उष्ण । लागतां सर्प मूर्छापन्न ।
तें देखोनि कद्रू करी स्तवन । देवेंद्राचें ते[2] काळीं[3] ॥ ५६ ॥

ह्मणे शक्रा[1] तूं[2] करुणाकर[3] । विश्वपाळक[4] अतिउदार[5] ।
मेघोदकें[6] शिंपोनि कुमर[7] । ये[8] काळीं[9] त्वां[10] रक्षावे ॥ ५७ ॥

स्तवनें इंद्रासि[1] कळवळा[2] । सोडिता जाला मेघमाळा ।
तेणें विश्रांती जाली व्याळां[3] । प्राण देहीं परतले ॥ ५८ ॥

हर्षें[1] पावले[2] रमणीकद्वीप । स्वछोदकें[3] बहु पादप ।
खेचरभूचरांचे कळप । सुरवाडोनि राहिले ॥ ५९ ॥

---

५४. १ **स्कांदीं** औं पु , **स्कंधीं** नि ; २ **वाहूनि** नि औं , **वाहोनि** मुं नां ; ३ **शीघ्र** नि ; ४ **मज तेथें** धु , **त्या स्थळीं** औं , **मजप्रती** तं.

५५. १ **पुष्टी**° नां औं गो·२ , **पृष्ठावरतें** नि ; २ **कद्रू आणि सर्पांतें** धु ; ३ **करितां** पु४ ; ४ **दिवसनाथें** नि धु ; ५ **उष्णता** तं ; ६ **तापविलें** गो२, **लाविलें** तं.

५६. १ **ग्रीष्माचें** ख औं तं ; २–३ **तत्काळीं** औं पु.

५७. १–२ **तूं शक्रा** धु , **तूं शक्र** गो , **शक्र तूं** गो२ ; २ (–) नि ; ३ **करुणाकरा** नि धु ; ४ °**पाळका** नि धु ; ५ °**उदारा** नि धु ; ६ **स्वेदोदकें** धु तं ; ७ **दातारा** नि, **उद्रकुमर** तं ; ८–१० **कुमर ये काळीं** नि धु. खवर्ग मध्यें ही ओवी नाहीं.

५८. १ **इंद्र** नि गो२ ; २ **कळवळला** नि गो२ ; ३ **त्यांला** नि पु·४ नां , **सकळां** मुं.

५९. १ **हरुषें** नि ख औं पु रा गो·२ ; २ **पातले** ख मुं ; ३ **स्वच्छोदकें** नि , **स्वेछोदकें** पु४ गो·२.

तें द्वीप पाहोनि निवाडें । सहित कद्रू विनता गरुडें ।
सर्प ह्मणती याहूनि पुढें । सुंदर द्वीप पैं असे ॥ ६० ॥
तेथें आम्हुतें वाहूनि पृष्ठीं[1] । गरुडा नेईं न लगतां[2] तृष्टी[3] ।
नाना द्वीपें तुझिये दृष्टी । पडती[4] प्रसादें आम्हुच्या ॥ ६१ ॥
परिसोनि सर्पाचें[1] सत्तावचन[2] । गरुड मानसीं कोपायमान ।
मातेसी पुसे येथें[3] कारण । काय तें सांग[4] मजप्रती[5] ॥ ६२ ॥
हीनवीर्य दुरात्मे[1] खळ । क्लेशविती सदाकाळ[2] ।
विक्रीत दासी[3] भृत्यातुल्य । सत्ता करिती मजवरी[4] ॥ ६३ ॥
इहीं सांगीतलें[1] काज । किमर्थ[2] करणें सांडूनि लाज ।
विनता ह्मणे कपटपैज[3] । घालोनि[4] मातें[5] जिंकिलें[6] ॥ ६४ ॥
तेणें गुणें परमक्लेशी । सहस्र अयनें जालियें[1] दासी ।
ऐकोनि पुत्राचे मानसीं । खेद अद्भूत[2] वाढिनला[3] ॥ ६५ ॥
ह्मणे[1] माते परिसें[2] मातु । तुझेनि पालटें जे[3] जे[4] वस्तु ।
मागती ते मी[5] समर्थु[6] । देऊनि तूतें सोडवीन ॥ ६६ ॥

---

६१. १ पुष्टीं ख नां औं गो॰२ तं पु ; २ लागतां नि ; ३ त्रुटी नि, घटी पु४, तृटी मुं औं रा धु, तुष्टी गो तं ; ४ घडती धु तं.

६२. १ सर्प औं ; २ संतापवचन पु ; ३ हें नि ; ४ सांगें नि ख मुं, सांगिजे गो२ ; ४–५ मातें सांग पां औं ; ५ मजपाशीं ख.

६३. १ दुरात्म नि ; २ सर्वकाळ ख धु तं ; ३ दास नि ( स प्रसंप्रा ) ; ४ आह्मांवरी नि धु तं.

६४. १ (+) आह्मीं धु तं ; २ कां नि ; ३ कपटें पैज नि मुं, कपटें मज ख ; ४–५ पैज घालोनि ख ; ६ जिंतिलें औं पु गो॰२.

६५. १ झालें मीं नि, जालीं गो॰२ ; २ अत्यंत औं पु ; ३ वाढिन्नला नि, नावरे मुं, वाढला औं पु गो.

६६. १ (–) औं पु ; २ आइकें पु, ऐकें एक औं, परिस हे नि ; ३–४ नाना गो२ ; ५ ते नां तं ; ६ समस्तु मुं.

विनता विचारी[1] कद्रूतें । कवण वस्तु वोपिल्या तूतें ।
दासीकर्मापासूनि[2] मातें । मुक्त करिसी तें सांग ॥ ६७ ॥
कद्रू ह्मणे ऐक वचना । मज आणि माझिया नंदनां ।
अमृत आणूनि दिधलिया पाना । मुक्त करीन तुजलागीं ॥ ६८ ॥
मातेनें[1] सांगतां[2] गरुडाप्रती । बाहू पिटी भीमपुरुषार्थी ।
जिंकोनि देवांचिया पंक्ती । अमृत आणीन निर्धारें ॥ ६९ ॥
परी क्षुधानळें[1] पीडिलों[2] जठरीं । भक्ष वोपीं वो[3] झडकरी ।
माता ह्मणे सागरोदरीं । निषादालय विस्तीर्ण ॥ ७० ॥
समुद्रकुक्षीं अतियेकांत । निषादालयीं असंख्यात ।
निषाद भक्षूनि अमृत । सीघ्र[1] आणीं सुपुत्रा[2] ॥ ७१ ॥
परंतु गेलियाही प्राण । न करीं ब्राह्मणभक्षण[1] ।
ब्राह्मण अग्नीसमान जाण[2] । सर्वभूतीं मानिजे[3] ॥ ७२ ॥
सूर्यअग्नीपरीस सीघ्र[1] । शापें[2] कोपें जाळी[3] विप्र ।
कल्पद्रुमाहूनि उदार । फळ वोपी[4] प्रसादें[5] ॥ ७३ ॥
विषापरीस मारक रोषें । अमृताहूनि तारक तोषें[1] ।
पादरेणूचेंनि कुलिशें[2] । पापपर्वत विभांडी[3] ॥ ७४ ॥

---

६७. १ पुसे ख ; २ °पासाव गो.

६९. १ माता मुं ; २ सांगे मुं.

७०. १ क्षुधेनें धु ; २ पीडिलें पु४ ; ३ हो गो२ नि ( स प्रसंप्रा ), ( – ) ख औं पु.

७१. १ शीघ्र औं पु नि तं ; २ समुद्रा पु४.

७२. १ ब्राह्मणाचें भक्षण गो२ पु ; २ ( – ) खवर्ग ; ३ जाणिजे धु गो२ तं.

७३. १ तीव्र ख औं , विप्र पु , क्षिप्र नां ; २ शाप पु ख औं मुं ; ३ जाळिती नि , जाळील मुं नां ; ४ ओपिती नि , वोपील ख ; ४–५ प्रसादें भूसुर धु , प्रसादें तं.

७४. १ विशेषें पु४ ; २ स्पर्शें औं , लेशें नां ; ३ विभांडिती नि.

ब्राह्मण तोचि महाविष्णु । त्याचे[1] पूजनें[2] तुष्टे[3] भगवानु ।
ब्राह्मणद्वेषियां[4] नारायणु । वैरी मानी आपुले[5] ॥ ७५ ॥
ह्मणसी[1] ब्राह्मण जाणों[2] कैसा । तरी[3] ग्रासितां[4] खदिरांगार तैसा[5] ।
कंठीं[6] लागेल[7] तो[8] खगेशा[9] । वीर्य जाण[10] द्विजाचें[11] ॥७६॥
बिडिश[1] मीनाचिये कंठीं । लागतां करी शरीरसाटी[2] ।
तैसा ब्राह्मण ग्रासितां कष्टी[3] । तूं होसील खगेंद्रा[4] ॥ ७७ ॥
मातृआज्ञा[1] वंदूनि[2] परम । निघता जाला खगोत्तम[3] ।
निषादद्वीप अतिदुर्गम[4] । मनोवेगें पावला[5] ॥ ७८ ॥
तया द्वीपा[1] परिघ[2] चौफेरीं । विशाळ पर्वताची भंवरी[3] ।
सकळा निर्गम येकद्वारीं । दुर्गद्वारासारिखा[4] ॥ ७९ ॥
तेथें गरुडें लाविलें वदन । पक्षझडाडें[1] सोडिला[2] पवन ।
तेणें धुरोळा[3] दाटला[4] सघन[5] । माजी दिनमणि लोपला ॥ ८० ॥

---

७५. १ **त्याचेनि** ख मुं , **त्याचें** पु४ ; २ **पूजन** पु४ , **पूजें** मुं नां गो ; ३ **संतुष्ट** नि मुं , **करी** पु४ ; ४ °**द्वेषिया** नि , °**द्वेषियातें** औं पु ; ५ **आपुला** नि औं पु.

७६. १ **ह्मणती** ख नां ; २ **जाणावा** धु , **जाणे** ख औं , **जाणूं** नि तं ; ३ (–) नि ख गो·२ ; ४ **भक्षितां** ख , **प्राशितां** रा ; ५ **जैसा** ख पु४ धु तं ; ६–८ **कठिण लागले ते** पु४ ; ९ **द्विजेशा** रा गो·२ तं ( धु प्रसंप्रा ) ; १० **जाणे** पु४ , **जाणा** गो·२ ; ११ **ब्राह्मणाचें** नि.

७७. १ **बडिश** नि रा गो·२; २ **प्राणसाठीं** नि, **प्राणासाठी** मुं , **प्राणसाटी** ख पु नां , **प्राणसंकटीं** पु४ ; ३ **कंठीं** ख गो·२ ; ४ **खगेशा** ख औं.

७८. १ **मात्रुआज्ञा** पु४ नां धु ; २ **मानुनि** पु४ , **वंदितां** धु तं ; ३ **गरुडोत्तम** खवर्ग रा गो·२ ; ४ °**उत्तम** नि ; ५ **पातला** नि गो·२ खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ).

७९. १ **द्वीपाचे** नि ख पु४ औं ; २ (–) नि खवर्ग ; ३ **भोंवरी** नि ; ४ °**सारिखे** नि खवर्ग.

८०. १ °**झडाडे** नि, °**झुझाडें** गो , °**जडाडें** गो२ ; २ **गोविला** गो ; ३ **धुळोरा** औं पु ; ४ **दाटिलें** औं पु ; ५ **गगन** औं पु , **गगना** गो·२.

स्थानें सांडिलीं[1] पर्वतीं । गुसळों[2] लागला अपांपति[3] ।
धाकें निषादांचिया पंक्ती । गिरिद्वारें निघाल्या[4] ॥ ८१ ॥
पळतां[1] निषादांचे पाळे । गरुडमुखीं जाती सगळे ।
कोटीच्या[2] कोटी[3] वरी आगळे । लक्ष[4] किती नेणवती[5] ॥ ८२ ॥
त्यांमाजी[1] ब्राह्मण येक[2] पतित । निषादी स्त्रियेसमवेत[3] ।
कंठीं लागला अकस्मात । तप्तलोहासारिखा[4] ॥ ८३ ॥
गरुडें देऊनि[1] वोकारी[2] । ह्मणे ब्राह्मणा नीघ[3] बाहेरी ।
येरु ह्मणे गा प्राणेश्वरी । निषादी[4] माझी[5] मजसंगें[6] ॥ ८४ ॥
उगळिसील[1] अरुणानुजा । तरीच देह परतेल माझा ।
गरुडें ब्राह्मणासहित भाजा । मुखींहूनि[2] सांडिली[3] ॥ ८५ ॥
आज्ञा देऊनि[1] धाडिलें त्यातें । ग्रासूनि सर्व निषादांतें ।
गगना[2] वळघला[3] तवं[4] अवचितें । कश्यपातें[5] देखिलें[6] ॥ ८६ ॥
नमस्कारितां तातचरण[1] । पित्यानें[2] दिधलें आलिंगण[3] ।
ह्मणे कुमरा[4] कुशल पूर्ण[5] । सांग तूतें असे कीं ॥ ८७ ॥

---

८१. १ **सोडिलीं** नि ख पु४ ; २ **घुसळों** नि गो·२ , **उसळों** मुं औं पु ; ३ **आपपति** पु४ ; ४ **रिघाल्या** गो·२.

८२. १ **पळती** ख औं पु , **पळत** पु४ मुं नां ; २–३ **कोटीकोटी** नि ; ४ **संख्या** औं ; ५ **न मवेती** ख , **नेमवती** मुं नां , **नेमावी** औं , **नेमावती** पु.

८३. १ (+) **होता एक** नि ; २ (–) नि , **हो** ख पु·४ , **होता** मुं ; ३ **स्त्रियेसहित** खवर्ग ; ४ **सत्यलोहा°** पु४.

८४. १ **देखोनि** नि मुं गो२ ; २ **खोकारी** पु४ ; ३ **निघें** नि धु गो नां ; ४–६ **निषेध मांजि मज सांगे** पु४.

८५. १ **उगळिसी** पु४ औं तं , **तीस उगळिजे** धु , (+) **जरी** ख पु·४ औं ; २ **मुखीं होवोनि** गो ; ३ **सोडली** नि औं.

८६. १ **होवोनि** पु४ ; २ **गगन** नि ख रा पु , **गगनीं** औं; ३ **वळतां** औं ; ४ (–) औं ; ५–६ **कश्यपमुनि देखिला** गो२.

८७. १ **चरण** मुं औं , **चरणा** धु , **°चरणा** गो·२ , **तच्चरणा** तं ; २ **प्रीतीनें** ख , **पितेन** गो·२ , **पितनें** औं पु ; ३ **आलिंगन** नि मुं , **आलिंगणा** तं ; ४ **पुत्रा** तं ; ५ **संपूर्ण** नि , **पूर्णा** धु तं.

गरुड ह्मणे स्वामी[१] ताता । सर्पीं[२] जिंकिली[३] विनता माता ।
तिच्या दासित्वपरिहारार्था[४] । अमृत आणूं जातसें ॥ ८८ ॥
क्षुधा माझी अत्यद्भुत[१] । निषादभक्षणें नव्हेचि[२] शांत[३] ।
पिता मोहें[४] स्नेहभरित । ह्मणे परिसें बाळका[५] ॥ ८९ ॥
देवलोकीं सरोवर । विशाळ जैसा[१] महासागर[२] ।
त्यामाजी कूर्म[३] आणि[४] कुंजर[५] । युद्ध[६] करिती[७] मूळवैरें[८] ॥९०॥
त्याची[१] कथा सांगेन[२] ऐक । विभावसु आणि सुप्रतिक ।
दोघे[३] ब्राह्मण[४] सहोदर[५] देख । अर्थस्वार्थें[६] विरोधी[७] ॥ ९१ ॥
कनिष्ठ ह्मणे द्रव्यविभाग । माझा मजलागीं[१] वोपीं चांग ।
ज्येष्ठ ह्मणे येकत्र[२] योग[३] । असतां[४] लोकीं[५] प्रतिष्ठा ॥ ९२ ॥
तुंबा[१] तंति[२] वेणुदंड । तिघां[३] मेळीं[४] वीणा[५] सुघड[६] ।
मधुरस्वरीं श्रवणा[७] गोड । नाना लोकां[८] रंजवी ॥ ९३ ॥
तिन्ही[१] सांडितां तीं ठायीं । कोण्ही हातें[२] न शिवे पाहीं ।
तैसा वेगळाचार कांहीं[३] । श्लाघ्य नव्हे[४] श्रेष्ठातें ॥ ९४ ॥

---

८८. १ **सांग** पु४ ; २ **कद्रूनें** ख ; ३ **जिंतिली** नि गो·२ खवर्ग ; ४ **दाशत्व°** पु धु गो , **दास्यत्व°** औं.

८९. १ **अति अद्भूत** धु तं , **अद्भूत** ख ; २ **नव्हे** नि ख रा गो·२ ३ **तृप्त** ख ; ४ **बोलें** औं ; ५ (+) **तूं** गो·२.

९०. १ **जैसें** गो तं , **जैसा हो** ख पु·४ औं ; २ **सागर** नि खवर्ग ; ३–५ **कूर्मकुंजर** नि ; ६–८ **मूळवैरें झुंजती** नि , **मूळवैरें युद्ध करिती** खवग.

९१. १ (–) नि ; २ (+) **ते** नि ; ३–५ **सहोदर असती** नां ; ५ **सोदर** ख पु४; ६ **अर्थस्वार्थ** मुं नां रा गो , **अर्थस्वार्था** औं पु; ७ **विरोधीं** नि.

९२. १ **मज** ख नां , **मजला** पु ; २–३ **सहोदरा एक सांग** मुं ; ४–५ **येकत्र असतां** मुं ; ५ **लौकिकीं** धु.

९३. १ **तंतुक** मुं ; २ **तंतु** पु४ औं मुं ; ३ **तिघे** पु४ ; ४ **मिळोनि** पु४, **मेळणीं** मुं , **मेळवितां** औं , **मेळावि** नां , **मेळवी** पु ; ५ **गा** नां , (–) औं पु ; ६ **उघडु** पु४ , **सुभड्ड** नां , **सुजड** रा गो तं ; ७ **श्रवणीं** नि रा , **श्रवण** पु४ गो२ औं ; ८ **लोक** औं पु तं.

९४. १ **तिनी** गो , **ऐसीं तिनी** गो२ ; २ **हातीं** नि पु४ औं पु गो·२ ; ३ **पाहीं** मुं नां रा गो·२ , **उपाई** ख , **देहीं** पु४ ; ४ **नोहे** ख पु·४ औं गो२ रा.

ऐसा वडील[१] विचारें[२] बोधी । परि कनिष्ठ नायके आग्रहवादी[३] ।
नित्य कलहें[४] जाला[५] क्रोधी[६] । शाप वोपी अनुजातें[७] ॥ ९५ ॥
अखंड मातें पीडिसी पाहा[१] हो[२] । दुष्टा पावसी कुंजरदेहो ।
येरु ह्मणे तूं जळग्रहो । कमठ[३] होसी कपटिया ॥ ९६ ॥
परस्परें[१] वदतां[२] शापु । कुंजरकांसवाचिया वपु ।
धरूनि पूर्वील[३] संकल्पु । झुंझ[४] करिती अद्यापि ॥ ९७ ॥
त्या गजाचें शरीर जाण[१] । उंच[२] विशाल साहा[३] योजनें[४] ।
लंबायमान त्या[५] द्विगुण[६] । बारा गांवें[७] प्रचंड[८] ॥ ९८ ॥
दुसरें कछपकळेवर[१] । तीन योजनें[२] उंच[३] भयंकर[४] ।
दाहा योजनें रुंदविस्तार । पर्वतपृष्टीसारिखा[५] ॥ ९९ ॥
त्यांचे देह भक्षुनी वेगीं । सुधा[१] मातृमोचनालागीं ।
आणितां देव जिंकोनि[२] स्वर्गीं । जय[३] पावसी निर्धारें ॥ १०० ॥

---

९५. १–२ **विचार वडील** औं पु ; ३ **अग्रवादी** ख गो॰२ , **अत्यंत क्रोधी** औं , **वादी** भुं ; ४ **कलहो** नि मुं औं पु , **कलह** ख पु४ ; ५ **झालिया** नि , **होत** औं ; ६ **वादीं** औं ; ७ **परस्परें** औं.

९६. १–२ **पाहो** ख गो॰२ तं , **पाहा वो** रा , **पाहें** धु , **पाहा हे** पु४ ; ३ **नक्र** मुं.

९७. १ **ऐसा** औं ; २ **होतां** धु तं ; ३ ( + ) **कर्म** रा गो॰२ ; ४ **झुंज** नि धु.

९८. १ **जाणं** पु४ गो२ ; २ **उंची** औं पु धु ; ३ **सा** औं रा पु , **षड** तं ; ४ **योजन** नि ख मुं नां पु ; ५ **त्याही** पु४ औं पु ; ६ **द्विगुणें** औं रा गो॰२ ; ७ **गांव** गो२ पु ; ८ **प्रसिद्ध** गो.

९९. १ °**कळीवर** ख पु४ नां धु गो२ , **कच्छपकलेवर** नि , **नक्र**° मुं , **कमठ**° गो ; २ **गांवें** ख ; ३ ( – ) नि ख तं धु ; ४ **भीकर** तं , **भीतर** रा गो॰२ ; ५ °**पृष्ठासारिखें** नि , °**पुष्टी**° नां औं पु तं गो२.

१००. १ **सोम** रा धु गो२ , **तो** तं ; २ **जिंतोनि** ख मुं नां औं ; ३ **जया** नि , **जयो** पु४ औं.

वेदमंत्रबीजरहस्यें[१] । मंत्रदेवता[२] सावकाशें[३] ।
प्रसन्नतेचेनि[४] महाहर्षें[५] । विजयप्रद[६] तुज होती[७] ॥ १०१ ॥
आणि[१] विष्णूचें ध्यानस्मरण । करी ज्याचें हृदयवदन ।
त्यातें[२] रिद्धिसिद्धी[३] जाण । कर जोडुनि वोळंगती ॥ १०२ ॥
अच्युत केशव नारायण । कृष्ण दामोदर संकर्षण ।
श्रीधर माधव गोपीरमण[१] । रघुनंदन दाशरथी ॥ १०३ ॥
ऐसिया[१] नामांची जपमाळ । पुत्रा[२] जपतां सर्वकाळ[३] ।
पायें लोटुनि कळिकाळ । जय पावसी तिहीं लोकीं ॥ १०४ ॥
ऐसा बोळवी[१] आज्ञापुनी । मंगळ[२] लाभ सुचिला शकुनीं ।
शक्ति वाढली[३] सहस्रगुणीं[४] । बाहु स्फुरती युद्धार्थें[५] ॥ १०५ ॥
सरोवरा पातला[१] लाहें[२] । गगनीं राहोनि[३] कौतुक पाहे[४] ।
सुप्रतीक[५] कुंजरदेहें[६] । तडागोदका[७] पातला ॥ १०६ ॥
त्याच्या गर्जनेचा घोष । ऐकोनि कूर्मा[१] चढला रोष ।
बाहेरी धाविनला[२] द्वेष । जन्मांतरींचा स्मरोनी ॥ १०७ ॥

---

१०१. १ °रहस्य ख पु४ मुं तं ; २ तंत्रमंत्र° नि ; ३ सावकाश ख पु४ मुं तं ; ४ प्रसन्नचित्तें नि , प्रसन्नतेचे मुं गो२, प्रसन्नतेणें औं पु, प्रसन्नतेसी धु , प्रसन्नतेची तं ; ५ °हरुषें नि पु ; ६ विजइप्रसाद ख ; ७ होवो नि.

१०२. १ श्री औं ; २ त्या ख तं ; ३ ऋद्धि सिद्धि नि.

१०३. १ गोपिकारमण तं.

१०४. १ ऐसी मुं पु ; २ पुत्र पु४ रा ; ३ सार्वकाळ ख तं , नित्यकाळ गो२.

१०५. १ बोळविला नि , बोलवी पु४ धु; २ मग नि खवर्ग (मार्ग ख); ३ वोढवी गो ; ४ चौगुणी मुं ; ५ युद्धार्थी नि खवर्ग ( ध्यानार्थि औं पु ).

१०६. १–२ जवळीं जाय मुं ; २ लवलाहें नि नां औं पु , लाहो पु४ ; ३ जाउनि मुं ; ४ पाहा हो पु४ ; ५ सप्रतीक मुं औं पु ; ६ °देहो पु४; ७ तडागोदरा खवर्ग , तडागोदरीं नि.

१०७. १ नक्रा मुं ; २ पातला ख.

चरणीं घालूनियां आढी[१] । कांसव[२] गजातें आसुडी[३] ।
कुंजरदांतांचिये जोडी । कूर्मग्रीवा[४] गोंवितु[५] ॥ १०८ ॥
खळबळी[१] कासारिंचें जळ । मछमगरां[२] प्रळयकाळ ।
हें देखोनि विहंगमपाळ । झेंप[३] घाली[४] सत्राणें ॥ १०९ ॥
वामचरण[१] चवड्याआंत[२] । दोघे[३] कवळिले[४] झोंबीसहित[५] ।
गगनोदरीं[६] फेरे देत । ठाव[७] पाहे[८] बैसावया[९] ॥ ११० ॥
तवं महापर्वतीं[१] विशाळरूप । रोहिणेयवट[२] पादप ।
खग यक्षिणी[३] श्वापदकळप । असंख्यात वसीनले[४] ॥ १११ ॥
मस्तकींहुनि पारंबिया । पाताळपर्यंत[१] भेदलिया ।
कनकशाखीं पाल्हेलिया[२] । रत्नकळिका[३] सुरंग ॥ ११२ ॥
वृक्ष ह्मणे हे देवपक्षी । शतयोजनें शाखा लक्षीं ।
तीवरी[१] बैसोनियां[२] भक्षीं । कूर्म[३] आणि कुंजर ॥ ११३ ॥

---

१०८. १ **अढी** नि ख ; २ **नक्र** मुं ; ३ **पैं वोढी** नि खवर्ग ( **वोढी** औं पु ) ; ४ **नक्रग्रीवा** मुं , **कूर्मग्रीवें** नि ; ५ **वोढित** पु४ , **वोपितु** धु , **जोडित** गो२ , **वोवितु** तं.

१०९. १ **खळवळी** नि , **खळबळलें** गो२ ; २ **मत्स्य**° नि ( स प्रसंप्रा); ३–४ **झेंपावला** नि खवर्ग. नां मध्ये या ऐवजीं पुढील ओवी आहेः—

हें देखोनि विहंगमपाळें । बाहेरी काढुनि निराळें ।
दोघां कवळोनि अंतराळें । झेंपावला सत्राणें ॥ १०९ ॥

११०. १ **वामचरणींच्या** औं धु तं ; २ **चवडीयांत** नि मुं , **चवडिया आंत** पु·४ , **चवड्यांत** औं ; ३ **दोन्ही** नि खवर्ग ( पु प्रसंप्रा ) ; ३–५ **गोउनिया नभाआंत** औं ; ५ **झोंबियेसहित** नि ख ; ६ **गगनीं राहोनि** ख ; ७ **ठावो** नां गो·२ पु ; ८ **पाहात** धु ; ९ **भक्षावया** नां.

१११. १ **पर्वतमहा** ख , **महापर्वत** मुं गो२ ; २ **रौहिणेयवट** नि तं , **रोहिणीय**° ख मुं नां पु , **रोहिणियेकट** पु४ , **राहोनियांवट** औं ; ३ **पक्षिणी** नि औं पु नां ; ४ **वसिन्नले** नि.

११२. १ °**परियंत** नां औं पु; २ **पाळलिया** नि; ३ **रत्नकळिके** खवर्ग.

११३. १ **तिजवरी** नि , **जोवरी** ख , **वरी** औं ; २ **येउनियां** औं पु ; **कमठ** औं पु.

ऐसें ऐकोनि गृध्रराणो । अळुमाळ ठेवी सव्यपावो ।
तवं शाखा[1] कडाडिली भेवो । नाना खेचर पावले[2] ॥ ११४ ॥

गरुड शाखा[1] पाहे दृष्टी । तवं पानोंपानीं देंठोंदेंठीं ।
वालखिल्य[2] सहस्र साठी । अधोवदनें[3] लोंबती ॥ ११५ ॥

तिहीं[1] देखोनि पुरुषार्थ भीम । गरुड ऐसें ठेविलें नाम ।
असो भयें विहंगोत्तम[2] । शाखा घेऊनि उडाला ॥ ११६ ॥

करीं कछप[1] आणि शाखा । उभय चरणीं कवळुनी[2] देखा ।
फेरे घाली भूगोळका । परमधाकें रुषींच्या[3] ॥ ११७ ॥

शाखा सांडिताचि[1] धरणी । शाप देतील महामुनी ।
तेणें भयें[2] उद्विग्न मनीं । अंतरिक्षीं[3] तळपत ॥ ११८ ॥

ऐसा फिरतां[1] गगनपंथीं । गंधमादन महापर्वतीं[2] ।
कश्यपऋषि देखिला पुढतीं[3] । तयाप्रती पातला ॥ ११९ ॥

सचिंत देखोनि कुमरातें[1] । पिता नाभिकारी[2] हातें[3] ।
वैखानसांपासूनि[4] तूतें[5] । शापभय असेना ॥ १२० ॥

---

११४. १ (–) ख ; २ **पळाले** नि ख मुं , **पावती** नां.

११५. १ **ऐसें** मुं ; २ **वालखिल** नां औं पु गो·२ , ३ °**वदन** नि.

११६. १ **तेहीं** ख मुं नां ; २ **विहंगमोत्तम** धु.

११७. १ **कच्छप** नि (स प्रसंप्रा) , **नक्र** मुं ; २ **ठेवोनि** पु४ ; ३ **ऋषींच्या** नि गो·२ तं.

११८. १ **सारितांचि** पु४ ; २ **गुणें महा** गो२ ; ३ **अंतरिक्ष** रा गो·२ खवर्ग ( औं प्रसंप्रा ).

११९. १ **फिरत** ख मुं ; २ **पर्वतीं** औं पु ; ३ **मागुती** औं पु.

१२०. १ **कुमारातें** नि औं ; २ '**ना भी**' **करी** नि ख , **नाभिकारित** पु४ नां रा तं ; ३ **त्यातें** ख औं पु , **पुत्रातें** गो ; ४ **वालखिल्यांपासूनि** नि मुं , **वैश्वानसां°** पु४ , **वैश्वानरां°** गो२ , **ऋषेश्वरां°** गो ; ५ **येथें** औं , **तेथें** पु.

मग जोडुनी दोन्ही कर । प्रार्थिले ते ब्रह्मकुमर ।
स्वामी तुह्मी दयाकर । क्षमासीळ[1] सर्वथा[2] ॥ १२१ ॥
लोकहितालागीं[1] जाणा[2] । गरुड जातसे स्वर्गभुवना ।
तुह्मीं जावें आणिका स्थाना । भग्नशाखा सांडूनी ॥ १२२ ॥
ऐकोनि कश्यपाची विनंती । हिमालयपर्वताप्रती[1] ।
वालखिल्य मानसगती । जाते जाले तात्काळ ॥ १२३ ॥
कश्यप कुमरा[1] आज्ञा करी । तूं[2] हिमाचळावरिले[3] सिखरीं[4] ।
शाखा ठेवूनि भक्षण करीं । कुंजर आणि कमठांचें ॥ १२४ ॥
गरुड गेला गिरिमस्तका । तेथें ठेऊनि[1] वटशाखा[2] ।
करी[3] कछप दोघे देखा[4] । सावकाश[5] भक्षिले[6] ॥ १२५ ॥
जाला उत्पवना[1] उद्यत[2] । तवं स्वर्गीं सुटला[3] महोत्पात[4] ।
इंद्रवज्रापासूनि उठत । वन्हिज्वाळा भडभडां ॥ १२६ ॥
भिन्नभिन्न सुरांचीं शस्त्रें । जुंझ[1] करिती[2] परस्परें ।
रक्तोदकाचेनि तुषारें । मेघ वर्षों लागला[3] ॥ १२७ ॥

---

१११. १ **क्षमाशील** नि तं, °**शीळ** औं पु; २ **सर्वदा** ख गो, **सर्वथां** पु४ तं.

१२२. १ **अमृतानयनालागीं** नि, **अमृता आणावया** तं ; १-२ **मातेचिया बंधमोचना** धु.

१२३. १ **हिमाचळपर्वता**° नां.

१२४. १ **कुमरातें** नि धु तं ख ; २ **तुह्मीं** ख पु·४ नां, **तुवां** औं, (–) नि ; ३ **हिमाचळाच्या वरिल्या** नि; ४ **शिखरीं** नि औं पु तं.

१२५. १ **ठेवी** पु४ ; २ **पादपशाखा** नि गो२, **नुतनशाखा** पु४, **कनकशाखा** खवर्ग रा ; ३ **करिण** औं धु गो२ ; ४ **जे कां** औं ; ५-६ **भक्षण करूं लागला** खवर्ग. गो मध्यें ही ओवी नाहीं.

१२६. १ **उत्पतना** नि ; २ **उद्युक्त** पु४, **उदित** मुं औं पु ; ३ **सुटले** रा धु गो, **उठला** नि ; ४ **प्रळयवात** ख.

१२७. १ **झुंज** नि ; १-२ **झुंकारिती** गो·२ ; ३ **लागले** नि नां.

क्रिरीट[1] देवांचिये[2] मौळीं । तेथें बैसली दिसे धुळी ।
दिवाभीतांचे कोल्हाळीं[3] । सीतज्वर प्रगटले[4] ॥ १२८ ॥

देखोनि अरिष्टांचा मेळा । शक्राआंगीं[1] भयकांटाळा[2] ।
ते वेळीं पाचारिला[3] जवळां । देवगुरु[4] साक्षपें[5] ॥ १२९ ॥

त्याप्रती निवेदिली मातु[1] । ऐकोनि अंगिराचा सुतु[2] ।
बृहस्पति सांगे ते[3] परिसतु[4] । श्रोते कथा पुढारीं[5] ॥ १३० ॥

इति श्रीआस्तिकसहसौपर्णे[1] । भारत आदरें ऐकोत[2] शाहाणे ।
मुक्तेश्वरप्रसादें[3] ह्मणे । कविकिंकर[4] आवडी ॥ १३१ ॥

इति श्रीभारते आदिपर्वणि पंचमोऽध्यायः ॥

---

१२८. १ **किरिटी** गो॰२ ; २ **देवांचिया** नि ; ३ **कल्लोळीं** नि ख मुं रा गो२ ; ४ **प्रगटला** ख नां औं पु धु.

१२९. १ **शक्रा मनीं** मुं ; २ **भयकंटाळा** ख मुं नां तं ; ३ **पाचारिलें** नि खवर्ग ( ख प्रसंप्रा ) ; ४ **देवगुरूतें** नि ; ५ **साक्षेपें** ख पु४ मुं नां.

१३०. १ **मात** नि ( स प्रसंप्रा ) रा धु गो२ ; २ **सुत** नि रा धु गो॰२ ; ३ ( – ) धु नां औं ; ४ **परिसोत** नि धु , **परिसत** गो॰२ ; ५ **पुढांती** गो२.

१३१. १ **श्रीकद्रुविनतासौपर्णे** नि ; २ **ऐकतां** नि ख , **ऐका** मुं ; ३ **विश्वंभरप्रसादें** नि ; ४ **मुक्तेश्वर** नि.

॥ श्री ॥

# अध्याय सहावा

## श्रीगणेशाय नमः

सुरगुरु[1] ह्मणे[2] वज्रपाणी । तुझेनि[3] अपराधें[4] विषाद[5] मनीं ।
मानुनी[6] साठी[7] सहस्र जनीं[8] । वालखिल्लीं साक्षेपें[9] ॥ १ ॥
तपें तोषवूनि[1] रुद्र । करीत असतां दुसरा इंद्र ।
कश्यपें प्रार्थूनि पक्षेंद्र[2] । जो[3] करविला[4] बळिष्ट[5] ॥ २ ॥
तो गरुड हो स्वर्गभुवना । बळें येतसे अमृतहरणा[1] ।
मातृशापविमोचना । लागूनियां[2] प्रतापें ॥ ३ ॥
त्यासीं तुळे हो[1] संग्रामीं । ऐसा नाहीं ब्रह्मांडधामीं ।
यालागीं[2] आतां समस्तीं[3] तुह्मीं । अमृत यत्नें रक्षावें ॥ ४ ॥
परंतु[1] जिंकोनि[2] समस्तांसी । अमृत[3] हरील[4] निर्धारेंसीं[5] ।
यालागीं अशुभ चिन्हें ऐसीं । उदेलीं हें जाणिजे[6] ॥ ५ ॥
ऐकोनि बृहस्पतिचिया वचना । इंद्र हाकारी अमरगणां[1] ।
युद्धसामग्रीसीं[2] जाणा । सुधासरोवर रक्षावें ॥ ६ ॥

---

१. १ **सद्गुरु** नि , **श्रीगुरु** औं पु ; २ (+) **गा** नि ; ३ **तुझे** मुं गो२ ; ४–५ **विषादें अपराध** पु४ ; ६ **मानिला** नि ; ७ **साठ** नि ; ८ **गुणीं** धु तं ; ९ **साक्षपें** नि रा गो२ तं.

२. १ **तोषवेल** पु४ ; २ **पक्षींद्र** नि रा पु तं ; ३ (+) **का** औं पु ; ४ **करवि** पु४ , ५ **बळी विष्णु** नि , **बळिष्टें** ख , **खळिष्णु** पु४.

३. १ °**हारणा** ख ; २ **मागोनियां** पु४.

४. १ (–) ख पु४ मुं , **जो** धु ; २ **तरी** नि खवर्ग ; ३ **समस्त** नि मुं नां औं तं , **समस्तही** पु.

५. १ **परी तो** नि खवर्ग ; २ **अजिंक** नि खवर्ग ; ३ **तो आंमृत** धु ; ४ **हारील** ख पु४ , **म्हेईल** गो२; ५ **निश्चयेंसी** गो२ ; ६ **जाण पां** ख गो·२.

६. १ **सुरगणा** तं ; २ **युध्य**° ख पु४ , **युध्यसामुग्रीसी** नां , **युध्यसामोग्रीसी** धु , **युध्यसंग्रामासी** तं.

आज्ञा होतक्षणीं[१] त्वरित । वसु रुद्र साध्यादित्य[२] ।
मरुद्गणही[३] समस्त[४] । सिद्ध जाले[५] संग्रामा[६] ॥ ७ ॥
कवचें बाणलीं[१] रत्नखचित । टोप सूदले वज्रमंडित ।
करीं करवाळें[२] झळकत । विद्युत्प्रभेसारिखीं[३] ॥ ८ ॥
चक्रें[१] परिघ शूळ शक्ती । फरश[२] पट्टीश मुद्गरजाती[३] ।
गदा पडताळितां[४] हातीं । धाकें कांपती गिरिमौळें[५] ॥ ९ ॥
यमदंष्ट्रा खोविल्या कटीं[१] । तूणीर आंवळिले पुष्ठीं[२] ।
धनुष्यें[३] सज्जूनियां मुष्टीं । समुदायेंसीं निघाले ॥ १० ॥
अमृतकुंड वेष्टित[१] बळें । पडिले अमरगणांचे पाळे ।
जेथें संचरावया[२] अनिळें । रीघ[३] नोहे सर्वथा ॥ ११ ॥
दाही दिशां लावूनि नयन[१] । पाहत ठेले गरुडागमन[२] ।
सूर्य चंद्र यम वरुण[३] । वन्हि वायो[४] इत्यादि ॥ १२ ॥
शौनक ह्मणे अगा[१] सुमती । पौराणिका[२] चक्रवर्ती ।
कवण अपराध सुरपति[३] । आचरला ऋषींचा ॥ १३ ॥

---

७. १ **होतांक्षणीं** नि मुं रा पु, **होते°** नां धु तं, **होतांक्षीणि** पु४ ; २ **साध्यआदित्य** धु तं ; ३ **मरुद्गणेंहि** पु४, **मरुद्गणादि** धु पु ; ४ **समवेत** औं पु ; ५ **होती** औं ; ६ **संग्रामीं** औ पु.

८. १ **वाणलीं** पु४ तं ; २ **करवाळ** औं पु ; ३ **°सारिखें** पु.

९. १ **चक्र** मुं औं पु ; २ **परशु** नि औं गो॰२, **परश** ख पु४ ; ३ **मुद्गल°** नि ख मुं औं पु ; ४ **पडताळिती** नि ख मुं नां, **पडताळिली** पु ; ५ **°मौळी** नि, **°मौळीं** तं.

१०. १ **कंठीं** नि ; २ **पृष्ठीं** नि ख मुं रा ; ३ **धनुष्य** नि खवर्ग.

११. १ **वेष्टिती** नि, **वेष्टिलें** औं पु ; २ **संचारावया** नि धु तं ; ३ **रिगमु** धु.

१२. १ **नयना** नि पु४ ; २ **गरुडागमना** नि, **गरुडगमन** मुं नां धु गो२ पु ; ३ **वरुणां** पु४ ; ४ **वायु** नि मुं.

१३. १ **गा** औं पु ; २ **पौराणिक** नि ख रा गो॰२ तं ; ३ **अमरपति** गो.

जेणें[1] वालखिल्ल[2] कोपें । दुसरा इंद्र पैं[3] साक्षपें ।
करीत होते तें[4] त्वां[5] कृपें[6] । निरोपिलें पाहिजे ॥ १४ ॥
सौति ह्मणे हो जी ऐका । कश्यप सृष्टीचिया जनका ।
संततीकामनेस्तव देखा[1] । याग करितां पुत्रेष्टी[2] ॥ १५ ॥
शक्त्यनुसार[1] सामग्रीसीं । साह्य जाले देवऋषी ।
शक्रें पर्वतातुल्य[2] रासी । समिधांचिया आणिल्या ॥ १६ ॥
देखोनि अंगुष्ठप्राय[1] ऋषी । साठी[2] सहस्र वैखानसीं ।
वितिमात्र[3] येकीं सायासीं । पालाशसमिधा तोडिल्या[4] ॥ १७ ॥
खांदीं वाउनि[1] समस्तीं । शनैः शनैः आणितां पंथीं ।
गोष्पद्प्राय[2] आपांपति[3] । तैसा पुढें[4] भासला ॥ १८ ॥
पाय[1] निसरोनि अवचितें । आवघे पडले[2] त्या आंतौतें ।
चुबकळ्या[3] खातां[4] येकमेकांतें । काकुळती[5] झोंबती ॥ १९ ॥
हें देखोनि तये काळीं । इंद्र हांसे[1] पिटूनि[2] टाळी ।
ह्मणे[3] पाहा[4] हो[5] गोष्पद्जळीं । ब्राह्मण कैसे बुडाले ॥ २० ॥

---

१४. १ जिहीं औं ; २ वालखिल्य नि मुं , वालखिलें नां पु तं , वालखिलीं औं ; ३ (–) औं पु ; ४–५ तेव्हां गो॰२ ; ५ तां धु , तुवां औं पु ; ५–६ कौतुकें ख.

१५. १ जो कां औं ; २ पुत्रेंसीं पु.

१६. १ भक्तिसार औं , भक्तिनेसार पु ; २ पर्वततुल्य नि.

१७. १ अंगुष्ठप्रमाण मुं ; २ साठी नि मुं ; ३ वितस्तिमात्र नि , विथीमात्र गो , विधिमात्र गो२ ; ४ तोडिली नि रा औं पु.

१८. १ वाहूनि नि नां ; २ गोष्पदजळ रा गो॰२ , गोस्पद्येक धु , गोष्पद् नां तं ; ३ अपांपती नि ख मुं ( स प्रसंप्रा ) ; ४ तयां औं.

१९. १ पाये पु॰४ धु ; २ पडिले नि खवर्ग ; ३ बुचकळ्या नि ख औं पु ; ४ खात नि ख पु॰४ मुं ; ५ कवळुनियां नि.

२०. १–२ हांसोनि पिटि ख मुं औं पु ; ३ (–) खवर्ग ; ३–५ पहा चोज नि.

ऐसे जीव जे देखती[१] । तयांसि हांसावयाचे अर्थी[२] ।
ब्रह्में[३] निर्मिलें[४] निश्चिती[५] । विनोदार्थ जगातें ॥ २१ ॥
परी[१] धांवोनि[२] आपुल्या[३] हातें[४] । कडे[५] न[६] काढीच[७] तयांतें[८] ।
ते वेळीं[९] ते[१०] महाविष्णूतें । बोभाइलें[११] आकांतीं ॥ २२ ॥
तये संकटीं जगदीश्वरु[१] । संसारक्लेशाब्धीचें[२] तारूं ।
त्वरें पावोनि कमळावरू[३] । तारक जाला तयांतें ॥ २३ ॥
इंद्रें हांसोनि[१] उपहासिलें । तेणें मानसीं संतापलें[२] ।
मग तेथेंचि बैसोनि[३] करिते जाले । तपश्चर्या अत्युग्र[४] ॥ २४ ॥
इंद्रासि हारी आणी युद्धीं । बळें आगळा ऐश्वर्यनिधि ।
ऐसा निर्मूं[१] इंद्रपदीं । दुसरा इंद्र अविलंबें ॥ २५ ॥
देखोनि ऋषींचें[१] निर्वाण । इंद्र धाकें कंपायमान ।
कश्यपासी जाऊनि शरण । रक्षीं रक्षीं ह्मणतसे ॥ २६ ॥
कुमर[१] घालूनियां पाठीं । कश्यप आला तपियां[२] निकटीं ।
ह्मणे मजवरी ठेवूनि[३] दृष्टी । कोप सांडा सात्विक हो ॥ २७ ॥

---

२१. १ देखीजती औं ; २ आर्ती ख पु·४ नां औं गो·२ ; ३ ब्रह्मयानें नि ख पु४ , ब्रह्मेने धु नां , ब्रह्मेन गो·२ , ब्राह्मण पु ; ४ नेमिलें पु तं ; ५ निश्चितीं गो·२.

२२. १ येरी ख ; १–४ ऐसें बोले कारुण्यातें धु तं ; ३–४ आपुलां हातीं गो·२ ; ५ कोणी नि ; ५–८ कडे काढिना तया ऋषितें ख , परि धांवोनि न काढी तयांतें धु तं ; ९ काळीं औं पु ; १० (–) नि मुं औं पु गो·२ ; ११ बोभाविलें नि.

२३. १ जगदेश्वरू ख पु·४ मुं नां गो२ ; २ जो संसार° नि मुं ; ३ कमलाकरु तं.

२४. १ पाहोनि औं पु ; २ आसंतोषले पु४ ; ३ (–) नि खवर्ग ; ४ अति उग्र धु तं.

२५. १ निर्मूनि ख औं पु गो२.

२६. १ इंद्राचेवरी मुं.

२७. १ कुमार नि धु ; २ तयां नि ख मुं नां पु, तपस्वियां धु तं , ऋषि औं ; ३ देऊनि नां रा.

योग्य जाणोनि इंद्रपदीं । त्यातें[1] स्थापूनि गेला विधि ।
तुह्मीं धरोनि विषादबुद्धी । विपरीत करूं पाहतसां ॥ २८ ॥
तरी तुमचा काम[1] पावे[2] सिद्धी । इंद्र न चळे इंद्रपदीं ।
ऐसी मी येक[3] सांगेन बुद्धी । ते तुह्मीं[4] कृपेनें अनुष्ठा ॥ २९ ॥
न करूनि[1] त्रिदशांचा इंद्र । तपें[2] निर्मावा[3] पतगेंद्र[4] ।
वीर्यशौर्यबळसमुद्र[5] । इंद्राहूनि[6] आगळा ॥ ३० ॥
ऐसें कश्यप भगवान ऋषि । प्रार्थोनि मागुनी[1] घेतां[2] त्यांसी ।
वालखिल्य सुखसंतोषीं । वर वोपिते जाहले ॥ ३१ ॥
ह्मणती सहज तूं पुत्रकामार्थी । आमुच्या तपाचें फळ घे हातीं[1] ।
जो[2] मनोरथ[3] तुझ्या[4] चित्तीं । तोचि पावो सिद्धीतें ॥ ३२ ॥
तेणें वरें गरुडनिधान । विनतागर्भशुक्तिके[1] रत्न ।
निपजलें[2] पुढां जालें कथन । तें[3] तुह्मीं मागां[4] परिसिलें ॥ ३३ ॥
असो[1] तो गरुड महाबळी । स्वर्गीं प्रवेशे[2] तये[3] काळीं[4] ।
पक्षवाताचिये धूळीं । मंदाकिनी डहुळत[5] ॥ ३४ ॥

---

२८. १ त्यांतें नि , यातें ख पु४ मुं नां रा.

२९ १ कोप औं पु ; २ पावो पु४ नां औं ; ३ (–) ख नां औं धु पु ; ४ (–) नि नां औं.

३०. १ (+) त्याग नि , कारिं औं पु ; २–३ नमांवा तेथें पु४ , निर्मावा तपें नि , निर्मावा पैं औं ; ४ तपेंद्र ख , नगेंद्र मुं , पक्षेंद्र औं पु ; ५ वीर्यबळें जैसा समुद्र मुं , वीर्यें शौर्यें बळें प्रसिद्ध औं पु ; ६ इंद्रापरीस औं.

३१. १–२ मांगे निघतां पु४ , मागों निघतां तं , मागोनि घे पु ; मागुनी गो·२.

३२. १ हस्तीं नि ; २–३ जे कामना औं ; ४ तुमच्या ख पु , तुमचा ( चां ) पु४ , तुह्मां गो·२ , तुझा ( ह्मां ) रा धु औं.

३३. १ विनतागर्भशुक्तिका नि ख पु४ गो·२ ; २ निफजलें औं पु ; ३ मागां नि मुं ; ४ तें नि , (–) मुं , सांग नां.

३४. १ ऐसा धु गो·२ ; २ प्रवेशला धु तं , प्रवेशोनि पु ; २–३ प्रवेशलिये पु४ ; ४ वेळीं पु ; ५ डहुळीत नि.

तें जाणवलें[१] समस्त[२] सुरां । आला ह्मणोनि[३] हातियेरा[४] ।
हातवसोनि[५] येरयेरां[६] । धीरशब्द[७] वोपिती ॥ ३५ ॥
तवं सहस्र दिनकरांचा मेळ । कीं[१] उदेला[२] प्रळयानळ[३] ।
पक्ष भोंवडितां[४] भूगोळ । चक्रीं पडे[५] गरगरां ॥ ३६ ॥
नखें देखोनि सणाणी[१] । सुरांचे शस्त्रीं पाझरे पाणी ।
येक[२] वज्रा आणिया[३] दोन्ही । तैसी[४] चंचू[५] समसमीत ॥ ३७ ॥
देखोनि सुरांचिया थाटी । करिते[१] जाले[२] शस्त्रवृष्टि ।
गर्जनेच्या[३] अतिबोभाटीं । गगन घुमों लागलें ॥ ३८ ॥
तडक भिंडिमाळागुंडे[१] । चक्रें नाराच[२] लोहखांडें[३] ।
भाले त्रिशूळ इडपाडें[४] । घे घे ह्मणौनि टाकिती ॥ ३९ ॥
हें देखोनि प्रळयरुद्र । क्रोधें[१] खवळला विहगेंद्र[२] ।
ह्मणे देव हो तुमचा इंद्र । जरी पातला विबुधेंसी[३] ॥ ४० ॥
अथवा साठी[१] सहस्र गणीं । युद्धा[२] आलिया[३] पिनाकपाणी[४] ।
नातरी[५] वैकुंठ सांडूनि । मधुसूदन पातलिया[६] ॥ ४१ ॥

---

३५. १ **जाणवेल** पु४ ; १–२ **समस्त जाणवलें** नि खवर्ग ( औं प्रसंप्रा ); ३–४ **ह्मणती महावीरां** औं पु ; ५ **हातीं वसवोनि** नि ख , **हातीं वसोनि** पु , **हातवसवुनी** नां तं , **हातवसुनी** धु रा ; ६ **हातियेरा** औं पु ; ७ **°शब्दें** नि पु४ औं गो·२ तं.

३६. १ (–) औं पु ; २ (+) **देखोनि** औं पु ; ३ **प्रळयकाळ** मुं ; ४ **भवंडितां** नि ख मुं पु४ गो·२ ; ५ **भ्रमे** औं.

३७. १ **नयनीं** औं ; २ **एका** नि खवर्ग ; ३ **अणिया** नि मुं ( स प्रसंप्रा ); ४ **तैसे** नि औं पु गो·२ ; ५ **चुंचु** मुं नां औं.

३८. १–२ **करित्या जाल्या** धु ; ३ **गर्जोनि** औं पु.

३९. १ **भिंडमाळा°** औं गो·२ धु , **भिंडिमाळ°** रा ; २ **नाराचें** पु·४ नां ; ३ **लोहखंडें** नि रा तं , **लोखंडें** नां गो·२ ; ४ **इडेंपाडें** नि पु·४ औं मुं गो २.

४०. १ **कोपें** नि खवर्ग ; २ **पक्षींद्र** औं पु ; ३ **विबुधांशीं** नि.

४१. १ **साठ** नि ; २ **युध्या** पु·४ धु नां ; ३ **आला** नि , **आलियां** ख पु४ नां , **आलेया** गो·२ ; ४ **शूळपाणी** ख ; ५ **जरी** नां ; ६ **पातला** नि नां गो२ , **पातलियां** धु तं.

तऱ्हीं[१] कश्यपाचा कुमर । मागां न सरे खगेश्वर ।
ऐसा जाणोनि निर्धार । हांव सांडा[२] जुझाची[३] ॥ ४२ ॥
हरिहर तोषवुनी युद्धीं । आपुलें काज नेईन[१] सिद्धी ।
गर्वा चढेल[२] जो[३] दुर्बुद्धी । तो पावेल[४] क्लेशातें ॥ ४३ ॥
ऐसें[१] गर्जोनि[२] येकसरीं । झेंप घातली[३] निर्जरभारीं[४] ।
जैसा युगांतीं[५] त्रिपुरारी । क्षोभे विश्व नाशावया[६] ॥ ४४ ॥
पक्ष[१] पिटोनियां धरणी । मृत्तिका भरली सुरलोचनीं[२] ।
रजें आच्छादिला तरणी । कोण्हा कोण्ही न देखे ॥ ४५ ॥
पांसुनिबिडाचिये[१] रातीं । येरयेरांवरी[२] आदळती ।
शस्त्रें सांडूनियां[३] हातीं[४] । अनिमिष[५] दृष्टी[६] झांकिती[७] ॥ ४६ ॥
ते[१] अवस्वरीं[२] सहस्रनयन[३] । आज्ञापूनि[४] पाठवी[५] पवन ।
मेघ पाडूनि रजःकण । शांत[६] सीघ्र[७] करावया[८] ॥ ४७ ॥

---

४२. १ **तरी** नि ख मुं औं रा गो·२ ; २ **सांडी** ख मुं ; ३ **युद्धाची** नि ख मुं औं , **युध्याची** पु·४ नां.

४३. १ **नेइजे** धु ; २ **चढला** नि औं पु गो·२ , **पासोनि** पु४ ; ३ **तो** पु४ गो रा ; ४ **पाववीन** औं. ( पु ३/२ ).

४४. १-२ **ऐसी गर्जना** औं पु ; ३ **घाली** नां औं ; ४ **निजनिर्धारीं** धु तं ; ५ **प्रळयांतीं** धु तं ; ६ **जाळावया** गो२.

४५. १ **पक्षें** औं पु ; २ **सुरांच्या नयनीं** औं धु , **सुरा नयनीं** तं. पु४ मध्यें ही ओवी नाहीं.

४६. १ **पक्ष निबिडाचिया** नि , **पक्ष निबि°** ख मुं ना , **पाक्षि निबि°** पु४ , **पांशनिबि°** रा गो·२ , **पासनिबि°** धु , **पडली निबिडता** औं पु ; २ **येरयेरां वीर** धु तं ; ३ **सोडुनि** पु४ गो२ , **सांडुनि** औं ; ४ **उभय हातीं** औं ; ५-७ **झांकिती नेत्र अनिमिष्यें** मुं , **लोचनांतें झांकिलें** औं ; ६ **नेत्र** नि ; ६-७ **झांकिती** ख पु४ , **झांकिती लोचन** नां , **झांकिती दृष्टीतें** गो·२.

४७. १ (–) मुं ; २ **अवसरीं** नि पु४ रा नां , **अवेश्वरीं** गो·२ ; ३ **सहस्रलोचन** पु , **°नयेनें** पु४ ; ४ **आज्ञां पुसोनि** पु४ ; ५ **पातले** पु४ ; ६ **शांति** औं ख पु गो२ ; ७-८ **लागीं पावावया** औं , **करावे पैं सीघ्र** मुं.

आज्ञेनें[१] मुसळप्राय[२] सैरा। मेघीं[३] मोकळिल्या जळधारा[४]।
विद्युत्प्राय[५] अतिभेदरा। पक्षेंद्रातें[६] दाविती ॥ ४८ ॥
मेघीं भंगिलियां[१] धुळोरा[२]। देखते जाले येरयेरां।
परजूनियां[३] हातियेरां। पुढतीं मारूं लागले ॥ ४९ ॥
दशघ्नी शतघ्नी सहस्रघ्नी। शस्त्रास्त्रांच्या प्रहरणीं।
तीक्ष्ण[१] धारांच्या[२] खणाणीं[३]। वन्ही वर्षों लागला ॥ ५० ॥
येक ह्मणती जितचि[१] धरा। येक ह्मणती शतखंड करा।
येक ह्मणती जाला पुरा। वज्रधारें[२] गिरी जैसा ॥ ५१ ॥
येक ह्मणती लघुलाघवें। वरुणपासीं[१] चरणग्रीवे।
गोंवुनी पांजिरां[२] रक्षावें। कौतुकार्थ पाखिरूं[३] ॥ ५२ ॥
परिसोनि देवांची वल्गना। गरुड मिसळला[१] रणकंदना[२]।
पक्षवातावर्तीं[३] जाणा। असंख्यात गोंविले ॥ ५३ ॥
येक ऊर्ध्व उडविले गगनीं। येक टाकिले समुद्रजीवनीं।
येक व्योमींहुनी[१] धरणीं। पडती उठती पुनःपुन्हा[२] ॥ ५४ ॥

---

४८. १ (–) औं, **आज्ञेन** गो॰२; २ **मुसळ अमोघ** औं; ३ **मेघें** ख, **मेघेन** गो; ४ **धारा** धु तं; ५ **विद्युत्पातें** नि मुं नां, **विद्युत्पात** औं पु, **विद्युत्प्रायें** ख; ६ **पक्षींद्रातें** नि नां गो. ३ व ४ चरण धु व तं मध्यें नाहींत.

४९. १ **भंगिला** नि रा औं पु; २ **धुरोळा** नि रा मुं; ३ **परतोनियां** नि पु. धु मध्यें १ व ३ आणि तं मध्यें १ चरण गहाळ.

५०. १ **तीक्ष्णतीक्ष्ण** नि, **तिक्षण** धु तं नां; २ **बाणांचा (चां)** तं धु; ३ **खणाखणीं** तं.

५१. १ **धरा** औं पु; २ **वज्रघातें** औं पु तं धु सोडून इतर, **वज्रधारा** औं, **वज्रधारीं** पु.

५२. १ °**पाशीं** नि मुं औं पु तं; २ **पिंजरीं** नि, **पीजिरा** ख गो, **पांजरां** औं मुं, **पांजरा** पु४ रा धु, **पांजिरा** गो२ पु; ३ **पखारूं** नि मुं.

५३. १ **उसळला** पु४, **मिनला** गो; २ **युध्यकंदना** नां गो; ३ °**पातावर्तीं** पु४.

५४. १ **व्योमाहुनी** धु तं; २ **पुनः पुनः** नि, **पुनः पुनाः** रा गो२.

लागतां[1] नखांचा चपेट । शस्त्रास्त्रें[2] होती पीठ[3] ।
चंचु हाणतां[4] रागीट । चूर्ण होती मस्तकें ॥ ५५ ॥
निर्जरांचीं दिव्य शरीरें । चंडघाई[1] शतजर्जरें ।
प्रबळ[2] रुधिराचेनि पूरें । देवगंगा माजली[3] ॥ ५६ ॥
हस्त पाद अंगोलिका । खंडिती[1] जैशा पादपशाखा ।
केश श्मश्रु लुंचुनि[2] देखा । क्षपणिक तैसे[3] भासती[4] ॥ ५७ ॥
गरुडमाराचिये[1] नेटीं[2] । कोण्हा[3] धैर्य न धरवे[4] पोटीं ।
अमरगणीं देउनी[5] पाठी[6] । पळते जाले सत्वर[7] ॥ ५८ ॥
साध्यादिक[1] सगंधर्व[2] । पूर्वे[3] उजू[4] पळाले सर्व ।
धाकें रुद्र[5] आणि[6] वसव । दक्षणादिशा लंघिती ॥ ५९ ॥
आदित्य पळाले पश्चिमे[1] । अश्विनौदेव[2] धांवती सौम्ये[3] ।
ह्मणती प्रळयविहंगमें[4] । देवसृष्टि आटिली ॥ ६० ॥
अश्वक्रंदन रेणुक्रथन । तपन उलूक निमेषण ।
पुरुजेनादि देवगण । येकें येक पळाले ॥ ६१ ॥

---

५५. १ **लागती** पु४ ; २ **शास्त्रें अस्त्रें** नि ख पु४ मुं नां रा ; ३ **पीष्ट** धु तं , **कुट** रा ; ४ **हाणितां** नि ख पु४ मुं गो·२ तं.

५६. १ °**घाये** नि , °**घातें** गो२ , **चंडनखीं** औं ; २ **प्रळय** ख मुं औं गो२ पु ; ३ **मातली** तं , **लोटिली** ख.

५७. १ **खंडित** नि , **खंडती** पु·४ तं ; २ **लुंचतां** नि , **लुंचने** ख पु४ रा , **लुंपने** तं , **लोचन** गो·२ ; ३ **जैसे** औं पु गो ; ४ **दिसती** मुं. धु मध्यें ही ओवी नाहीं.

५८. १ °**मारावया** धु तं ; २ **हटीं** धु तं ; ३ **कोणा** नि मुं गो·२ पु ; ४ **धरे** औं नां , **नुपजे** धु ; ५ **देखोनि** नि ; ६ **पाठीं** नि ; ७ **सत्वरा** नि.

५९. १ **सिद्ध साध्या**° नि , **साध्यादि** औं ; २ **गंधर्व** नि , **गणगंधर्व** औं , **सहगंधर्व** धु ; ३ (–) धु तं , **पूर्व** रा ; ४ **उज** स ; ५–६ **रुद्रादि** औं.

६०. १ **पश्चमे** ख धु तं ; २ **आश्विनी**° नि , **आश्विनो**° मुं ख गो ; ३ **क्रमें** मुं ; ४ **प्रळयीं विहं**° गो·२.

ऐसें देखोनि[1] अद्भुत । क्रोधें[2] खवळला यम[3] कृतांत[4] ।
दंड पडताळूनि त्वरित । गरुडाउजू[5] धांविनला[6] ॥ ६२ ॥
जेणें काळदंडें[1] भीम । जगाचे[2] प्राण दंडी यम ।
तेणें ताडितां विहंगम[3] । चोज कैसें वर्तलें ॥ ६३ ॥
दंड झेलूनि[1] जयपाणी[2] । नवनीतप्राय गिळिला वदनीं ।
ह्मणे[3] रे[4] विष्णुकिंकरा स्वर्मीं । यमबाधा असेना ॥ ६४ ॥
आतां पाहें[1] जगहिंसका । निर्दयानिष्ठुरजीवकंटका[2] ।
तुझिया छेदूनि मस्तका । अमर करीन विश्वातें ॥ ६५ ॥
म्हणोनि[1] धांविनला रागें । यम सवितयाआड रिघे[2] ।
सूर्यसारथियातें सांगे । निर्वाणवेळा[3] सांभाळीं ॥ ६६ ॥
अरुण ह्मणे अगा अनुजा । माझिया स्वामीचिया आत्मजा ।
कृपेनें[1] रक्षीं पवित्रद्विजा । ऐकोनि[2] गरुडें[3] सोडिला[4] ॥ ६७ ॥
पुढें त्रिगुणत्रिशूळधारी[1] । हरें ताडिला[2] लक्षूनि[3] दुरी ।
विवेक साधकें[4] सुविचारीं । सावधानें[5] चुकविला[6] ॥ ६८ ॥

---

६२. १ ऐकोनि गो२ ; २ कोपें नि खवर्ग (यम ख) ; ३ (–) नि खवर्ग (पु·४ प्रसंप्रा) ; ४ कुदांत नां तं, कृदांत धु ; ५ °उजूं स तं ; ५–६ धांविनला गरुडावरी औं, धांविनला गरुडाप्रती पु.

६३. १ °दंड ख नां तं, काळेंदंड धु ; २ विश्वाचे धु तं ; ३ विहंगोत्तम मुं.

६४. १ भेदुनी मुं ; २ विजयपाणी नि ; ३–४ ह्मणौनि औं ; ४ (–) पु.

६५. १ पेकें औं पु ; २ निर्दयनिर्जीवकंटका मुं, °जीवकीटका ख गो तं, °जगकंटक पु४.

६६. १ ह्मणऊनि नि ख ; २ निघे नि तं ; ३ हीणवेळा गो·२.

६७. १ कृपेन गो·२ ; २ कृपेनें पु४ नां, मग तो मुं, ऐकतां नि ; २–४ गरुडें कृपेनें सांडिला ख, गरुडें सोडिला उपेक्षुनी औं ; ४ सोडिलें धु.

६८. १ °धारीं ख ; २ ताडूनि मुं, ताडितां रा तं, सोडिला पु ; ३ लक्षिला मुं, देखोनि नां ; ४ (–) पु४, साधकां मुं, साधन औं, साधनें पु, साधक गो२ ; ५ सावधान पु४ नां ; ६ चुकविलें मुं.

कौतुकें[1] झेलित[2] धैर्यगती । निस्तेज करूनि वोपितां[3] हातीं ।
आश्चिर्य[4] मानी[5] गिरिजापति । बळ अद्भुत देखोनि[6] ॥ ६९ ॥
हांसोनि ह्मणे[1] खगनायका[2] । तुझेनि पावलों परमसुखा[3] ।
वरद[4] वदोनि[5] मग[6] कौतुका[7] । पाहों ठेला निराळीं[8] ॥ ७० ॥
आशावरुणपाशीं[1] वरुण[2] । दंभाचारें गोवितां चरण ।
निर्लोभतेचे[3] नखीं[4] जाण । शतखंड[5] केला[6] साधकें ॥ ७१ ॥
विष्णुस्मरण जयाचे वदनीं । तयातें बाधूं[1] न सके[2] कोण्ही ।
ऐसा निश्चयो करूनि गगनीं[3] । निवांत[4] ठेले[5] समस्त ॥ ७२ ॥
वीजु[1] चामके[2] जेणें[3] पाडें । तैसा गरुड झेंपावे पुढें ।
अमृत लक्षी[4] तवं धडाडें[5] । वन्ही धडके[6] सभोंवता[7] ॥ ७३ ॥
प्रळयीं पसरे[1] कृतांतवक्त्र[2] । तैसें परिधिज्वाळाचक्र[3] ।
गगनचुंबित अवक्र । मनासी[4] मार्ग[5] असेना[6] ॥ ७४ ॥

---

६९. १ **तो कौतुकें** नि ; २ **झेलूनि** नि , **झेलितां** धु ; ३ **वोवितां** पु४ , **वोपी** मुं ; ४ **आश्चर्य** नि मुं गो२ ; ५ **मानुनी** नि मुं , **करुनी** नां ; ६ **देखिलें** मुं.

७०. १ **बोले** नि खवर्ग ( ख प्रसंप्रा ) ; २ °**नायक** पु॰४ नां औं ; ३ °**सुख** पु॰४ नां औं ; ४ **वर** नि खवर्ग ( पु॰४ प्रसंप्रा , **आश्चिर्य** नां ) ; ५ **देखोनि** नां ; ६ ( – ) नां धु ; ७ **त्र्यंबक** नां , **कौतुक** पु॰४ औं तं ; ८ **निराळा** नि खवर्ग.

७१. १ **ऐसा वरुणपाशीं** नि , **अशावरुण**° तं , **आशापाश** औं धु , **आशापाशीं** मुं ; १–२ **आशावरणपाशावरण** पु ; २ **वरुणें** पु४ धु ; ३ **निर्लोभतेचा ( चां )** औं पु ; ४ **नखें** ख नां गो२ ; ५ °**खंडें** मुं ; ६ **केले** नि खवर्ग ( **केलीं** मुं ).

७२. १ **बांधूं** नि गो२ ; २ **शके** नि खवर्ग ( नां प्रसंप्रा ) गो२ ; ३ **मनीं** गो , ( – ) मुं ; ४–५ **निर्वाण केलें** पु४.

७३. १ **वीज** नि मुं ; २ **चमके** नि खवर्ग ( पु॰४ प्रसंप्रा ) ; ३ **जाणे** पु४ , **येणें** नां ; ४ **वेष्टित** नां , **लक्षित** गो ; ५ **धडाडे** नि खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) , **काडाडे** नां , **झडाडे** गो॰२ ; ६ **लक्षी** पु४ ; ७ **सभोंवतां** तं.

७४. १ **प्रसवे** औं , **पसरी** मुं; २ **कृदांतवक्त्र** नां , **पावकवक्त्र** गो२ ; ३ **परिज्वाळा**° ख गो ; ४–६ **अग्नि धडके सभोंवतां** मुं.

हें[१] देखोनि गरुडोत्तमें[२] । बुद्धि[३] योजिली[४] मनोधर्मे[५] ।
सुधावरोधी[६] पावक शमे । ऐसा करूं उपावो[७] ॥ ७५ ॥
शरीरीं करूनि अनंतवदनें[१] । भरिलीं अनंतनदींचीं[२] जीवनें[३] ।
तेणें सिंपितां प्रळयघनें[४] । जेविं[५] शमिजे[६] प्रळयाग्नि[७] ॥ ७६ ॥
यापरी अनळ[१] करूनि[२] शांत । पुढां संचरे[३] भेदित[४] पंथ ।
तवं देखिलें अत्यद्भुत । जें[५] कां असाध्य प्रयत्नीं ॥ ७७ ॥
सुधावापिकेचें वक्त्र[१] । त्यावरी[२] भोंवे[३] कर्तरीयंत्र ।
जैसें कुंभकाराचें[४] चक्र । सहस्रधारा[५] धगधगी[६] ॥ ७८ ॥
ज्याचें[१] होतांचि संघटण[२] । सहस्रखंडें[३] आते[४] पवन ।
तीक्ष्णतेच्या भयेंकरून । वन्ही काष्ठीं लपाला[५] ॥ ७९ ॥
त्याची[१] चुकवूनियां भवंडी[२] । यंत्रधारेचिये[३] सवडी ।
माजी संचरला तांतडी । सूक्ष्म देह धरूनियां ॥ ८० ॥

---

७५. १ तें ख ; २ द्विजोत्तमें धु तं ; ३ बुधी धु ; ३–४ बंधीयोजनी पु४ ; ५ स्वधर्मे धु तं ; ६ सुधाविरोधी ख ; ७ उपाव नि मुं. औं व पु मध्यें ही ओवी नाहीं.

७६. १ आनंदघन औं , अनंदवदन पु ; २ °नद्यांचीं नि , °सरितांचीं धु तं ; ३ जीवन पु ; ४ °घन ख नां रा पु , प्रळयाग्न औं ; ५–६ शांत जाला नि खवर्ग ; ६ शामविजे रा गो , शमे जीव तं ; ७ क्षणार्धे औं. गो२ मध्यें ही ओवी नाहीं.

७७. १–२ करोनि अनळ नि खवर्ग ; ३ चामके ख ; ४ भेदोनि गो२ , वेधित पु४ ; ५ जो औं पु.

७८. १ वस्त्र मुं , चक्र नां ; २ तीवरी नां , त्यापें धु ; २–३ त्यास भोवें तं ; ३ भंवे ख औं पु गो२ रा ; ४ कुंभकार पु४ नां गो , कुल्लाळाचें मुं , कुंभाराचें औं ; ५ °धार धु तं ; ६ झगझगी नि खवर्ग ( झगमगी मुं ).

७९. १ त्याचें गो२ ; २ संघट्टण नि ख मुं ; ३ °खंड नि , सहस्रधारा पु , सहस्रधा औं ; ४ होतो नि , आंत ख पु४ , आत पु , आंते गो२ ; ५ लागला ख.

८०. १ त्यातें पु४ , यातें तं ; २ भुवंडी ख , भंवडी पु४ तं ; ३ चक्रधारेचिया नि , चक्रधारे° खवर्ग ( चक्रधारा° औं पु ).

चक्र भ्रमत[१] असतां वेगीं । यंत्रमुखें पैलिये[२] भागीं[३] ।
रिघता[४] जाला जैसा योगी । ब्रह्मरंध्रीं[५] प्रवेशे ॥ ८१ ॥
पुढें पाहे अमृता[१] निकटीं । वेढे[२] घातले महाकर्कोटीं[३] ।
जो जीव पडे[४] त्याचिये दृष्टी । तो भस्म होय क्षणार्धें ॥ ८२ ॥
तेथें अदृश्य होऊनि[१] आपण । पांखीं[२] भरिले[३] मृत्तिकाकण ।
उधळोनि सर्पांचे लोचन । अंध केले निःशेष[४] ॥ ८३ ॥
मुखीं आणि[१] नासिकीं[२] नयनीं । व्याळ निबुजले रजकणीं[३] ।
कुंडाआंतौता[४] उतरोनी । अमृत माथां वंदिलें ॥ ८४ ॥
रौप्यकळसीं पवित्रसुधा[१] । संपूर्ण[२] भरिली[३] मुखमर्यादा[४] ।
वदनीं[५] झांकिलें अरविंदा[६] । कनकाचिया हस्तकीं[७] ॥ ८५ ॥
यंत्रमूळीं[१] नख[२] खुदले[३] । चक्र उपडोनि[४] पैं[५] सांडिलें ।
मनोवेगाहूनि वहिलें । अमृत घेऊनि उडाला ॥ ८६ ॥
गर्जना करीत जयजयकारें । गगनमंडळीं घालीत[१] फेरे ।
ह्मणे देव हो बळिष्ठ वीरें । सीघ्र[२] यावें संग्रामा ॥ ८७ ॥

---

८१. १ **भंवता** धु ख , **भंवत** औं पु तं ; २–३ **पैलभागीं** नि ख मुं पु४ ; ४ **निघता** नि , **जाता** धु तं ; ५ °**रंध्र** नि.

८२. १ **अमृत** नि ख मुं औं रा गो पु ; २ **तवं वेढे** ख गो·२ ; ३ **कर्कोटीं** मुं औं ; ४ **पणें** नि.

८३. १ **होय** ख धु ; २ **पंखीं** नि ; ३ **भरले** नि ख पु४ मुं , **भरिली** औं पु ; ४ **निःशेषें** तं.

८४. १ (–) मुं औं पु ; २ **नाकीं** नि ; ३ **रजःकर्णीं** नि , **अंकर्णी** तं ; ४ °**आंतौति** नि , °**आंत** मुं.

८५. १ **पवित्रशुद्ध** औं पु ; २ **सुपर्णें** तं ; ३ **भरिलें** औं पु तं , **भरली** नि पु४ मुं नां ; ४ °**मर्याद** औं पु ; ५ **मुखीं** गो ; ६ **अरविंद** औं पु ; ७ **हस्तकें** नि खवर्ग.

८६. १ **यंत्रमुखीं** मुं नां गो·२ ; १–३ **यंत्रमुखिहूनि उसळले** औं ; ४ **उपटोनि** नि ; ५ (–) नि खवर्ग.

८७. १ **घाली** धु गो२ ; २ **त्वरेंसिं** औं.

अद्भुत कर्म[१] देखोनि नयनीं । सन्मुख पातला सारंगपाणी[२] ।
माईक क्रोध अवलंबुनी । चक्र वेगीं मोकळिलें ॥ ८८ ॥
येतयेतां सुदर्शन । गरुडें गिळिलें पसरूनि[१] वदन ।
हृदयस्थाच्या[२] हार्ती जाण । भूषणार्थ वोपिलें ॥ ८९ ॥
विष्णु ह्मणे भला रे भला । प्रसन्न जालों माग[१] वहिला ।
अमृतप्राशनेंवीण[२] केला । देह तुझा अक्षयी ॥ ९० ॥
गरुड ह्मणे[१] कमळापति । वर[२] मागें कां[३] मजप्रती ।
देव[४] ह्मणे अवश्य हार्ती । भाष्य[५] वोपीं उदारा ॥ ९१ ॥
गरुडें[१] देतां भाष्यप्रमाण[२] । हरि ह्मणे होई[३] माझें वहन[४] ।
दास्यधर्में[५] पाळुनि वचन । ध्वजस्तंभीं[६] राहावें ॥ ९२ ॥
गरुड ह्मणे समर्थबोलें[१] । हो तैसेंचि[२] अंगिकारिलें ।
भावें[३] येऊनि[४] वंदिलें[५] । पादांबुज[६] विष्णूचें[७] ॥ ९३ ॥
तवं इंद्रातें पावली हाक । गरुड घेऊनि गेला पीयूख[१] ।
आड[२] धाविनला सरोख[३] । नागारूढ नगवैरी ॥ ९४ ॥

---

८८. १ ( – ) पु४ धु ; २ **शार्ङ्ग°** नि तं.

८९. १ **लावोनि** गो२ ; २ **हृदयस्थाचा ( चां )** औं पु४ नां , **हृदय-स्ताचा** गो२.

९०. १ **मागें** धु तं ; २ **°प्राशना°** नि धु मुं पु४.

९१. १ ( + ) **गा** गो·२ ; २ **तूंचि वर** नि , **तूं वर** खवर्ग तं ; ३ ( – ) नि ख नां औं ; ४ **देवो** रा गो·२ ; ५ **भाक** नि औं पु , **भाष** मुं रा.

९२. १ **गरुड** नि पु नां ; २ **भाकप्रमाण** नि औं पु गो२ , **भाष्यदान** ख , **भाषणप्रमाण** धु , **भाष°** रा मुं पु४ ; ३ **हो** नि , **देई** पु४ , ( – ) मुं ; ४ **वाहन** नि गो·२ ; ५ **दासधर्में** धु तं ; ६ **ध्वजा°** औं पु धु.

९३. १ **हो समस्तबोलें** ख ; २ **तसेंतेचि** तं ; ३ **उभय** ख ; ४–५ **वंदित पाउलें** औं ; ६–७ **श्रीविष्णूचीं आवडी** औं.

९४. १ **पीयूष्य** ख , **पीयूष** पु·४ मुं नां रा गो·२ ; २ **आडवा** नि ; ३ **रोष** ख पु४ गो२ , **सरोष** मुं नां पु , **रोषें** गो.

वज्र सोडिलें सव्य हस्तीं[1] । तेजें जैसा तीव्र गभस्ती[2] ।
गरुडें[3] झेलूनि ह्मणे हे[4] अस्ती[5] । भंगूं नये ऋषीची ॥ ९५ ॥
मग शक्रातें ह्मणे वचनीं । माझें सामर्थ्य[1] पाहें[2] नयनीं ।
ह्मणोनि पक्षापासूनि धरणी । पर्ण येक सोडिलें ॥ ९६ ॥
तें कनकपाचूनिबद्ध[1] पत्र । ठसे उमटले चित्रविचित्र[2] ।
तेजें[3] सहस्रचक्षूचे[4] नेत्र । झांकोळले[5] सौंदर्यें[6] ॥ ९७ ॥
देखोनि हरि हर कमळासन । ह्मणती याचें नाम सुपर्ण[1] ।
ये[2] पर्णधारेतळीं[3] चूर्ण[4] । शत[5] होती[6] वज्राचीं[7] ॥ ९८ ॥
पृथ्वी सागरसहितगिरी[1] । येक[2] पक्षपर्णाचे[3] अग्रीं ।
ब्रह्मायुष्यवर्षेंवरी[4] । वाहों सके विसरणें[5] ॥ ९९ ॥
येवढी जयाची आंगवण । त्या[1] जुझोनि[2] वांचे कवण ।
यालागीं सख्य करूनि जाण । काज[3] सार्धी[4] सुरेशा[5] ॥ १०० ॥
ना गवे[1] देखोनि गृध्रराव़ो[2] । इंद्र इछि मित्रभावो[3] ।
ह्मणे गरुडा मजसीं स्नेहो[4] । वाढता करीं बंधुत्वें ॥ १०१ ॥

---

९५. १ हातीं धु तं, हस्तें औं ; २ अग्नितें औं ; ३ गरुड नि तं ; (–) नि खवर्ग तं ; ५ अस्थि नि ( स प्रसंप्रा ) रा, हस्ति गो॰२.

९६. १ कौतुक नि खवर्ग ; २ पाहें पां औं, पाहा कां धु.

९७. १ °पाचूंनि बंध नि ; २ विचित्र मुं, विचित्रविचित्र धु ; (–) नां, पाहातां धु, तेजेंतेजें तं ; ४ सहस्राक्षाचे औं, सहस्र तं ; झांकुळले नि ख पु४ ; ६ पैं तेणें औं.

९८. १ संपूर्ण नां ; २ हें नि, इये नां, हे गो२ ; ३ °धारतळीं नि, ारेतळीं औं, धारेतळें पु ; ४ शतखंडण औं ; ५ शतें नि पु४ मुं गो, ातखंड धु ; ५–६ होय चूर्ण औं ; ७ वज्राचें औं.

९९. १ सागर सहस्रगिरी नि, सप्तसागरगिरी औं ; २ (–) औं ; ३ पक्षाचे नां, पर्णाचे गो२ ; ४ °वर्षवरी धु पु नां, ब्रह्मेशादि ष्पापरी औं ; ५ अविश्रमें औं पु.

१००. १ तयासी नि खवर्ग ; २ झुंजोनि नि ; ३ कार्य नि खवर्ग ; –५ आपुलें साधावें पु४.

१०१. १ गवें औं ख पु४ गो२ तं ; २ °राव नि ( स प्रसंप्रा ) ; ३ °भाव ; ४ स्नेह नि.

आणि जे इच्छा असेल[1] मनीं । तो वर मागें मजलागुनी ।
माझे शत्रुमित्र[2] मानीं । शत्रुमित्र[2] आपुले ॥ १०२ ॥
गरुड ह्मणे हे[1] सहस्राक्ष[2] । सर्प होतु[3] कां[4] माझे भक्ष[5] ।
हा[6] वर वोपिल्या[7] मुक्ष[8] । मित्र माझा तूं येक ॥ १०३ ॥
विशेष[1] कश्यपाचा कुमर । होसी[2] वडील सहोदर[3] ।
दोघे खेचरांचे[4] इंद्र[5] । नामही येक दोघांचें[6] ॥ १०४ ॥
ह्मणोनि आह्मांतुह्मां[1] सहजें । मैत्री[2] योग्यता[3] समान साजे ।
आतां[4] काज[5] माझेनि[6] काजें । आपुलेंसें मानीं तूं ॥ १०५ ॥
शक्र ह्मणे अगा सखया । छत्तीस कुळें सर्पां[1] यया[2] ।
त्या माजी तूतें भक्षावया । सप्तविंशति वोपिलीं ॥ १०६ ॥
उरलीं[1] जन्मेजयाचे यज्ञीं । भस्म होतील[2] हुताशनीं ।
त्यांत[3] कांहीं आस्तिक मुनि । सुष्ट[4] ते[5] ते[6] रक्षील ॥ १०७ ॥
ऐसें[1] बोलोनि दोघीजणीं[2] । स्नेहें मीनले[3] आलिंगनीं ।
इंद्र ह्मणे[4] मग प्राथूंनी । वाक्य माझें अवधारीं ॥ १०८ ॥

---

१०२. १ (–) धु ; २ **शत्रु मित्र** नि.

१०३. १ (–) मुं धु पु ; २ **सहस्राक्षा** ख मुं धु गो ; ३ **होत** नि खवर्ग ( नां प्रसंप्रा ) तं ; ४ (–) औं गो ; ५ **भक्षा** धु गो ; ६ **हाचि** औं , (+) **एक** नि ख मुं नां गो२ रा ; ७ **वोपिल्यां** धु ; ८ **मुख्य** नि खवर्ग , **मुक्षा** धु , **मुख** तं.

१०४. १ **विशेषें** रा गो ; २ **होशील** नि गो ; ३ **सोहदर** रा धु ; ४–५ **खेचरभूचर** औं ; ६ **दोघांतें** रा धु.

१०५. १ **तुह्मांआह्मां** नि खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ) ; २–३ **मित्रभावो** औं ; ४–५ **आतांचेनि** औं ; ६ **माझिये** नि , **माझे** धु औं , **अपुलेनि** ख.

१०६. १ **सर्पांस** नि , **सर्पांचीं** औं पु गो ; २ **या** नि औं गो.

१०७. १ **उरले** नि खवर्ग ; २ **होती** पु४ ; ३ **त्यांतून** नि , **त्यांतें** ख नां ; ४ **श्रेष्ठ** नि मुं पु , **सुतंतू** नां ; ५–६ (–) नां , **ते तैं** तं , **ते** गो२.

१०८. १ **एवं** नि ; २ **दोघे°** नि ख , **°जणीं** पु , **दोघेजणीं** औं ; ३ **देऊनि** औं ; ४ **बोले** ख.

तुज काज नाहीं या[1] अमृतें । कृपेनें[2] उचित वोपीं मातें ।
गरुड ह्मणे तदर्थ चित्तें[3] । चिंता कांहीं न करीं[4] तूं[5] ॥ १०९ ॥
किंचित्कार्याचेनि[1] उद्देशें । अनुचिष्ट[2] सुधा मी[3] नेतसें[4] ।
वेंचों[5] नेदीं[6] हें[7] विश्वासें । वचन माझें मानीं तूं ॥ ११० ॥
हें सर्पांतें दावूनी[1] नयनीं[2] । ठेवीन पवित्र कुशस्थानीं[3] ।
तुवां हरावें[4] तेथुनी[5] । अदृश्यगती सत्वर ॥ १११ ॥
ऐसा संकेत सांगूनि[1] वहिला । सर्पसदनाप्रती पातला ।
अमृतकुंभ दाविता जाला । परम आल्हाद[2] सकळांतें[3] ॥ ११२ ॥
गरुड ह्मणे अशुचिपण[1] । असतां दुर्लभ[2] अमृतपान[3] ।
स्पर्श करील त्यापासून । अदृश्य होईल तात्काळीं[4] ॥ ११३ ॥
ह्मणोनि पवित्र गंगाजळीं । मंगळस्नानें[1] सारूनि[2] सकळीं ।
मग बैसोनि सुहृद्मेळीं । पीयूषपान करावें ॥ ११४ ॥
गंगातीरीं[1] स्थळ निर्दोष । कुशमंडळीं[2] अमृतकळश ।
ठेविता जाला पतंगाधीश[3] । दाऊनियां सर्पांतें ॥ ११५ ॥

---

१०९. १ (–) नि मुं रा गो औं पु , **हे** पु४ ; २ **कृपेन** गो·२ , **कृपें** औं ; **चीतें** धु पु४ नां ; ४–५ **करावी** मुं नां , **मनावी** औं.

११०. १ **किं मत्कार्या°** धु तं , **°त्कार्याच्या** नि औं पु , **°त्कार्याचे** मुं ; २ **अनुच्छिष्ट** नि , **अनुछिष्ट** नां तं ; ३–४ **मानीतसे** तं ; ५ **चवों** मुं , **चों** गो , **चेवों** गो२ ; ६ **नेदितां** खवर्ग ; ७ (–) ख औं पु.

१११. १–२ **वहिलें दानीं** धु , **दानीं वहिला नयनीं** तं ; ३ **कुशासनीं** नां , **कुंभस्थानीं** गो ; ४–५ **रहावें तेथ येउनी** औं पु.

११२. १ **दाउनि** ख औं पु गो ; २ **अद्भुत** मुं ; ३ **सर्पांतें** औं.

११३. १ **°पणें** पु४ गो , **अशौच्यपणें** धु तं ; २–३ **अमृत दुर्लभ कवण** ; ३ **अमृतकण** तं , **°पानें** पु४ ; ४ **तात्काळ** नि मुं नां.

११४. १ **°स्नान** ख पु तं ; २ **करूनि** ख नां गो·२ पु.

११५. १ **गंगास्थळीं** ख , **गंगातळीं** गो२ , **गंगातटीं** औं ; २ **कुशस्थळीं** ; ३ **पन्नगा°** ख , **खगा°** औं.

आजिपासोनि माझी जननी । दासित्व[१] दोषापासुनि[२] अरुणी[३] ।
साक्ष येथें[४] सूर्य धरणी । ऐसें[५] गर्जोनि[६] जाणवी[७] ॥ ११६ ॥
सर्पी[१] मानुनियां वचन[२] । त्वरें सारिती[३] संध्यास्नान[४] ।
लाऊनियां उभय नयन[५] । मंत्र जपती मानसीं ॥ ११७ ॥
ते संधी लक्षूनियां निरुती । इंद्रें[१] येऊनि अदृश्यगती ।
अमृत हरिलें कवणे रीती । प्राण[२] जैसा कृतांतें[३] ॥ ११८ ॥
नियम सारुनियां व्याळीं[१] । येऊनि पाहती कुशस्थळीं[२] ।
अमृत न देखोनि सकळीं । हाहाकार[३] माजविला[४] ॥ ११९ ॥
गरुडें ठकिलें[१] ठकिलें[२] पाहीं । आतां उपाय न चले कांहीं ।
अमृत ठेविलें ते[३] ठायीं । दर्भ जिह्वा[४] चाटिती ॥ १२० ॥
तिये[१] दर्भधारेकरुनी । चिरोनि[२] जिह्वा[३] जालिया दोन्ही ।
ते साक्षी[४] अद्यापिवरी[५] लोचनीं । लोक देखती प्रत्यक्ष ॥१२१॥
अमृतहाणिचेनि[१] दुःखें । दाहिलें[२] चिंतेचिया[३] पावकें ।
विनता पुष्टीं[४] वाहोनि[५] सुखें[६] । गरुड गेला स्वाश्रमा ॥ १२२ ॥

---

११६. १–३ मुक्त दास्यत्वदोषापासूनि नि खवर्ग ; ४ यथार्थ नि खवर्ग ; ५–७ गर्जोनि ऐसें जाणवी नि खवर्ग ; ७ जाणविलें धु तं.

११७. १ सर्प नि ( स प्रसंप्रा ) , सर्पें पु·४ ; २ वचना ख नां , वचनें पु४ ; ३ सारिलें ख , साधुनी औं , सारूनि नि नां पु ; ४ स्नानां ख नां ; ५ नयेनें पु४ , नयना ख नां.

११८. १ इंद्र नि पु·४ गो·२ नां मुं ; २ प्राणांत नां ; ३ कृदांतु नां.

११९. १ तत्काळीं औं ; २ कुंभस्थळीं गो ; ३ आहाःकार गो·२ , हाहाःकार नि ; ४ माजला गो·२ मुं.

१२०. १–२ आह्मां ठकविलें नि , आह्मां ठकिलें ख ; ३ जे मुं , तिये औं पु ; ४ जिव्हाग्रीं नि , जिव्हेनें मुं , जिव्हीं तं.

१२१. १ ते ख मुं ; २–३ जिह्वा चिरोनी औं पु ; ४ साक्ष नि ख मुं औं धु गो·२ ; ५ अद्यापि नि मुं औं गो.

१२२. १ °हराचेनि नि ख नां , °हरणाचेनि औं पु , हरिलियाचे पु४ ; २ दहिलें ख नां पु ४ रा गो२ , हरिलें मुं ; ३ चिंतेचेनि औं पु ; ४ पृष्टीं नि पु४ मुं रा तं ; ४–६ वाहोनियां पृष्टें ख.

सत्तावीस कुळें व्याळ । क्रोधें ग्रासिले[1] महाविशाळ ।
उरले[2] भयें पाताळबिळ[3] । भेदोनियां[4] पळाले ॥ १२३ ॥
येकत्र करूनि जनकजननी । आपण[1] लागला[2] विष्णुभजनीं[3] ।
इतुकी[4] कथा[5] नैमिषारण्यीं[6] । सौती सांगे शौनका ॥ १२४ ॥
हें[1] आख्यान[2] श्रद्धाभक्ती[3] । पढोनि पुढिलां[4] परिसविती ।
त्यांतें[5] पृष्ठीं[6] वाउनी अंतीं । वैकुंठासि[7] ने[8] गरुड ॥ १२५ ॥
आणि सर्पापासूनि कदा । नाहीं विषदंशाची[1] बाधा ।
ऐसें व्यासाचिया शब्दा । विश्वासेंसीं[2] मानिजे[3] ॥ १२६ ॥
येथूनि संपलें सौपर्ण[1] । पुढती[2] मांडिलें आस्तिकाख्यान[3] ।
ते कथेसि निजावधान[4] । सज्जनीं दिधलें पाहिजे ॥ १२७ ॥
इति श्रीभारते आदिपर्वणि । मुक्तीशगिरा[1] ताम्रपर्णी[2] ।
साहित्यमोतियांची भरणी । जोडे ग्राहीक[3] श्रोतयां ॥ १२८ ॥

इति श्रीभारते आदिपर्वणि षष्ठमोऽध्यायः ॥

---

१२३. १ व्यापिले पु४ ; २ (+) ते औं गो२ ; ३ तात्काळ औं , पाताळ गो२ ; ४ पाताळ लंघित औं , भेवोनिया गो.२.

१२४. १–३ इतुकी कथा नैमिषारण्यीं नि खवर्ग ( खगेंद्र गेला विष्णुभुवनीं औं पु ) ; ४–६ वर्तली ते यथार्थवचनीं नि खवर्ग. [ नि खवर्ग या मध्यें वरील तिसरा चरण दुसरा करून तिसरा नवीन घातला आहे व दुसरा चरण गाळला आहे. ]

१२५. १–२ आख्यान हें नि ख पु४ मुं नां ; २ व्याख्यान पु ; ३ श्रद्धोक्ती औं ; ४ पुढल्या नि ; ५ त्यांसी औं पु ; ६ पुष्टीं नां औं पु गो.२ ; ७ स्वर्गाप्रति नां ; ८ नेई नि मुं गो.२.

१२६. १ विषदंशादि रा , विषाची नां , दंशादि औं पु ; २ विश्वासें नि , विश्वासपूर्ण मुं , विश्वासोनि गो२ ; ३ मानिजो गो.२.

१२७. १ सुपर्ण धु गो , संपुर्ण पु४ ; २ पुढें नि खवर्ग गो.२ ; ३ आस्तिकायन रा गो.२ ; ४ अवधान मुं. औं व पु मध्यें ही ओवी नाहीं.

१२८. १ मुक्तेश° ख औं पु.४ , मुक्तेश्वरगिरा नि मुं ; २ तारकावर्णी मुं , पर्वणी औं पु ; ३ ग्रंथीं ख , साहित्य पु.४.

॥ श्री ॥

## अध्याय सातवा

### श्रीगणेशाय नमः

शौनक ह्मणे लोमहर्षणी । मागील कथा परिसिली[1] श्रवणीं ।
सर्पाभिधानें[2] तुझी वाणी । वदली नाहीं विस्तारें ॥ १ ॥
तें सांगोनि पन्नगसत्र[1] । जें कां अद्भुतरसाचें पात्र ।
तेणें आमुचे क्षुधित श्रोत्र[2] । संतृप्त करीं[3] उदारा ॥ २ ॥
सौति[1] ह्मणे[2] अहो[3] जी स्वामी । संख्या न सरे[4] सर्पनामीं[5] ।
तथापि श्रेष्ठ श्रेष्ठ ते[6] मीं । अनुवादेन अवधारा[7] ॥ ३ ॥
शेष वासुगी[1] ऐरावत । तक्षक कर्कोटक धनंजय कुशत[2] ।
कालिया[3] मणिनाग कंबलाश्वत[4] । आपूरण[5] आणि पंजरक[6] ॥ ४ ॥
येळापत्र वामन व्याळ । नीळानीळ कल्माष[1] शबळ[2] ।
आर्यक[3] उग्रक नहुष[4] पिंगळ । पोतक[5] आणि सुदुर्मुख[6] ॥ ५ ॥
दधिमुख क्षता[1] विमळ पिंडक । आयुशंख[2] कोटरक[3] ।
वालखिल[4] निष्ठुरक[5] । हेमगुह महानाग ॥ ६ ॥

---

१. १ **परिसविली** धु ; २ °**धान** पु ४ , °**धानी** औं गो.

२. १ °**सुत्र** पु४ , **पन्नगा**° औं पु गो२ ; २ **चक्षुश्रोत्र** गो॰२ ; ३ **वरी** तं.

३. १ **श्रोते** पु ; २ **ह्मणती** औं पु ; ३ ( – ) नि ; ४ **धरे** पु४ मुं , **पुरे** नां , **सिरे** रा ; ५ °**धार्मी** औं ; ६ **हो** मुं ; ७ **अवधारी** नि.

४. १ **वासुकी** नि तं औं रा गो२ ; २ **कुशीत** नि , **कुसित** मुं ; ३ **काळिय** नि ; ४ **कंबल श्वेत** नि औं पु रा गो॰२ , **कंबळास्वेत** ख , **बळाश्वेत** पु४ ; ५ **अपूर** रा गो॰२ , **आपूर्ण** पु ४ ; ६ **पिंजरक** नि.

५. १ **जल्माश** ख , **उन्मेष** पु४ , **उन्मिश** औं पु , **गुल्मश** धु , **कुल्मश** तं , **उन्नश** नां ; २ **संबळ** धु गो॰२ ; ३ **अर्थक** औं ; ४ **नौश** धु तं ; ५ **पातक** पु४ धु ; ६ **सुनामुख** नि.

६. १ **क्षत्ता** नि ; २ **आप्तशंख** नि ( संस्कृत **आप्त शंख** ) ; ३ **करोटक** नि , **कर्कोटक** धु , **कोटिरक** नां औं पु , **कोटारक** गो॰२ ; ४ **वालिशिख** नि ( संस्कृत ) ; ५ **निष्ठानक** नि ( संस्कृत ).

बाह्यकर्ण हस्तिकर्ण[१] मुद्गर । पिंडक कळीक[२] येकवीर[३] ।
पुण्यदंष्ट्रवृत्त[४] बिल्व पांडुर । संवर्तक[५] पोत[६] पद्म[७] ॥ ७ ॥
शंखनख[१] वज्रज[२] कोपन[३] क्षमक[४] । पिंजरक[५] वैरक[६] अतिभद्रक[७] ।
मूषकाद[८] शंखशिर[९] जोतिक[१०] । अपराजित पूर्णभद्र ॥ ८ ॥
श्रीवह[१] कौरव्य[२] धृतराष्ट्र । कुमुद[३] कुमुदाक्ष कुजन[४] कुठर[५] ।
कुंडोदर महोदर[६] कर्कर[७] । शल्यक[८] विरजा[९] सुबाहु ॥ ९ ॥
पुष्कर शालिपिंड वीर्यवान । पीवरक[१] मुखर कोणपायन[२] ।
कुष्मांडक तित्तिर[३] कर्दममान[४] । बहुमूळक[५] सरस[६] ॥ १० ॥
असो हे किती नामसंख्या । प्रगट[१] केलें मुख्यमुख्यां ।
अप्रसिद्ध तयांचा[२] लेखा । विश्वकर्ता स्वयें जाणे ॥ ११ ॥

---

७. १ **हस्तिपद** नि ; २ **काळीक** नि मुं , **कलींग** औं पु ( **कालीयक** संस्कृत ); ३ **येकरवीर** रा गो तं ( संस्कृत-**करवीर** ) ; ४ **पुण्यदंष्ट्राव्रत** नि , **पुण्यदंष्ट्रवृत्ति** औं पु ; ५ **सर्वांतक** औं पु ; ६ **पौत** नि ख औं पु ; ७ **पद्म** ख पु४.

८. १ **शंखमुख** नि ( संस्कृत ) , **शंखनक्र** पु४ , **शंखनक** ख रा धु तं , **शेषनवक** औं पु ; २-३ **वज्रकोपन** नि खवर्ग , **वज्रककोपनक** धु ; ३ **कोपनक** तं ; ४ **क्षेमक** नि ( संस्कृत ) , ( - ) धु तं ; ५ **पिंडारक** नि ( संस्कृत ) , **क्षेमक** धु तं ; ६-७ **अतिभद्र मूषक** नि ; ८-९ **मुषकादंशखसिर** पु४ नां धु तं गो·२ , **शंखशिरा** नि ; १० **जोतिरक** नि , **ज्योतिरक** औं पु४ नां मुं.

९. १ **श्रीवर** पु४ , **श्रीबाहु** औं पु ; २ **कौरव** मुं औं पु धु ; ३ ( - ) नि खवर्ग ; ४ **कुंजन** रा धु नां , **कुंजर** ख ; ५ **कुठार** ख मुं ; ६-७ **कर्कर महोदर** नि खवर्ग ; ८ **सत्य** नि , **सत्यक** खवर्ग , **शाल्वक** गो·२ ; ९ **विराज** नि मुं.

१०. १ **पितक** मुं , **पिनाक** औं ; २ **कोणपाशन** ( संस्कृत ) ; ३-४ **तित्तिरी कर्दमान** नि , **तितिर्दकमान** ख पु४ औं पु ; ५-६ **बहुमुख कलशारस** नि , **बहुवमुळक स्यरस्य** ख , **बहुमुकुळक षरस** औं पु , **बहुमुळ कुशांकशशांक** गो , **बहुमुळ कुशांकसरांश** गो२ , **बाहुमुलक शराष** तं. ह्या शब्दाबद्दल अनेक अर्थहीन पाठ आहेत. मूळ भारतावरूनही त्याचा उलगडा होत नाहीं. वर घेतलेला पाठ पु ४ मधील असून त्याला जवळ कांहीं पाठ सांपडतात.

११. १ **प्रकट** ख , **प्रघट** गो·२ ; २ **तयांची** नि ( **तयांच्या** स ) , **तयां** औं पु.

पुत्र पौत्र बहु संतती[१] । नागकन्या पद्मिणीजाती[२] ।
देवांगनातुल्य सुकृती । भोग[३] पावती तयांचे ।। १२ ।।
सकळसर्पां[१] श्रेष्ठ सुमति । शेष फणींद्र[२] धर्ममूर्ति[३] ।
धरूनि वीतराग विरक्ती । निघता जाला तपातें ।। १३ ।।
वल्कलवसनें[१] जटाधारी । जितेंद्रिय निराहारी ।
पुण्यारण्य पुण्यगिरी[२] । पुण्यकुहरें वसवितु[३] ।। १४ ।।
हिमालयगंधमादनीं[१] । दशारण्यपुष्करारण्यीं[२] ।
निर्मळ तपें[३] निर्मळ[४] स्थानीं[५] । निर्मळ मनें[६] आचरत[७] ।। १५ ।।
तपश्चर्या तीव्र[१] दारुण । देखोनि पातला चतुरानन ।
ह्मणे कवण[२] कामना मन[३] । वांछी[४] तें[५] सांग अनंता[६] ।। १६ ।।
नागेंद्र ह्मणे देवदेवा । श्रीरंगनाभिकमळोद्भवा ।
सुहृद्संग[१] माझिया जीवा । वांति[२] तैसा[३] नावडे ।। १७ ।।
हे दुराचारी जगहिंसक[१] । अधर्मसीळ[२] परनिंदक[३] ।
नित्य कळहाचें कौतुक । परस्परें वाढविती ।। १८ ।।

---

१२. १ संपत्ती नि ख पु ; २ पद्मिनी° नि ; ३ भाग्य औं पु.

१३. १ सकळसर्पे नि , सकळीं सर्पां धु ; २ फणेंद्र मुं ; ३ कुर्म° पु४ , °मुहूर्ती गो२.

१४. १ °वसन नां तं ; २ गिरिवरी नां , गिरिकंदरीं औं ; ३ वसवित नि मुं पु४ रा गो·२.

१५. १ हिमालयीं° नि , हिमालयें° पु४ ; २ दशारण्यीं° नि पु४ , दशार्णि° ख , °पुष्करारणीं मुं औं पु तं ; ३ मनें गो२ , तोय औं ; ४–५ आचरणीं गो२ ; ६–७ स्नानें करितसे गो२.

१६. १ अति औं ; २ काय धु ; ३ मनें पु४ मुं धु , जाण गो२ ; ४ वांछीत ख गो·२ ; ५ (–) पु४ गो·२ ; ६ आतां औं पु.

१७. १ °संगें ख औं पु ; २ वात पु रा गो·२ , वास औं ; ३ त्याचा औं पु.

१८. १ परनिंदक ख ; २ अधर्महीन ख ; ३ जगहिंसक ख , परपीडक मुं , परमानिंदक पु गो तं.

त्यावरी[1] बळिष्ठ[2] सापत्नबंधु[3] । गरुड देवांचा सेवक साधु ।
त्यासी चाळिती[4] वैरसंमंधु[5] । हीनशक्ती पामर[6] ॥ १९ ॥
विशेष मातेनें शापिलें[1] । पावकीं भस्म होतील[2] वहिले ।
तयां[3] जोहरांतूनि[4] केलें । देह[5] माझें भिन्न[6] म्यां[7] ॥ २० ॥
तीव्र[1] तयाचे[2] वैश्वानरीं । शरीर जाळीन निज[3] निर्धारीं ।
ऐकोनि[4] हात ठेविला[5] सिरीं[6] । नाभी ह्मणे विधाता ॥ २१ ॥
मातृशापाचा[1] अनिल[2] । लागों नेदीं तुज अळुमाळ ।
निर्भय होऊनि राहें अचळ । मी सांगेन[3] त्या रीती[4] ॥ २२ ॥
माथां घेऊनियां[1] धरणी । अक्षयीं राहें पाताळभुवनीं ।
सर्व सौख्य[2] तुजलागुनी । पाठवीन त्या ठायां ॥ २३ ॥
तुझेनि तपें[1] जालों[2] तुष्ट[3] । शक्ति देईन अति अचाट ।
पद्मपत्राहुनि हळुवट[4] । धरणी राहो[5] तुज[6] माथां ॥ २४ ॥
अहिराज[1] ह्मणे त्रैलोक्यनाथा । भूगोळ बैसवीं माझिये[2] माथां ।
ब्रह्मा[3] ह्मणे[4] मही डोलतां । आंदोळती[5] गिरिकूटें[6] ॥ २५ ॥

---

१९. १ त्यापरी मुं ; २ ( – ) ख . बळी धु ; ३ संपन्नबंधु औं पु , सपत्न° ख ; ४ चालविती नि खवर्ग ( चालविसी पु , चालती नां ); ५ °संबंधु नि ; ६ पामरें धु गो·२.

२०. १ श्रापिलें औं पु धु ; २ व्हाल औं पु ; ३ तेव्हां पु४ ; ४ जोहारां° पु४ मुं ; ५ दिन पु४ ; ६ हिन पु४ , भस्म गो२ ; ६–७ छिन्नाभिन्न औं पु.

२१. १ आतां तीव्र औं पु ; २ तपाच्या नि , तपाचा ( चां ) नां औं पु धु तं ; ३ ( – ) गो·२ ; ४ हें ऐकोनि औं मुं ; ५ ठेवी मुं रा गो·२ ; ६ शिरीं नि औं पु गीं·२ तं.

२२. १ मातृशापाग्नीचा धु रा ; २ अनळ नि खवर्ग ( पु४ नां प्रसंप्रा ); ३ ठेवीन ख ; ४ स्थळीं ख.

२३. १ ठेउनियां ख गो , ठेउनी औं पु ; २ सुख तं , सौख्यें औं.

२४. १ तोषें ख, ( – ) तं ; २ ( – ) औं ; ३ संतुष्ट औं पु धु ; ४ सुभट ख ; ५ राहेल नि औं ; ६ तुझ्या नि , तुझे पु , तव पु४ मुं औं.

२५. १ अहिनाथ नि , अहि मुं ; २ ( – ) पु४ ; ३–४ ब्रह्मांड गो·२ ; ५–६ सुगमोपाय बोलतसे गो२.

तेणें प्रळयो[1] होईल भूतां । खचती[2] स्वर्गींचिया[3] चळथा[4] ।
ह्मणोनि तृणाग्र[5] न[6] हालतां[7] । सुगमोपाय[8] सांगतसें ॥ २६ ॥
माझे[1] आज्ञेनें[2] धरा येथ । विवर पाडूनि देईल पंथ ।
तुवां प्रवेशोनि[3] त्वरित । स्तंभ होणें तळवटीं ॥ २७ ॥
करूनि प्रदक्षणा[1] नमन । शेष आज्ञेनें करी गमन ।
विवरें[2] पाताळतळ[3] भेदून । पृथ्वी माथां वाहिली[4] ॥ २८ ॥
सहस्रफणीचा येकमणी । तया रत्नाग्रावरी[1] धरणी ।
धरिली जैसी मृत्तिकाकणी । न दिसे शृंगीं मेरूच्या ॥ २९ ॥
हरिहर लोकीं[1] सकळ भोग[2] । रिद्धिसिद्धीसहित[3] सांग[4] ।
निकट येऊनि[5] उभे[6] मार्ग[7] । पाहती शेषआज्ञेचा[8] ॥ ३० ॥
पुढें परम भक्त ह्मणोन । त्यावरी पहुडला नारायण ।
यापरी शेषें[1] हो[2] आपण । आत्महितार्थ[3] साधिला ॥ ३१ ॥
शेष त्यागूनि गेलियावरी[1] । सर्पीं[2] मिळोनि थोरथोरीं[3] ।
वासुगी[4] केला राज्याधिकारी । इंद्र जैसा सुरगणीं ॥ ३२ ॥

---

२६. १ प्रळय ख मुं नां गो॰२ , प्रळई पु४ ; २ खचतील नि ; ३ स्वर्गा° पु४ , सर्गा° तं ; ४ चलथा धु ; ५ सुग्रह पु४ ; ६ (–) ख पु४ ; ७ लाहतां ख , लगतां धु ; ८ सुखोपाय नि खवर्ग ( खचों पाहे औं , खचों न पाहे पु ).

२७. १ माझेनि औं पु तं ; २ आज्ञे औं पु , आज्ञेन गो॰२ ; ३ (+) तेथें धु.

२८. १ प्रदक्षिणा नि औं पु४ तं ; २ विवर नि खवर्ग ; ३ पाताळगर्त तें औं , पाताळ पु ; ४ वाइली ख पु॰४ धु गो.

२९. १ अग्रावरी औं पु४.

३०. १ सिद्धाचे नि ( सिद्धांचे स ) , सिद्धीचे खवर्ग (सीधीचे पु४) ; २ भोगें औं पु ; ३ ऋद्धि° नि , रिधिसिधी° पु४ ; ४ चांग ख मुं , सांगें औं पु ; ५ होवोनि पु४ ; ६ उभय नां ; ७ वेगें औं , मागें पु ; ८ तोष आज्ञेचा धु तं. ही ओवी गो२ मध्यें नाहीं.

३१. १ शेष खवर्ग तं ; २ (–) धु ; ३ परमहितार्थ धु.

३२. १ गेलियां° नां पु ; २ सर्प नि मुं ; ३ लहानथोरीं गो२ , °थोरी नि ; ४ वासुकी नि रा गो॰२ तं.

सभा करूनि मग समस्तीं । चित्तें[1] भ्रमती चिंतावर्तीं ।
शापारिष्टपरिहारार्थीं[2] । ह्मणती यत्न[3] विचारा ॥ ३३ ॥

येक ह्मणती ऋषींची[1] काया । धरूनि भेटों जन्मेजया ।
सर्पसत्र न करावया । उपदेश[2] करूं[3] विवेकें[4] ॥ ३४ ॥

येक ह्मणती होऊं[1] प्रधान । सेवेनें[2] मोहूं नृपाचें मन ।
येक ह्मणती ऋत्विजगण[3] । रात्रीं निद्रिस्त[4] डंखावे[5] ॥ ३५ ॥

येक ह्मणती विषोदकधारी । मेघ[1] पाडूं यज्ञावरी ।
येक ह्मणती हस्तनापुरी[2] । सर्पमयचि करावी[3] ॥ ३६ ॥

येक ह्मणती द्रव्य[1] सकळ । नाश करूं घालूनि[2] गरळ[3] ।
येक ह्मणती तो[4] भूपाळ । ग्रासूं[5] पितियासारिखा[6] ॥ ३७ ॥

ऐसीं सर्पमुखींचीं[1] वचनें । येकही[2] राजा[3] न मनी[4] मनें ।
ह्मणे हे[5] ब्रह्महत्या रे मरणें[6] । पावतील[7] हुतासीं[8] ॥ ३८ ॥

---

३३. १ चित्त गो·२ ; २ शापाचिये परि° औं , शापहारार्थ परि° पु , मातृशापपरि° गो ; ३ आत्महित औं पु.

३४. १ रुषींची ख पु४ औं , रुषि धु , ऋषि तं ; २–४ उपदेशूं नृपातें औं.

३५. १ होऊनि नि ख , हो पु४ रा गो२ तं ; २ शेवेन पु४ , सर्वेंचि मुं ; ३ रुत्विज° पु४ रा धु गो , रित्विज° ख ; ४ निद्रेत गो२ , निद्रेस्थ गो ; ५ डंकावे नां गो२ , खंडावे ख.

३६. १ मेघा नि ; २ नानापरी ख , °पूरीं पु; ३ करावें ख पु·४ नां रा गो·२. नि खवर्गा मध्यें ३६ व ३७ ओवींची अदलाबदल आहे.

३७. १ होमद्रव्य नां , द्रव्यें मुं रा ; २ घालूं मुं नां ; ३ गाळ तं ; ४ ( – ) औं पु , ५–६ ग्रासोनि तयासारिखा पु४.

३८. १ सर्पामुखिचीं पु४ रा ; २–३ राजा एकही नि ; ४ मानी नि , हीन मुं ; ५ ( – ) ख औं गो२ ; ६ मरण ख पु४ तं , जाणें नि ; ७ ( + ) निश्चयो धु , मरण पावतील नि ; ८ हुताशनी पु.

अधोवदनें[1] वारी[2] मौळ[3] । हस्त[4] झाडी[5] वेळोवेळ ।
हें देखोनी स्वधर्मशीळ[6] । येळापत्र बोलतु[7] ॥ ३९ ॥

ह्मणे गा[1] भुजंगेशा अवधारीं । शाप जाला ते[2] अवस्वरीं[3] ।
मातेचिये मांडीवरी[4] । भयें उपविष्ट मी होतों ॥ ४० ॥

ते वेळीं कानीं पडिलें[1] वचन[2] । तें[3] तुह्मीं ऐका येकाग्रमन[4] ।
शाप परिसोनि चतुरानन[5] । तथास्तु ह्मणे[6] चहूं[7] मुखीं ॥ ४१ ॥

तेथें अमरेंद्रासकट[1] । भावें जोडूनि करसंपुट[2] ।
स्तवनें प्रार्थिला देवश्रेष्ठ । पितामह[3] परमेष्ठी ॥ ४२ ॥

पुत्रा[1] शापूनि करी दहन[2] । ते लांव[3] राक्षसीसमान ।
तिचिया वचना बळ[4] आपण[5] । किमर्थ दिधलें[6] स्वामिया ॥ ४३ ॥

ब्रह्मा[1] ह्मणे[2] परपीडक । त्यांचे हृदयीं अत्यंत[3] दुःख ।
यालागीं वदलें माझें[4] मुख । हो तैसेंचि ह्मणोनी ॥ ४४ ॥

---

३९. १ °**वदनी** पु४ ; २ **वारिलें** नि , **वाम** गो·२ ; ३ **माळ** ख , **मौळें** पु४ ; ४–५ **श्वास सोडी** नि ; ६ **धर्मशील** नि , °**पाळ** ख ; ७ **बोलत** नि ( स प्रसंप्रा ) पु·४ मुं गो·२ रा , **अनुवादे** नां.

४०. १ ( – ) नि मुं औं ; २ **जे** मुं नां रा ; ३ **अवसरीं** नि मुं पु४ तं रा , **अवेस्वरीं** गो·२ ; ४ **मांडिये**° रा गो·२ मुं.

४१. १ **पडिलीं** नि ख पु४ रा गो नां तं ; २ **वचनें** नि ख पु४ नां रा गो·२ तं ; ३ **तीं** नि ख पु४ नां तं , **ते** रा गो·२ ; ४ °**मनें** नि ख पु४ मुं नां रा गो धु ; ५ **चतुराननें** नि ख पु४ नां रा गो·२ ; ६ **ह्मणितलें** नि ; ७ **चौं** धु तं गो२.

४२. १ **अमरेंद्रसहित निकट** नि , **अमरांसहित इंद्रश्रेष्ठ** औं पु , **अमरेंद्रसाहितनिष्ट** ख पु४ मुं नां , **अमरिं इंद्रासकट** रा , **अमरइंद्रा**° गो·२ ; २ °**संपुष्ट** पु४ नां औं ; ३ **पितामहा** धु तं.

४३. १ **पुत्र** नि पु·४ औं गो·२ ; २ **हनन** गो·२ ; ३ **लाव** नि पु४ तं , **तवं** नां , **वेळीप** गो·२ , **वेळा** ख ; ४ **बोल** तं , **डोल** धु , **बळें** पु·४ ; ४–५ **अनुमोदन** नि ; ६ **दिधला** धु , **दिल्हा** तं.

४४. १–२ **जो ब्राह्मण** ख ; ३ **परम** पु४ , **अत्युग्र** मुं ; ४ **मातृ** गो·२.

दुष्टसंव्हाराकारणें[1] । अपाय रचावा[2] प्रयत्नें ।
सहज[3] मांडला[4] देखोनि मनें[5] । म्यां संतोष मानिला ॥ ४५ ॥
शक्र ह्मणे[1] तूं दीनदयाळ । सात्विक तामस[2] प्राणी[3] सकळ ।
सुष्ट दुष्ट तुझेचि बाळ । कृपेनें[4] देवें[5] रक्षावे ॥ ४६ ॥
हांसोनि बोले सकळेश्वर[1] । सांगणें नलगे हा विचार ।
पवित्र रक्षावया[2] प्रकार[3] । म्यां पूर्वींच रचिलासे[4] ॥ ४७ ॥
दुष्ट[1] पडती[2] हुताशनीं । सुष्टां[3] रक्षील अस्तीकमुनि ।
ऐसें वदोनि[4] पद्मयोनी । पुढती सांगे[5] प्रगटार्थ[6] ॥ ४८ ॥
स्वसा शेषाची धाकुटी । जरत्कारी सगुणसृष्टी[1] ।
जरत्कारु[2] भिक्षेसाठीं । अंगीकारील निजवधू ॥ ४९ ॥
तिचे[1] पोटीं जन्मेल कुमर । आस्तीकनामा[2] ऋषेश्वर[3] ।
तपोतेजें वैश्वानर । धडाडीत[4] वैराग्यें ॥ ५० ॥
तो रक्षील मातुळ[1] जळतां । ऐसें वदला वेदवक्ता[2] ।
तोचि यत्न तुह्मीं आतां । विचारावा मुख्यत्वें[3] ॥ ५१ ॥

---

४५. १ °**संहारा**° नि ( स प्रसंप्रा ) मुं औं रा गो·२ तं ; २ **रचावे** ख मुं नां पु , **रची** गो·२ ; ३ **सहजेंचि** गो·२ ; ४ **मांडल्या** नि ख रा गो·२ , **मांडलें** औं पु·४ ; ५ **माने** तं.

४६. १ (+) देव नां ; २ **राजस** मुं ; ३ **नाम** मुं ; ४–५ **कृपेन दयेन** गो·२.

४७. १ **सर्वेश्वर** नि , **चतुर्वक्र** औं , **सकळेश्वर** गो·२ ; २ °**वयाचा** नि ; ३ **विचार** ख औं गो२ ; ४ **रचिला असे हो** धु तं , **रचियेला** ख गो२.

४८. १ **दुष्ट** धु पु ; २ **पडतील** नि पु·४ ख गो·२ ; ३ **सुष्ट** नि खवर्ग गो·२ ; ४ **देखोनि** नि , **बोलोनि** ख नां ; ५ **बोले** नि खवर्ग ; ६ **पुरुषार्थी** पु४ , **कार्यार्थ** तं.

४९. १ **सुगुणसृष्टी** नि तं , **गुणश्रेष्टी** ख ; २ **जरत्कारी** ख नां धु , **जरत्कार** औं पु गो२.

५०. १ **तिच्या** नि , **तिचा** ( **चां** ) नां पु धु तं ; २ °**नामें** ख नां गो·२ ; ३ **ऋषीश्वर** नि , **रुषे**° धु ख पु४ ; ४ **धडधडीत** गो·२ , **धडाडी** नां.

५१. १ (+) **कुळ** नि ; २ **वेदोक्त** ख , पैं **धाता** औं , **देववक्ता** तं ; ३ **मनुष्यत्वें** मुं , **सुखत्वें** गो२.

ऐकोनि येळापत्रवचन । तोषलें[१] वासुगीचें[२] मन ।
अवघे ह्मणती धन्य धन्य । श्रेष्ठ विचार[३] हा[४] येक[५] ॥ ५२ ॥

यावरी[१] स्वल्पचि[२] काळेंकरून । सुरासुरीं[३] समुद्रमथन[४] ।
मांडिलें तेसमयीं प्रार्थून । नेत्र[५] केला वासुगी ॥ ५३ ॥

कार्य संपादिलिया[१] सर्व । वस्तुलाभें तोषले[२] देव[३] ।
ते वेळीं सरोनि स्नेहभाव[४] । पुढती ब्रह्मा प्रार्थिला ॥ ५४ ॥

स्वामी[१] फणींद्र[२] वासुगीनामा । येथें[३] बहुसाल पातला[४] कामा ।
याचें हृद्यशैल्य[५] तुह्मां- । वांचोनि कवणें[६] फेडावें[७] ॥ ५५ ॥

याचा हृत्ताप केलिया शांत । आह्मांसि[१] पावलें कोटी उचित ।
ऐकोनि बोले त्रैलोक्यतात[२] । हें म्यां पूर्वींच कथिलेंसे[३] ॥ ५६ ॥

येळापत्र आपुल्या युक्ती[१] । ज्या[२] कां[३] वदला सर्पांप्रती[४] ।
तोचि आठव[५] धरूनि[६] चित्तीं[७] । उपाय[८] इहीं[९] साधावा ॥ ५७ ॥

---

५२. १ संतोषे धु ; २ वासुकीचें नि औं रा गो॰२ तं, श्रृंगीचें ख ; ३–५ विचारें बोलतां पु४ ; ५ येकु नां तं.

५३. १ त्यावरी नि ; २ स्वल्प नि ख मुं नां गो२ ; ३ सुराआसुरीं धु पु४ ; ४ °मंथन नि ; ५ रज्जू नि, मैत्र ख औं पु गो, दोर मुं, सूत्र धु.

५४. १ संपादल्या नि, संपादल्यां पु४ नां, संपादलें औं पु ; २ तोषला नि पु४ ; ३ अपूर्व ख ; ४ देहभाव नि औं, भाव धु तं.

५५. १–२ म्हणती स्वामी तं ; ३ फणींद्र धु, मणींद्र तं, (–) गो२ ; ४ आला नां, येथें मेळला गो२ ; ५ हृदयींचें शल्य नि, °शल्य तं, हृदयींचें° मुं नां, हृदयीं शैल ख औं पु, °सैल्य गो॰२ ; ६–७ कोणा न फेडवे गो२.

५६. १ आह्मां नि खवर्ग ; २ त्रैलोकयनाथ पु४ मुं औं धु गो२, °क्यकांत रा ; ३ कथियेलें गो२.

५७. १ पंक्ती पु४, उक्ती रा ; २ जे ख पु४, हें गो२, जो नां ; ३ काज गो२ ; ४ सर्पांप्रती धु तं ; ५–६ आठउनी ख ; ७ चित्तिं पु४ नां ; ८ उपाव नां ; ९ यांहीं नि, येहीं पु४ नां, विहित पु.

जरत्कारी रक्षूनि यत्नें[1] । जरत्कारूसि[2] भिक्षार्थ[3] देणें ।
तो आपुल्या रेतदानें । आस्तीकातें जन्मवील ॥ ५८ ॥
तपोतेजें[1] वैश्वानर । मनें शृष्टी मनें संव्हार[2] ।
ऐसा आस्तीक ऋषेश्वर[3] । जळतां रक्षील सर्पांतें ॥ ५९ ॥
त्या ऋषीचा[1] आगमनकाळ । येथूनि समीप जाणा सकळ ।
ऐसें अभय ऐकोनि[2] व्याळ । लोटांगण[3] घालिती ॥ ६० ॥
वासुगी बोले आज्ञावचन । सर्प हो लक्षा द्विजागमन ।
जरत्कारू हें अभिधान । आठव[1] मनीं[2] असों द्या ॥ ६१ ॥
यावरी कौरववंशनृपति[1] । पवित्र राजा परीक्षिति ।
मृगयाव्याजें[2] वनाप्रती । निघता जाला कौतुकें ॥ ६२ ॥
जैसा प्रपितामहा[1] पंडु[2] । धनुर्धरांमाजी प्रचंडु[3] ।
तैसा[4] यशकीर्तीनें रूढू[5] । मृगयासीळ[6] स्वधर्में[7] ॥ ६३ ॥
करीं[1] सायक[2] शरासन[3] । श्वापद[4] लक्षीत हिंडे वन ।
तरस तरळ[5] वराह हरिण[6] । बाणधारा[7] निवटितु[8] ॥ ६४ ॥

---

५८. १ प्राणें ख ; २ °त्कारासी ख औं पु रा तं ; ३ भिक्षा नि पु४ मुं औं पु गो·२ , भिक्षेसी ख नां.

५९. १ तेणें तेजें गो ; २ संहार नि ( स प्रसंप्रा ) औं तं ; ३ ऋषीश्वर नि , रुषेश्वर धु पु४.

६०. १ रुषी पु४ , ऋषी औं पु ; २ देखूनि नि ; ३ लोटांगणें नि पु४ तं मुं.

६१. १ आठवण नि ; १–२ आठवणीं तं.

६२. १ °वंशज नृपती नि ख पु·४ औं रा गो२ ; २ मृगवधव्याजें पु.

६३. १ प्रपितामह पु४ मुं नि , प्रतापि राजा औं , प्रपिता राजा पु , प्रतापिमहा नां , पितामहा धु ; २ पांडू नि ; ३ चंडु औं ; ४ तैसेंच तं , तैसाचि ख पु४ नां रा गो·२ ; ५ मार्तंड मुं , प्रौढु औं , प्रहुडु पु ; ६ मृगार्थालागीं पु , मृगयालागीं औं ; ७ स्वधर्मी नि , सर्वदा ख , स्वधर्मा गो·२.

६४. १ कबरीं नि ; २ सायास धु , राया चाप गो२ ; ३ शरसंधान औं पु ; ४ श्वापदें नि मुं रा गो·२ , पाखी धु ; ५ तगर धु गो·२ , चितळ औं ; ६ श्वान किंवा स्वान पु४ औं सोडून इतर ( जाण औं ) ; ७ बाणधारीं नि ख औं पु तं ; ८ निवटित नि मुं गो·२.

पुढां[१] कुरंग[२] येक[३] नयनीं । दूरी[४] देखोनि[५] विंधिला बाणीं ।
घायाळ मृग पळतां वनीं । पाठीं धांवे[६] भूपाळ[७] ॥ ६५ ॥
जैसा शंकर पिनाकपाणि । यज्ञमृगातें विंधोनि बाणीं ।
पाठी लागे[१] धांवे[२] चरणीं । स्वर्गारण्य[३] शोधितु[४] ॥ ६६ ॥
तैसा लागला असतां बाण । वनेंउपवनें[१] लंघी[२] हरिण ।
राजा पाठी[३] धांवतां सीण[४] । पावता जाला अपार[५] ॥ ६७ ॥
पुढां[१] गोरक्षकांचें वृंद । देखिलें[२] करित[३] बहु[४] विनोद ।
वछमुखींचे[५] स्रवती[६] बिंद । तो पयफेन प्रासिती[७] ॥ ६८ ॥
त्यांतें[१] तृषार्त[२] पुसे[३] जीवन[४] । येर[५] ह्मणती जी पयप्राशन ।
कीजे ह्मणोनि क्षीरद्रोण[६] । पुढां[७] करिती हस्तकें ॥ ६९ ॥
नेघोनि[१] भोंवतें[२] पाहे[३] दृष्टी[४] । तवं अंतरें[५] पर्णकुटी ।
देखोनि[६] आला तयेनिकटीं[७] । देखे[८] माझारी तपस्वी ॥ ७० ॥

---

६५. १ **पुढें** औं पु ; २ **मृग** रा ; ३ (+) **देखिला** रा ; ४ **दूर** नि, **दृष्टी** औं पु ; ४–५ **तो दुरोनि** रा, **दुरुनी** ख ; ५ **दवडोनि** गो·२ ; ६ **लागे** मुं धु तं ; ७ **नृपाळ** नि.

रा मध्यें ६५ चे शेवटचे दोन चरण व ६६ चे पहिले दोन चरण गाळले आहेत.

६६. १–२ **धांवे लागे** ख पु४ ; ३ **स्वर्गारण्यें** धु गो तं ; ४ **साधित** तं.

६७. १ **वनोपवनें** नि ; २ **लंघित** औं पु ; ३ **पाठीसि** नि, **पाठीं** औं पु ; ४ **शीण** नि पु ; ५ **आपण** ख, **बहुसाल** धु.

६८. १ **पुढें** नि ख पु४ मुं गो२ ; २–३ **करित देखिलें** धु पु४ ; ३ **करिती** नि, **करितां** गो·२ ; ४ (–) नि ख ; ५ **वत्स**° नि मुं नां औं तं ; ६ **स्रवतां** नि गो·२, **श्रवतां** धु ; ७ **सेविती** गो·२.

६९. १ **त्यांसी** नि, **तयातें** धु तं ; २ **तृशार्थि** पु४ ; २–३ **पुसे त्रुषार्थ** धु नां ; ४ **स्थान** ख ; ५ **ते** नि, **येरें** ख, **येरु** पु·४ मुं औं ; ६ **क्षीरभोजन** तं ; ७ **पुढें** नां पु.

७०. १ **तें घेऊनि** नि, **निघोनि** ख मुं, **वेघोनि** रा ; २ **भवतें** ख मुं नां रा गो·२ तं ; ३ **फावे** पु४ ; ४ **भृष्टी** तं ; ५ (+) **देखे** नि ख औं पु, (+) **देखिली** मुं, (+) **पाहे** गो२ ; ६ **पाहोनि** नि ; ७ **तया**° नि ख मुं तं, **निकटीं** औं ; ८ **तवं त्या** ख.

बैसोनियां पद्मासनीं । मनें[1] पहुडला[2] समाधिशयनीं[3] ।
ह्मणोनि कपाटमुद्रा नयनीं[4] । आणि मुखीं[5] महामौन[6] ॥ ७१ ॥
फेण प्राशूनि करी तप । यालागीं शमीक[1] तो फेनप[2] ।
राजा आला त्यासमीप । तापघर्में[3] श्रांतला[4] ॥ ७२ ॥
उभयहस्तीं[1] पिटोनि टाळी । राजा[2] ह्मणे[3] ब्राह्मणा[4] न्याहाळीं ।
अभिमन्युपुत्र मी[5] ये काळीं । परीक्षिति येथें[6] आलोंसें[7] ॥ ७३ ॥
कृष्णकुरंग भेदिला[1] बाणें[2] । पळतां[3] देखिला असेल नयनें[4] ।
तो सांगीजे[5] ह्मणतां वचनें[6] । ऋषि मौनस्त[7] न[8] बोले[9] ॥ ७४ ॥
जैसी दारुप्रतिमा[1] स्तब्ध[2] । आळविल्या[3] नेदी शब्द[4] ।
तैसा न बोलतां विषाद । राजा मानी[5] मानसीं[6] ॥ ७५ ॥
विनाशकाळीं[1] भ्रंशे[2] बुद्धि । ऐसी श्रेष्ठमर्यादा अवधी[3] ।
ह्मणोनि[4] अविद्या तये संधी । उदित जाली रायातें ॥ ७६ ॥
मृतसर्पाचें[1] कळीवर[2] पडिलें । तें धनुष्यकोटीनें उचलिलें ।
कंठीं ऋषीचे सूदलें । परी[3] तो[4] ध्यानस्त[5] तें[6] नेणे[7] ॥ ७७ ॥

---

७१. १–२ **मन पहुडलें** पु ; ३ **समाधिसदनीं** रा गो तं, **तपोधनि** गो२ ; ४ **लाउनी** मुं ; ५ **सुखें** ख ; ६ °**मौन्य** नि ( °**मौन्यें** स पु४ ) ख पु रा.

७२. १ **समीप** मुं पु, **नामें** औं गो२ ; २ **फेणप** नि खवर्ग धु ; ३ **उष्णधर्में** औं, **तापउष्णधर्में** पु ; ४ **तापला** तं.

७३. १ **हस्तें** नि खवर्ग, °**हस्तें** रा गो२, °**हस्त** तं ; २–४ **म्हणे ब्राह्मणा मज** नि ; ५ ( – ) नि पु४ ; ६ **मी** नि ख ; ७ **पातलों** धु.

७४. १ **विंधिला** नि मुं नां धु, **छेदिला** तं ; २ **बाणीं** नि ख ; ३ **तो पळतां** पु४, **पळत** ख धु गो२ ; ४ **नयनीं** नि ख ; ५ **सांग** ख ; ६ **वचनीं** नि, **मौन्यें** ख ; ७ **मौनस्थ** नि गो, **नेमस्त** धु ; ८–९ **बोलेना** खवर्ग ( मुं प्रसंप्रा ).

७५. १ **धातुप्रतिमा** गो, **दारुकप्रतिमा** पु४ ; २ **स्तंभ** औं पु ; ३ **आळवितां** नि धु, ( + ) **कांहीं** औं पु ; ४ **प्रतिशब्द** नि मुं, ५ **पावे** नि ; ६ **मानसें** पु ख औं नां रा.

७६. १ **निशाकाळीं** धु ; २ **भ्रष्टे** नि, **भ्रंश** धु तं पु४ ; ३ **विधि** औं, **आधिं** ख ; ४ ( – ) धु.

७७. १ **मृत्य**° पु४ गो, **मृत्यु**° पु गो२ तं ; २ **कलेवर** नि, **कळेवर** औं रा तं ; ३ ( – ) नि, **तरी** पु४ ; ३–४ **तरी** ख मुं, **तऱ्हीं** औं पु ; ५ **ध्यानस्थ**

ईश्वरमायेचा बडिवार । कीं पूर्वकर्मांचा बळात्कार[१] ।
विवेकवंतही अविचार । राहटे[२] विचार[३] असतांही[४] ॥ ७८ ॥
मोहनीयां[१] छळिला[२] गिरिजावर[३] । कीं[४] मायामृगें[५] श्रीरामचंद्र[६] ।
कीं कपटफांसें[७] युधिष्ठिर । ढाळिता जाला आदरें[८] ॥ ७९ ॥
विरक्त संचरे व्यभिचारा[१] । कीं[२] सात्त्विक क्षोभला[३] परमारा[४] ।
निरपेक्ष[५] प्रवर्ते[६] आचारा[७] । स्तेयाचिया[८] प्रारब्धें[९] ॥ ८० ॥
पडिला शाहाणिया सींतरु[१] । नाड पावला[२] पारखी थोरु[३] ।
विवेकसिंधूचा पोहणारू । कुबुद्धिकूपीं बुडाला ॥ ८१ ॥
तैसा परीक्षिति सुविद्य[१] परम । त्यासही[२] प्राप्त जाला भ्रम ।
ह्मणोनि[३] ऐसें[४] अयोग्य कर्म । करिता जाला ते काळीं ॥ ८२ ॥
अनुचित राहटोनियां थोर । राजा[१] प्रवेशे[२] हस्तनापूर[३] ।
ते वेळीं त्या ऋषीचा कुमर । शृंगी नव्हता[४] आश्रमीं[५] ॥ ८३ ॥

---

नि गो , ध्यानस्तु तं ; ६ (–) ख पु४ , तो औं गो२ , परि मुं , परि त्या पु ; ७ बोलेना ख.

७८. १ बळत्कार धु गो·२ ; २–४ असतां सज्ञान हें घडे औं पु ; ४ असतां कीं नि.

७९. १ मोहिनीनें नि , मोहिनी मुं ; २ खीळीला पु४ , छळी मुं ; ३ गिरिवर ख ; ४ (–) नि ; ४–५ किमयामृग ख ; ६ रघुवीर औं ; ७ कपटपाश नि ( °पाशें स ) ख पु४ नां , °पाशें मुं तं , °पाशीं औं पु ; ८ संतोषें पु४.

८०. १ विभिचारा ख नां धु गो तं ; २ (–) नि ख पु४ मुं गो·२ रा ; ३ क्षोभे नि ; ४ परात्परा औं पु , परममारा गो२ तं ; ५ निरापेक्ष ख मुं औं पु धु गो·२ ; ६ संचरे ख ; ७ अविचारा मुं नां ; ८ आपुलियाचि नि , तो त्याचिया पु४ , तेची भरणेया ख , तयाचिया नां गो·२ तं ; ८–९ तैसें घडलें नृपातें मुं , तयाचिया प्रारब्धबळें पु , तया प्रारब्धाचिया बळें औं.

८१. १ वीसरु ख ; २ पावे धु ; ३ नरु धु.

८२. १ सुविदेही नि ; २ त्यासी मुं तं ; ३–४ ह्मणोनियां नि.

८३. १–३ नगरा आला राजेस्वर धु ; २ पावे नि , पावला तं , प्रवर्तें गो ; ४–५ नामें तयाश्रमीं गो·२.

तो[१] जमदग्नीसमान[२] कोपी । दुर्वासाहूनि सीघ्रशापी[३] ।
विश्वामित्रासमान[४] तपी । तेजें जैसा हुताश[५] ॥ ८४ ॥
त्या ब्रह्मदर्शनाचा नेम[१] । तो[२] सारूनि[३] द्विजसत्तम[४] ।
टाकूनि येतां निजाश्रम । वाटे[५] स्वाध्यायी[६] भेटला ॥ ८५ ॥
त्यासी विनोदें उपहासितां । तो ह्मणे गर्व न धरीं चित्ता ।
शृंगी तुझा पवित्र पिता । कंठीं वाहे शवातें[१] ॥ ८६ ॥
ऐकोनि क्षोभला अत्यद्भुत[१] । परी सांवरूनि पुसे वृत्तांत ।
कृश[२] ह्मणे गा नृपनाथ । परीक्षिति आला आश्रमा ॥ ८७ ॥
तेणें बोलवितां वचनीं । तपस्वी[१] न बोलेचि[२] मौनी[३] ।
यावरी गेला कंठीं सूनी[४] । मृतप्रेत[५] सर्पाचें[६] ॥ ८८ ॥
शृंगी ह्मणे पावेल केलें । आवडी घेतलें[१] मरण[२] मोलें ।
दाटूनि हळाहळ ग्रासीलें[३] । प्रतीति[४] तेथें[५] रोकडी ॥ ८९ ॥
ऐश्वर्यमदें चढला भ्रमा । नेणे सत्पुरुषाचा महिमा ।
आतां[१] धर्माचिया[२] धामा । बोळवीन[३] अविलंबें ॥ ९० ॥
ऐसें बोलोनि[१] क्रोधतवकीं[२] । तोय[३] घेतलें निज हस्तकीं[४] ।
शाप वदता जाला मुखीं[५] । अतिदारुण तो ऐका ॥ ९१ ॥

---

८४. १ **जो** औं ; २ **जमदाग्नि जैसा** धु ; ३ **सिघ्रतापी** गो·२ ; ४ **°मित्राहूनि** नि ; ५ **हुतांश** रा धु.

८५. १ **नियम** नि पु४ नां औं पु रा ; २ **ते** मुं गो·२ ; ३ (+) **येतां** मुं ; ४ **द्विजोत्तम** मुं गो२ ; ५ **मार्गी** धु ; ६ **सहाध्यायी** नि.

८६. १ **शिवभूषणें** औं पु.

८७. १ **अद्भुत** नि खवर्ग धु ; २ **कुश** पु४ , **तो** मुं , **ऋषि** औं पु तं.

८८. १ **रुषी** धु ; २ **नोबोले** धु , **नोबलेचि** तं ; ३ **मौनेंकरुनी** धु ; ४ **सूदूनी** नि पु४ मुं रा ; ५ **मृत्यप्रेत** ख नां पु गो·२ ; ५–६ **मृतसर्पाचें कलेवर** नि , **मृतसर्प सर्वांचे** पु·४.

८९. १ **घेतसे** गो ; १–२ **मरण घेतलें** नि खवर्ग (पु प्रसंप्रा); ३ **ग्रासिलें** रा ; ४ **प्रचीती** नि ख मुं गो·२ ; ५ **येथें** पु४ औं.

९०. १ **यावरी** धु ; २ (+) **निज** धु ; ३ **पाववीन** धु.

९१. १ **बोलोनिया** औं पु ; २ **°तवकें** नि खवर्ग ( **तवकें** औं पु ) गो ३ **उदक** नि खवर्ग ; ४ **हस्तकें** नि खवर्ग गो ; ५ **मुखें** नि खवर्ग गो.

आजिपासूनि सातवे दिवसीं । तक्षकदंशें मरण त्यासी ।
अन्यथा माझिया[1] वचनासी । करूं न शके हर[2] ब्रह्मा[3] ॥ ९२ ॥
यापरी[1] शाप[2] वदोनि रागें । आश्रमा आला[3] विहंगमवेगें ।
सर्प काढूनि[4] सर्वांगें । उदक हस्तें[5] स्पर्शिलें[6] ॥ ९३ ॥
यावरी[1] ध्यान विसर्जुनी । स्मृति पावला शमीक मुनि ।
वृत्तांत[2] जाणीतला[3] मनीं । न सांगतां[4] सर्वज्ञें[5] ॥ ९४ ॥
ह्मणे अनुचित केलें कोपें । राजहत्या जोडिली शापें[1] ।
राहटीमाजी[2] मनसंकल्पें[3] । काय न[4] करी प्राणियां ॥ ९५ ॥
निंद्यानिंद्य[1] कर्म[2] जितुकें । मनुष्यापासोनि घडे तितुकें ।
ह्मणोनि[3] विचारें[4] नरसात्त्विकें[5] । भूतद्रोहो[6] न[7] करावा ॥ ९६ ॥
विश्व हे[1] अवयव[2] आपुले[3] । तिहीं[4] केलिया[5] आपण केलें ।
ऐसें[6] साचार[7] जया कळलें[8] । तोचि[9] निश्चयें[10] जगदात्मा ॥९७॥
पराचे अपराध[1] करणें[2] क्षमा । हेंचि भांडवल तपियां आह्मां ।
क्रोध[3] धरिलिया अक्षमा[4] । अक्षमें[5] होती साधनें ॥ ९८ ॥

---

९२. १ माझे मुं गो·२ ; २–३ ब्रह्मा तं , विधाता गो२.

९३. १ यावरी गो ; २ श्राप औं ; ३ मातला पु४ ; ४ काहाडूनि धु ; ५ हातें पु४ गो·२ , हस्तीं नां ; ६ सिंचिलें नि.

९४. १ त्यावरी नि , यापरी गो ; २ व्रत्तांत पु४ , वृतांत नां ; ३ सांगीतला पु४ , जाणितला नि ; ४ संगत पु४ , संगता औं , संगेनी धु ; ५ संज्ञेनें नां.

९५. १ श्रापें औं ; २ राहटीपासोनि नि ; ३ संकल्पें धु ; ४ (–) तं.

९६. १ निंद्य औं पु ; २ कर्मे आहेति औं पु ; ३ यालागीं नि , (–) गो·२ ; ४ विचारी नि , (–) औं पु , अविचारें गो·२ ; ५ नरें सात्विकें नि ; ६ °द्रोह नि रा तं ; ६–७ विचारोनि भूतद्रोहो औं पु.

९७. १ हें पु·४ नां , (–) तं औं ; २ आवेव धु ; ३ आपुलें पु·४ ; ४ याहीं नि ; ५ केलियां पु४ धु तं , केल्या नां नि ; ६ ऐसे पु४ ; ७ विचार पु४ ; ८ कळले पु४ ; ९ तो ख गो·२ ; १० साचार ख , येक धु.

९८. १ अन्याय गो२ , अपरोक्ष ख ; २ करी औं पु , करावे गो ; ३ क्रोधें नि मुं औं पु तं ; ४ क्षमा मुं नां गो२ , आह्मां गो ; ५ अक्षम नि औं , अक्षये गो२ , अक्षेम ख मुं गो.

प्रजापाळक पवित्रमूर्ति[१] । ऐसा राजा विवेकसुमति[२] ।
शापिला[३] हें[४] पुढत[५] पुढती । खेद वाटे मज पुत्रा ॥ ९९ ॥
दशश्रोत्रियांसमान[१] नृपति । ऐसें बोलती[२] मन्वादि[३] स्मृती[४] ।
विशेष[५] हा परीक्षिति । पुण्यश्लोक[६] धर्मात्मा ॥ १०० ॥
राजे करिती द्विजपाळण[१] । त्यास्तव[२] निपजती[३] सकळ[४] यज्ञ ।
तेणें[५] देव संतोषोन । पर्जन्यातें[६] वर्षती[७] ॥ १०१ ॥
तेथूनि[१] औषधी[२] वनस्पती । बहुधा[३] अन्नातें[४] प्रसवती ।
त्यास्तव[५] सकळ[६] भूतें जीती[७] । हा पैं[८] धर्म रायाचा ॥ १०२ ॥
आह्मीं जोडिल्या[१] सुकृतधना । राजा स्वतंत्र विभागी जाणा ।
ह्मणोनि[२] शापणें[३] हें[४] प्राज्ञा । परम अश्लाघ्य[५] आह्मुतें[६] ॥ १०३ ॥
शृंगी ह्मणे तात[१] स्वामी । होणार बळिवंत जाणा तुह्मी ।
अशांत क्रोधिया दुर्नामीं । शब्द ठेवावा[२] कवणातें ॥ १०४ ॥

---

९९. १ **स्वधर्ममूर्ती** नि, **धर्ममूर्ति** ख, **मूर्ति** नां ; २ **विवेककीर्ती** नि, **परीक्षिति** मुं, **विवेकमति** तं : ३ **श्रापिला** औं पु ; ४ **हा** नि ; ५ **ऐकोनि** ख, (–) मुं. या पुढें गो·२ मध्यें पुढील १०४ ओवी आहे.

१००. १ °**श्रोतियांज्ञान** गो·२ ; २ **बोले** धु ; ३ **श्रुती** ख पु·४ औं रा धु ; ३–४ **आदिस्मृती** गो२, **श्रुतीस्मृती** गो; ५ **विशेषें** मुं पु तं ; ६ **पुण्यशील** तं.

१०१. १ °**पालन** नि तं ; २ **यास्तव** नि पु·४ औं रा तं, **ऐसे** मुं ; ३ **निफजती** औं पु, **कारिती** गो ; ४ **महा** नि, (–) पु४ ; ५ **यज्ञीं** नि ; ६ **प्रजंन्यातें** धु ; ७ **वर्षाविती** ख रा, **वृष्टिती** पु४, **वोपिती** गो.

१०२. १ **तेणें** धु तं ; २ **ओषधी** नि ; ३ **बहु** औं पु ; ३–४ **बहुधान्यातें** मुं ; ५ **यास्तव** नि पु४, **त्याचेनि** मुं ; ६ **सकळै** ख ; ७ **जिंती** नां तं ; ८ **स्व** औं.

१०३. १ **जोडल्या** नि, **जोडिल्यां** धु ; २ **यालागीं** नि ; ३ **शाप देणें** नि पु४ मुं नां, **श्राप देणें** औं पु ख ; ४ (–) नि खवर्ग ; ५ **हें आश्लाघ्य** पु४, **श्लाघ्य** नां गो·२ ; ६ **आह्मांतें** औं पु.

१०४. १ **ताता** नां गो·२ ; २ **ठवितां** मुं, **ठवणें** औं पु गो२, **ठेवा** रा नां गो तं. गो.२ मध्यें ही ओवी येथें नसून मागील ९९ पुढें आहे.

शमीक विचारी आपण । अन्यथा नव्हे[1] शृंगीचें[2] वचन[3] ।
आतां सांगोनि[4] सावधान । राजा केला पाहिजे ॥ १०५ ॥
ऐसें विचारूनि चित्तीं[1] । गौरमुखनामा[2] शिष्य[3] सुमति ।
वृत्तांत सांगोनि तयाप्रति । भूपभुवना[4] पाठविला[5] ॥ १०६ ॥
तेणें जाऊनि गजसाव्हया[1] । प्रवेशोनि महेंद्रालया ।
अवलोकूनि राजवैडूर्या । आसीर्वाद न ह्मणेची ॥ १०७ ॥
जनेश्वरें जोडल्या[1] हस्तीं[2] । भूसुर नमिला विनयभक्ती ।
रत्नपीठासनीं[3] उचितीं । अत्यादरें गौरविला ॥ १०८ ॥
अंगीकारूनि त्या[1] बहुमाना । ह्मणे चक्रवर्तीचूडारत्ना[2] ।
शमीकगुरूच्या[3] बोलिल्या[4] वचना । सांगों[5] तूतें पातलों ॥ १०९ ॥
प्रेरिला[1] असतां दुष्ट प्रारब्धें । आश्रमा आलासी मृगयानंदें[2] ।
तेथें अनुचित अप्रमादें[3] । आचरलासी[4] जें[5] कांहीं ॥ ११० ॥
तें म्यां[1] सर्वही[2] केलें क्षमा । परी[3] पुत्र माझा शृंगी नामा ।
तपोतेजें क्रोधप्रतिमा । न साहेचि तयातें ॥ १११ ॥

---

१०५. १ नोहे रा, न्हवे गो२ ; २–३ शृंगिवचन नां रा गो॰२ ; ४ पाहोनि पु४.

१०६. १ चीतिं पु४ ; २–३ गौरमुख शिष्य नाम औं पु ; ४ भूपभवना नि ; ५ पाठविलें धु.

१०७. १ °सावया नां गो॰२ , °साहावया धु.

१०८. १ जोडला ( जोडलां ) धु तं ; २ हातीं ख मुं औं पु धु ; ३ रत्नपाटीं बैसउनी गो , रत्नपाटासनीं गो२.

१०९. १ (–) ख मुं औं पु गो॰२ ; २ °शिरोरत्ना औं पु , गा राजचूडारत्ना धु ; ३ शमीकऋषि ख गो॰२ , °गुरूनें तं , °गुरूनीं रा , शमीकऋषींनीं नि , शमीक मुं ; ४ बोलिला ख गो॰२ ; ५ तें सांगों गो॰२.

११०. १ प्रेरिलें नि पु४ गो॰२ नां , प्रेरिल्या धु ; २ मृगयानादें नि ; ३ प्रमादें नि पु४ गो२ तं , प्रारब्धें गो ; ४ आचरलेंसी नि ; ५ तें पु४ , जो रा.

१११. १ मीं गो ; २ सकळ धु ; ३ (–) औं पु.

शापकर्वतें[1] सुतेजाळें[2] । छेदिलीं आयुष्यवल्लीचीं मुळें ।
ऐकतां सर्व सुखाचीं फळें । रक्षा होती येकदां[3] ॥ ११२ ॥
सप्तम दिवसाचिये[1] अंतीं । तक्षकर्दशनाचे[2] निघातीं[3] ।
मृत्यु[4] पावोनि सदनाप्रती । वैवस्वताचे जासील ॥ ११३ ॥
अन्यथा करावया ये[1] अर्थीं[2] । हरिहरब्रह्मयांची[3] शक्ती ।
अशक्त[4] ऐसें माझिये मती । आणि[5] श्रेष्ठांचे[6] गमताहे ॥ ११४ ॥
तथापि सावध होईं त्वरें । तक्षकविषबाधा परिहारे[1] ।
तोचि यत्न[2] बहुप्रकारें[3] । साधीं येर[4] सांडीं कां ॥ ११५ ॥
ऐसें सांगोनि[1] उठता[2] जाला । राजा चिंतार्णवीं पडिला ।
तऱ्हि[3] धैर्यें गौरविला । गौरमुख[4] मृदुवचनीं[5] ॥ ११६ ॥
शमीकचरणीं माझें मौळ । ठेविलें[1] सांग[2] सहस्रवेळ ।
माझिया अपराधाचें[3] फळ । याहूनि[4] विशेष पाहिजे ॥ ११७ ॥
स्वकृत[1] दोषें पावलों[2] व्यसना । तथापि दीनावरी करावी[3] करुणा ।
तेणें परलोकीं तऱ्हीं[4] गहना[5] । कल्याणातें पावेन ॥ ११८ ॥

---

११२. १ °कर्वत मुं रा ; २ तेजाळें नि पु४ , सुतेज झालें गो२ ; ३ येकाळीं पु , तेकाळीं औं.

११३. १ दिवसाचे नि ख गो·२ ; २ तक्षकदंश पु४ , °दंशाचे ख , °दशनाचा ( चां ) औं , °दंशनाचिये मुं नां ; ३ घातीं मुं औं , वातीं तं ; ४ मृत्य ख पु४ औं गो तं.

११४. १ चे ख नां ; १–२ यथार्थीं मुं , येदर्थीं धु गो , यदर्थीं गो२ ; २ आर्ति ख ; ३ °ब्रह्म यांची नि , °ब्रह्मादिकांची गो२ , °ब्रह्मादिकांच्या रा गो तं ; ४ नव्हे नि ; ५ (–) औं नां ; ६ श्रेष्ठांतेंही ख पु४ नां , श्रेष्ठांतें धु.

११५. १ परिहरे नि ख औं पु रा , उतरे गो·२ ; २ यत्नें स नां ; ३ बहुत प्रकारें गो·२ , बहुतां प्रकारें मुं औं पु ; ४ येरें स ख पु४.

११६. १ बोलोनि मुं ; २ जाता नि ख धु , निघता पु·४ मुं औं नां ; ३ तरी नि ख पु४ , परी गो२ ; ४ गौरमुखें ख पु४ नां ; ५ मृदवचनीं नां धु गो·२ , अमृतवचनीं औं पु.

११७. १–२ ठेविलेंसे ख ; २ सांगा नि नां ; ३ अपराधा सहस्र पु४ ; ४ त्याहूनि गो·२.

११८. १ सुकृत स , सकृत ख औं , सुश्रुकृत पु४ ; २ पातलों औं पु ; ३ केली ख ; ४ तरी नि ख मुं गो२ , (–) औं ; ५ जाणा औं.

असो[1] हें[2] बोळउनी[3] द्विजा । पाचारिल्या प्रधानप्रजा ।
पश्चात्तापानळें[4] राजा । संतापला बहुसाल ॥ ११९ ॥
ह्मणे होणार दुष्टकर्मा[1] । अवमानिलें ब्राह्मणोत्तमा ।
आतुडलों[2] मरणधर्मा[3] । अकस्मात ये[4] काळीं ॥ १२० ॥
केलिया कर्माचा प्रस्तावो[1] । ज्याचे हृदयीं नुपजे पाहा हो ।
तोचि[2] चांडाळवीर्य देहो । जन्मला[3] ऐसें[4] जाणिजे[5] ॥ १२१ ॥
श्वास[1] टाकावयापुरता । नाहीं अवकाश तत्वतां[2] ।
कवण साधन साधूं आतां । मोक्षपंथा[3] जें दावी ॥ १२२ ॥
कवण भेटेल[1] महानुभावो । कवण प्रगट[2] होईल देवो ।
कवण तीर्थ कवण ठावो । ठाकिल्या[3] अरिष्ट[4] नातळे[5] ॥ १२३ ॥
नाहीं ऐसा जोडला गुरु । जो मस्तकीं ठेवितांक्षणीं[1] करु ।
करी स्वरूपसाक्षात्कारू[2] । देहाभिमान[3] निरसूनी[4] ॥ १२४ ॥
अर्चिली नाहीं देवदेवता[1] । जी वो[2] देत[3] पावे[4] धांवा करितां ।
सर्वस्व वोढवी[5] आकांता । ऐसा मित्रही[6] असेना ॥ १२५ ॥

---

११९. १ ऐसें ख औं ; २ ऐसें धु तं , (–) औं नि ; ३ बोलवोनि नि गो , बोलोनि ख , बोळवोनि पु४ नां , बोलाउनी तं , बोलउनी पु गो२ , बोलोनियां औं ; ४ पश्चात्तापामुळें नि , निश्चयेंतापेंनळे पु४.

१२०. १ दुष्ट° पु धु ; २ अंतरलों ख , आंतुडलों औं पु तं ; ३ स्वर्गधामा ख , यमधामा मुं , मनोधर्मा औं पु ; ४ हे गो२.

१२१. १ प्रस्थावो धु तं ; २ तो ख औं रा धु ; ३–४ जन्मलासें रा गो२ ; ५ जाणावें धु.

१२२. १ स्वास पु४ नां धु गो ; २ पुरता ख ; ३ मोक्षपक्षा पु४.

१२३. १ भेटलिया औं पु , भेटोनि गो ; २ प्रघट गो२ ; ३ टांकिल्या पु४ औं गो२ ; ४ अनर्थ नि ; ५ नाशेल मु.

१२४. १ ठेवी तत्क्षणीं नि , ठेवितक्षीणीं पु४ गो२ , ठेवितां औं पु नां , ठेउनि अभयं धु ; २ विश्वासरूप° नि , स्वकीय साक्षात्कारू औं पु ; ३ °माना नि ; ४ सांडुनी नां.

१२५. १ कुळदेवता ख , ऐशी देवता नि ; २ ओ नि , (–) ख पु४ मुं ; ३ वदे पु४ , (–) मुं ; ४ (–) पु४ तं , धांवे गो२ ; ५ जोडवी धु , वोखटें या गो२ ; ६ मित्र औं पु तं , मी गेहीं पु४.

स्नानें नासी[1] मनोमळ । ऐसें तीर्थ[2] कोण[3] निर्मळ ।
आतळों नेदी[4] मृत्युकाळ । ऐसा योग[5] दुर्लभ ॥ १२६ ॥
आतां धैर्यचि[1] येक[2] सोयिरें । प्रारब्ध न चुके निजनिर्धारें ।
आपुलेनि[3] विचारें चतुरें । चित्त राखणें स्वस्थानीं ॥ १२७ ॥
पाठिमोरें मन[1] विचारा । तरी काय[2] उपदेसील[3] दुसरा ।
गुरु केलिया[4] हरिशंकरा[5] । बहिर्मुख[6] बोधेना[7] ॥ १२८ ॥
मी[1] आत्मा अज[2] अविनाशी । देह तवं[3] नैश्वर्य[4] निश्चयेंसी ।
आतांचि मृत्यु[5] ग्रासो त्यासी । कां[6] वाचलें[7] असो[8] प्रारब्धें ॥१२९॥
माझिया अनुभव निजनिधाना[1] । सांडणें शरीर[2] सांडिलें[3] जाणा ।
तें वरपडें[4] हो[5] मृत्युश्वाना[6] । कां[7] संचलें[8] असो[9] कां[10] ॥१३०॥
परी या उभय संमंधाकडे[1] । पाहतां वरपडा[2] होई न पीडे[3] ।
जन्ममृत्याचें[4] सांकडें । जीवीं[5] जडे[6] नसतेंची ॥ १३१ ॥

---

१२६. १ **नासे** नि गो·२ ; २–३ **कोणतें तीर्थ** धु ; ४ **न सके** खवर्ग धु ; ५ **सोयरा** नि.

१२७. १–२ **धैर्य येकचि** ख औं तं ; ३ (+) **च** मुं नां , (+) **चि** पु.

१२८. १ **चित्त** धु ; २ **कां** गो·२ ; २–३ **उपदेश काये करील** पु४ ; ३ **उपदेश करील** धु ; ४ (+) **ही** नि ख औं धु ; ५ **हारिहरा** धु ; ६ °**मुखें** नां धु ; ७ **बाधेना** ख तं.

१२९. १ (–) गो·२ , **मोक्ष** तं ; २ **आजी** स पु४ , **आज** धु , (–) ख तं ; ३ **तरी** नि खवर्ग , **तो** गो२ ; ४ **नश्वर** नि , **नैश्वर** औं पु स , (++) रा ; ५ **सुखें** औं पु ; ६ **कीं** ख धु ; ७ **वांचला** नि गो औं ; ८ (–) नि ख नां औं रा गो , **असे** पु·४ गो२ तं.

१३०. १ °**निर्धना** पु , **निजधना** औं ; २ **देह** धु ; ३ **सांडलें** ख नां , **सांडल्या** औं पु ; ४ **वर पडूनि** नि , **वरपड** ख पु मुं , **वरपडों** नां , **वरपडा** औं ; ५ (–) नि ख पु धु , **कां** नां ; ६ **श्वुकरश्वाना** औं पु ; ७ **किं** ख ; ८ **सांचलें** पु४ ; ९ **असे** ख गो२ ; १० **हें** नि मुं , **तैसेंची** धु.

१३१. १ **संबंधा°** नि मुं तं ; २ **वरपडें** ख , **वरपडो** पु४ , **वर पीडा** नि , **वरपड** मुं गो·२ ; ३ **पडे** पु४ गो२ ; ४ °**मृत्यूचें** नि ख मुं धु ; ५ **जीव** ख , **जीवें** पु४ ; ६ **जड** नि.

ह्मणोनि[1] शरीरसंमंध[2] कांहीं । मज[3] सर्वथा[4] नाहीं[5] नाहीं ।
मी अनादी मुक्त[6] पाहीं । सर्वसाक्षी जगदात्मा ॥ १३२ ॥
ऐसें[1] आपुलिया मना । विवेकें आणिजे[2] समाधाना ।
हेचि ज्ञानियाची संज्ञा[3] । वेदांतवेत्ते[4] बोलती ॥ १३३ ॥
श्रीशुकमुखें श्रवण केलें । तें आजि[1] मनानें[2] उपेगा[3] आलें ।
निजध्यासें[4] पावतें[5] केलें । साक्षात्कारपर्यंत[6] ॥ १३४ ॥
भागवत[1] जालें[2] इये[3] संधी । ज्ञानदानें[4] करुणैकजलधि[5] ।
शुकयोगींद्र द्वादशस्कंधीं[6] । अनुवादला परमार्थ ॥ १३५ ॥

---

१३२. १ ह्मणौनि औं पु ; २ °संबंध नि तं , °संबंधेसी मुं ; ३ मजसि पु४ नां , मजला पु ; ४ सर्वथैव पु ; ५ बाधीत औं पु , ( – ) ख नां ; ६ मुक्ति स ख पु४.

१३३. १ ऐसोनि तं ; २ आणिलें औं ; ३ सुविचारणा औं , सज्ञाना पु ; ४ वेदांतवक्ते पु४ , वेदांतमत्तें औं पु , वेदांततत्त्वें गो.

याच्यापुढें नि मुं मध्यें पुढील ओव्या आहेतः—

तंव अकस्मात तो ज्ञानार्क । प्रगट झाला हो श्रीशुक ।
कारवेसि श्रीभागवतपुस्तक । आईक म्हणे नृपवर्या ॥ १३३ अ ॥
रायें साष्टांग अभिवंदन । करोनि षोडशोपचारीं पूजन ।
एकाग्र करोनियां मन । श्रवण करिता पैं झाला ॥ १३३ आ ॥

१३४. १ तया नि , अज ख , मज गो ; २ मनन औं पु , आजि गो , ( – ) ख ; ३ उपेक्षा ख , उपयोगा तं ; ४ °ध्यास ख गो२ ; ५ पावे तें ख गो२ ; ६ साक्षात्कारा° तं.

१३५. १ श्रीभागवत नि मुं औं पु ; २–३ जालिये ख नां , जाली पु४ ; ४ ज्ञानध्यानें औं पु४ , ज्ञानदिनकर नां , ज्ञानज्ञानीं धु ; ५ करुणैकानिधी नि नां औं पु , करुणानिधी ख मुं ; ६ °स्कंदीं ख मुं नां औं पु गो२ तं.

अठरा सहस्र विष्णुचरित्र[1] । परमार्थरसाचें[2] पीयूषपात्र[3] ।
श्रवलें[4] शुकाचें पवित्र[5] वक्त्र[6] । विश्वश्रोत्र निववावया[7] ॥ १३६ ॥
असो तें[1] भारतचि[2] ऐका । प्रधानप्रजा[3] नरनायका ।
राक्षिते जाले त्या कौतुका । आर्तें[4] सज्जनीं परिसावें ॥ १३७ ॥
इति श्रीभारते[1] आदिपर्वणि । कथा स्वर्लोककल्लोलिणी[2] ।
श्रवणाचमनें[3] मुक्तेशवाणी[4] । मुक्तिफळ दे श्रोतियां ॥ १३८ ॥

इति श्रीभारते आदिपर्वणि सप्तमोऽध्यायः ॥

---

१३६. १ कृष्णचरित्र औं, वीरचारित्र तं ; २–३ परमार्थपीयूषरसाचें पात्र रा गो·२ ; ४ श्रवणें नि रा ; ५ (–) पु४ ; ५–६ मुखपवित्र पु ; ६ वग्त्र ख गो२ तं ; ७ निववाया नि पु४, निववाव्या पु धु तं.

१३७. १ हे औं पु ; २ भारती कथा औं पु, भागीरथी गो२, भारतीं ख पु४ ; ३ प्रजा प्रधान नि खवर्ग ; ४ आर्त पु४ मुं औं गो.

१३८. १ श्रीभारत नि धु, श्रीभारथे गो२ ; २ °कल्लोळणी पु·४ ; ३ श्रवणेमननें मुं, श्रवणाचेमनन औं पु, श्रवणाचेने तं ; ४ मुक्तेश्वराची वाणी औं पु, मुक्तेश्वरवाणी मुं, मुक्तीशवाणी रा तं.

॥ श्री ॥

# अध्याय आठवा

## श्रीगणेशाय नमः

आप्तविषई[१] प्रजाप्रधानी[२] । ऋषि ब्राह्मण[३] तपोधनी[४] ।
राजा[५] रक्षिते[६] जाले[७] यत्नीं[८] । कवणे परी[९] तें ऐका ॥ १ ॥
गगनचुंबितस्तंभावरुतें । उपरिगृह[१] निर्मिलें निरुतें[२] ।
राजा रक्षिला[३] तेथें[४] । प्राण जैसा ब्रह्मांडीं ॥ २ ॥
कृपणीं[१] आवडी निज अर्थातें । विरक्तीं[२] सर्वदा[३] मनेंद्रियातें ।
सत्यशीळ[४] दृढ नियमातें । रक्षी[५] तैसा रक्षिला ॥ ३ ॥
औषधमूळिका[१] मंत्रयंत्रें[२] । भूर्जसुवर्णताळपत्रें[३] ।
सूत्ररक्षा[४] गरुडस्तोत्रें[५] । स्तंभागारीं[६] बांधिलीं ॥ ४ ॥
जपा बैसविले[१] जपी । तपश्चर्या मांडिली तपीं ।
व्रतारंभीं मनसंकल्पीं । नवस बहुतीं[२] नवसिले ॥ ५ ॥

---

१. १ °विषयी नि , °विषयीक औं पु , °विषय गो ; २ °प्रधान नि , प्रधान प्रजानी ख , प्रधानी औं ; ३ ब्राह्मणी मुं नां रा गो२ ; ४ °धन नि ; ५ राजासि नि ; ६–८ रक्षिती करोनि यत्न नि ; ९ रीती नि.

२. १ °रिकागृह नि , °रिकाग्रह पु४ धु स , °ग्रह ख नां तं रा , गृह निर्मळ गो·२ ; २ बहुतें पु४ , तेथें औं गो२ ; ३ संरक्षिला नि नां रा , रक्षित औं ; ४ ठेले निरुते औं , यत्नें बहुतें गो२.

३. १ कृपण ख मुं धु , कृपीण गो२ , कृपणा औं ; २ विरक्त ख मुं औं ; ३ सदां नि ख मुं नां ; ४ सत्वसीळ धु रा ; ५ रक्षिती ख नां औं पु तं , रक्षिते पु४.

४. १ औषधें° मुं धु , औषधी मांत्रिकी औं , जैं औषधमुळी लावी तं ; २ यंत्रमंत्रें नां , यंत्रतंत्र मुं , यंत्रमंत्र औं पु ; ३ भूर्जेंसुवर्णताडपत्रें ख , भूर्जेंसुवर्णताडपत्र औं पु , भूर्जें° नां रा धु गो·२ ; ४ °रक्षकें औं ; ५ °स्तोत्र मुं औं पु ; ६ स्तंभावरूनि नि , स्तंभावरी ख , स्तंभापरिघी औं , स्तंभापारीं पु.

५. १ बैसले नां ; २ बहुत औं पु.

अश्वत्थसेवे[१] लिंगार्चना । ब्राह्मण घातले अनुष्ठाना ।
राजा रक्षावया नाना । यत्न[२] केले[३] समस्तीं ॥ ६ ॥

स्तंभवेष्टित असंख्यात । प्रधान सेना[१] जन[२] समस्त ।
रक्षित[३] ठेले[४] जेथें पंथ । पिपीलिका[५] ते[६] सिरेना[७] ॥ ७ ॥

सप्तम[१] दिवस होतां[२] प्राप्त[३] । मात फांकली पृथ्वीआंत[४] ।
देशवासी[५] जन समस्त । येते जाले बहु पंथीं ॥ ८ ॥

कश्यप नामा धन्वंतरी । औषध मंत्रसिद्ध[१] सामग्री[२] ।
घेऊनि चालिला त्वरें[३] करीं[४] । राजा प्रतापें जिववावया[५] ॥ ९ ॥

ह्मणे जो[१] जगाचा[२] प्रतिपाळिता । त्याचा होईन[३] प्राणदाता ।
कीर्ती[४] धर्मा[५] आणि अर्था । श्रेय[६] मोक्षही[७] पावेन ॥ १० ॥

पाय[१] लागे न लगे[२] क्षिती । पंथ आक्रमी[३] ऐसिया गती[४] ।
पुढां[५] देखिला[६] कपटमूर्ति[७] । ब्राह्मणवेशें[८] तक्षक ॥ ११ ॥

---

६. १ °शेवे पु४ , °शवा नां , °सेवा ख मुं औं पु धु गो ; २–३ यत्नें केलें पु ४.

७. १–२ जन सेना नि ; ३ रक्षक ख , वेष्टित नि ; ४ ठेविले ख ; ५–६ पिपीलिकेचा नि , पिपीलिकेतें ख पु४ मुं नां , पिपीलिकातें गो तं ; ५–७ पिपीलिकाही स्पर्शेना औं , पिपीलिका न स्पर्शे पु ; ७ सरेना नि.

८. १ सप्त औं ; २ नव्हता औं पु ; ३ त्वरित औं ; ४ पृथ्वींत औं ; ५ देशवासिये औं पु.

९. १ मंत्रीसिद्ध नि , मात्रासिद्ध औं पु , °सिध पु४ तं ; २ सामोग्री नां पु धु गो२ ; ३–४ त्वरा करी नि ; ५ जिववाव्या गो धु.

१०. १ (–) पु४ मुं औं ; २ जगा नां पु रा तं , गो गो , जगातें औं गो२ ; ३ (+) मी धु गो ; ४ यश औं पु ; ५ कीर्ति औं पु , धर्म नि ख पु४ नां गो·२ ; ६ श्रेयें धु ; ७ मी धु , क्षेमही नां , सर्वथा औं पु.

११. १ पाये धु पु४ , पावो गो·२ तं ; २ लागे नि ख मुं पु रा धु तं ; ३ क्रमी नि पु४ रा ; ४ रीती पु४ मुं नां गो·२ ; ५ पुढें नि खवर्ग तं ; ६ ठेला मुं , भेटला नां ; ७ मूर्ति नां ; ८ °वेषें नि , °वेष नां तं.

सर्प[1] विद्यार्थी घनदाट । माजी आचार्यत्वें[2] श्रेष्ठ ।
वेशधारी[3] महापापिष्ठ । राजहिंसना[4] चालिला ॥ १२ ॥
सत्वर गमन कश्यपाचें । देखोनि उरगीं[1] तर्किलें साचें ।
ह्मणती[2] श्रेष्ठ हो द्या आमुचें । आसीर्वचन आदरें[3] ॥ १३ ॥
फणींद्र पुसे ब्राह्मणस्वामी[1] । बहु[2] लगबगां[3] जातसां तुह्मी ।
कवण[4] कार्य[5] कवण[6] ग्रामीं । स्वार्थ किंवा परमार्थ[7] ॥ १४ ॥
बोलाविलें किं पाठविलें । किंवा गमन सहजार्थिलें[1] ।
सांगो ये तरी सांगीतलें । पाहिजे आह्मां यथार्थ ॥ १५ ॥
वैद्य धन्वंतरी गुणिया[1] । ह्मणे[2] जाणें गजसाव्हया[3] ।
महद्व्यसन[4] संप्राप्त[5] राया । त्या परिहाराकारणें ॥ १६ ॥
तक्षकभयाचा काळज्वर । स्पर्शलासे[1] राजशरीर ।
तें मी करावया विज्वर[2] । मंत्रऔषधें[3] नेतसें ॥ १७ ॥

---

१२. १ **सर्व** ख नां ; २ **आचार्यत्व** नां औं पु ; ३ **वेषधरी** नां ; ४ °**हिंसे** पु४ मुं , °**हिंसेसि** धु तं.

१३. १ **उरगें** नि पु धु तं ; २ **ह्मणे** नि पु·४ मुं औं गो·२ ; ३ **येकाळीं** धु तं.

१४. १ **नागरस्वामी** तं ; २ अति नि ; २–३ **बहुसाल** मुं ; ४–५ **कवणा कार्या** ख , **कवण कार्या** नि स मुं रा ; ६ **कवणे** धु तं ; ७ **परमार्था** औं पु रा.

१५. १ **सहजार्थिलें** ख , **सहजचि केलें** नां. औं मध्यें चरण ३–४ **मूळ धाडोनि आणिलें । रायें अथवा प्रधानीं ॥** असे आहेत. या ओवीचे ३–४ चरण जोडून औं मध्यें नवी ओवी केली आहे ती अशीः—

**किंवा आप्तवर्गीं पाचारिलें । किं साक्षपेंचि चालिले ।**
**सांगो ये तरी सांगितलें । पाहिजे आह्मां यथार्थ ॥ १५ अ ॥**

१६. १ **गुणियां** पु४ मुं नां धु गो·२ ; २ (+) **सहज** ख ; ३ **राजसाव्हया** औं पु ; °**साह्वया** रा गो·२ ; ४ **महाव्यसन** गो·२ ; ५ **प्राप्त** नां औं मुं गो·२ तं.

१७. १ **स्पर्शलें असे** धु तं ; २ **विगतज्वर** नां ; ३ **मंत्रौषधी** नि पु·४ मुं औं , **मंत्रसाधनें** ख.

तक्षक ह्मणे तक्षकविख[1] । उतारिया[2] असाध्य बोलती[3] लोक ।
तें[4] परिहारिसी[5] हें कौतुक । कैंवि साचार[6] मानावें ॥ १८ ॥
तो ह्मणे प्रतीत[1] दावीन विश्वा । तक्षकविषाचा[2] केतुला[3] केवा ।
मृडें[4] क्ष्वेड[5] ग्रासिलें[6] हांवा । तेंवि ग्रासीन[7] विषबाधा ॥ १९ ॥
पर्वताचें गुरुत्व[1] गहन । दंभोळिधारा[2] पाकशासन ।
भेदी तैसें[3] विष छेदून । वांचवीन नृपातें ॥ २० ॥
संकटें[1] कार्तवीर्यस्मरणें[2] । दरिद्र[3] पार्थिवलिंगार्चनें ।
दोष नासती हरिकीर्तनें । तेंवि नासीन विषबाधा[4] ॥ २१ ॥
पडिला नाहीं माझिये दृष्टी । तवंचि[1] तक्षकविषाची[2] गोष्टी ।
चमत्कार दावीन[3] भृष्टीं[4] । अमोघ मंत्रविद्येचा ॥ २२ ॥
रोगी[1] दुःखी[2] संकटीं[3] अडले[4] । ते[5] कृपेनें पाहिजे सांभाळिले[6] ।
हेंचि विद्येचें फळ बोलिलें । पुण्यपुरुषीं शास्त्रज्ञीं ॥ २३ ॥

---

१८. १ °विष नि मुं ; २ उतरणें नि , उतारावया ख नां , उतार पु४ गो·२ , उतारिवों तं , उताराव्या औं पु , उतारा रा ; ३ ह्मणती नि खवर्ग ((–) ख) ; ४ हे नि , (–) मुं , (+) तूं पु४ ; ५ हरिसी नि , परिहारिसी ख औं रा गो तं ; ६ साच पु४ तं.

१९. १ प्रतीती नि पु४ गो·२ रा , प्रचीति नां तं , प्रचीत ख मुं ; २ °विखा नां , °विषा पु·४ औं , तक्षकभयाचा धु ; ३ केउता मुं , कितुला पु४ ; ४–५ अगस्तिसमुद्र ख , मृडेश्वरें गो·२ ; ६ प्रासी ख , पातलें पु४ ; ७ प्रासीन ख.

२०. १ गरुडत्व तं ; २ दंभोळिधर नि ; ३ जैसे नि पु४.

२१. १ संकट ख रा मुं गो (× × गो२) , संकटीं नां औं पु धु ; २ कार्ति° ख नां औं रा धु गो , कार्तिकवीर्य° पु४ मुं ; ३ दारिद्र पु४ मुं, दरिद्री औं पु , दरिद्रें धु ; ४ विषधारा तं.

२२. १ तंवरी ख , तवंवरी पु ; २ तक्षकभयाची धु ; ३ दाखवीन नि ; ४ सृष्टीं नि.

२३. १ रोग पु४ मुं रा गो·२ , रोगें ख ; १–२ रोगदुःखें नि ; २ दुःख धु तं ; ३ संकट नि ; ४ पडिलें नि ख मुं औं , पडिले पु·४ नां , आडले धु तं ; ५ तें नि ख मुं औं ; ६ सांभाळिलें नि ख मुं औं.

देखोनि बोलाचा पुरुषार्थ । भोगीश[1] चरणा लावी हात ।
तक्षक तो मी मूर्तिमंत । काळमृत्यु रायातें[2] ॥ २४ ॥
जीवविसील[1] जनेश्वरातें[2] । हे मज[3] प्रतीत दावीं[4] येथें[5] ।
रहस्य सांगणें[6] असे[7] तूतें । तें[8] मग[9] पुढां[10] अनुवादों[11] ॥ २५ ॥
ह्मणोनि न्यग्रोध[1] वनस्पती । तक्षकें मूळ[2] स्पर्शतां[3] दांतीं[4] ।
प्रळयज्वाळा[5] धडकोनि[6] क्षिती[7] । भस्म जाला क्षणार्धें[8] ॥ २६ ॥
उष्णता सरलियावरी[1] देख । वैद्यें येकवटुनि[2] राख ।
अभिमंत्रितां[3] तात्काळिक । वट दुपानीं[4] निघाला ॥ २७ ॥
पाहात[1] असतां[2] तेचिक्षणीं । शाखोपशाखीं फळीं[3] पानीं ।
वृक्ष विस्तारला[4] गगनीं । शकुंतनीडांसमवेत ॥ २८ ॥
चमत्कारूनि महाव्याळ । वारंवार डोलवी मौळ ।
ह्मणे धन्य[1] तो[2] गुरु[3] जेणें[4] प्रबळ । विद्या[5] ऐसी[6] दीधली ॥२९॥
आतां गुणिया[1] सिरोमणी[2] । यथार्थ सांग[3] मजलागोनी ।
सकाम किंवा निःकाम[4] मनीं । जीवऊं जासी नृपातें ॥ ३० ॥

---

२४. १ **भोगेश** औं पु , **भोजीगीश** धु ; २ **रायाचा** धु.

२५. १ **जीवविसी** ख औं धु ; २ **नरेश्वरातें** नि ; ३ (–) नि खवर्ग ; ४ **दाखवीं** नि ख पु४ नां ; ५ **मातें** नि खवर्ग धु , ६–७ **सांगेन गा** मुं ; ७ **आहे** औं पु ; ८ (–) नां औं ; ९ (–) पु४ ; १०–११ **सांगेन पुढारें** ख , **पुढारें अनुवादें** पु४ ; ११ **अनुवादें** नां धु गो , **अनुवादुं** नि.

२६. १ **क्रोधें** औं पु ; २ **मूळीं** नि मुं ; ३ **स्पर्शला** गो·२ ; ४ **हातीं** ख ; ५ **प्रबळज्वाळा** मुं ; ६–७ **धडके निगुतीं** गो२ ; ८ **क्षीणार्धें** पु४.

२७. १ **सरालियां** ख ; २ **येकवाटिलि** नि खवर्ग धु ; ३ **अभिमंत्री** नि ; ४ **तद्रूप** ख.

२८. १–२ **तंव पाहतां** नि खवर्ग ; ३ **फळें** गो·२ तं ; ४ **विस्तारिला** नि पु४ मुं.

२९. १ (–) नि मुं औं ; २–३ **गुरू तो** नि , **धन्य** गो·२ ; ४ (–) नि धु ; ५–६ **जेणें ऐसी विद्या** नि धु.

३०. १ **गुणियां** नि नां धु ; २ **शिरोमणी** नि औं पु तं ; ३ **सांगें** नि खवर्ग ( नां प्रसंप्रा ) ; ४ **निष्काम** नि खवर्ग.

राजा ब्रह्मशापाभिभूत[1] । क्षीणायुषी[2] जाण निश्चित ।
विद्यावीर्य न करीं व्यर्थ । जोडलें येश[3] न दवडीं ।। ३१ ।।
रायापासूनि[1] फळाशा मनीं । ते मी पुरवीन अनंतगुणीं ।
दुराग्रहातें[2] सांडूनि[3] । परत[4] वेगीं[5] सुजाणा ।। ३२ ।।
ऐकोनि सर्पमुखींची[1] गोष्टी । ब्राह्मण दिव्यज्ञानदृष्टी[2] ।
पाहे तवं यथार्थ पोटीं । जाणवला पुरुषार्थ[3] ।। ३३ ।।
गतायुषी[1] रावो[2] निश्चित । मी कां विद्या करूं व्यर्थ ।
काद्रवद्रव्यें[3] पुरवोनि[4] स्वार्थ । अवश्य जावें[5] स्वस्थाना ।। ३४ ।।
मग ह्मणे ऐक[1] नागनाथा । ग्रहस्त[2] आह्मां कुटुंबवंतां ।
दरिद्रातुल्य दुसरी व्यथा[3] । ये संसारीं असेना ।। ३५ ।।
दरिद्रें[1] जीतुचि[2] प्रेत जाण । दरिद्रें[3] योग्यता तृणासमान[4] ।
दरिद्रें[5] विद्यासमुद्र द्रोण । द्रुपदें[6] छळूनि दवडिला ।। ३६ ।।

---

३१. १ ब्रह्मशापा भीत ख , °शापें भयाभीत गो२ ; २ क्षणायुसीं , क्षणायुष्यी पु ; ३ यश नि मुं तं.

३२. १ तया° औं पु ; २ आतां दुरा° औं ; ३ (+) मनीं गो२ ; (+) देख गो२ ; ५ वेगें मुं नां.

३३. १ °मुखींच्या नि ; २ ज्ञानदिव्यदृष्टी नां ; ३ पुरुषार्थें नां ; वेष्यार्थ नि.

३४. १ °युष्यी ख पु४ ; २ राव नि पु४ औं , सर्व पु , राजा ख ; काद्रव्य° औं पु रा , कांद्रव्य पु४ गो·२ , काद्रव्यें ख , काद्रव नि ; उपार्जवुनी मुं ; ५ जाऊं औं पु धु.

३५. १ (–) मुं , गा धु ; २ गृहस्थां नि , ग्रहस्तां खवर्ग , ग्रहस्था ; ३ वेथा ख धु तं , व्यथा पु४. नां मध्यें ही ओवी नाहीं.

३६. १ दरिद्री खवर्ग गो·२ , दरिद्र धु ; २ जितुचि तं , जीताचि खवर्ग ( औं प्रसंप्रा ) ; ३ दरिद्र ख नां पु धु , दरिद्री पु४ मुं गो·२ ; ४ त्रुणा° गो , तृण° नि ; ५ दरिद्री ख औं गो·२ , दरिद्र पु धु ; ६ द्रुपदें नां पु धु. पु मध्यें या ओवीच्या पूर्वी पुढील संस्कृत श्लोक आहेः—

दरिद्रो व्याधितो मूर्खः प्रवासी नीचसेवकः ।
जीवन्तोपि मृताः पंच व्यासेन परिकीर्तिताः ॥

दरिद्रें उदास पुत्र दारा । दरिद्रें[1] सुहृद पाठिमोरा ।
दरिद्रें[2] नैषधयुधिष्ठिरां । रानोरान[3] भवांडिलें[4] ॥ ३७ ॥

दरिद्रें[1] श्रेष्ठ कर्मठ[2] वेशी[3] । दरिद्रें[4] परमार्थ जनाची दासी[5] ।
दरिद्रें गांजिले वनतापसी । धनिकद्वारां[6] धांवती ॥ ३८ ॥

उपकार[1] लावूनि[2] नृपनाथा[3] । दरिद्रशत्रूच्या[4] करणें घाता ।
किंबहुना अर्थस्वार्था— । लागीं जातों यथार्थ ॥ ३९ ॥

तक्षक ह्मणे माझिया धना[1] । नाहीं[2] मर्यादा[3] ब्राह्मणा ।
नेई शरीरआंगवणा[4] । घेई इछा[5] आपुलिया[6] ॥ ४० ॥

ह्मणोनि पृथ्वीगर्भीचें बीळ । उघडूनि दाविलें सागरातुल्य[1] ।
कनक आणि महीमौल्य[2] । रत्नीं[3] भरलें[4] अपार ॥ ४१ ॥

पन्नग सेवकांचे सिरीं । मांदुसा देऊनि सहस्रवेरी[1] ।
ब्राह्मण पावउनी[2] घरीं । यावें ऐसें[3] आज्ञापी ॥ ४२ ॥

---

३७. १ दरिद्रा ख ; २ दरिद्री पु४ ; ३ °रानें पु४ , राणोरार्णी नां गो२ ; ४ फिरविलें ख , हिंडविलें मुं , दवाडिलें गो२.

३८. १ दरिद्र ख मुं नां औं धु गो , दरिद्री पु४ गो२ ; २ मर्कट नां , कर्मट पु४ तं , कर्मा गो·२ ; ३ वेसीं गो·२ पु , वंशीं मुं ; ४ दरिद्र मुं नां औं पु धु गो २ ; ५ रासी ख ; ६ धनिकांधारा पु४ , धानिकां° नि.

३९. १–२ उपकारुनी गो·२ ; ३ नृपाचे माथां नि , नृपमाथां औं ; ४ दरिद्रें शत्रूच्या ख पु४ तं. यापुढें औं मध्यें पुढील ओवी अधिक आहेः—

दरिद्रियासी नसे आदरू । हेळनछळन शब्द कठोरू ।
नाहीं सन्मान वाक्य मधुरू । इतर व्यवहारू तेथ कैंचा ॥ ३९ अ ॥

४०. १ मनां पु४ ; २–३ मर्यादा नाहीं नि खवर्ग ; ३ (+) रे नि खवर्ग ; ४ °अवगणा नां ; ५ इच्छें नि , इत्सा पु४ ; ६ आपुली पु४ तं.

४१. १ समुद्रातुल्य धु ; २ महामौल्य नि ; ३ रत्नें नि ख मुं औं पु गो·२ ; ४ भरिलीं नि गो·२ औं ख.

४२. १ सहस्रवेऱ्हीं तं , °वरी नि खवर्ग , °भरी गो ; २ पाठउनि नां धु गो , पाठविता करूनी औं ; ३ वेगीं ख.

देउनी कनकरत्नाचा[१] गिरी । स्वदेशा धाडिला[२] धन्वंतरी[३] ।
पुढें तक्षक सहविखारीं[४] । हस्तनापुरा[५] पातला ॥ ४३ ॥
सूर्य पावतां अस्ताचला । साधूनि ऐसिया सायंकाळा ।
सर्पांसि[१] ह्मणे अत्यंत जवळा । मृत्युसमयो[२] रायातें ॥ ४४ ॥
ब्राह्मणवेशें तुह्मीं[१] सकळीं । सीघ्र[२] जावें रायाजवळीं ।
पत्रीं पुष्पीं[३] दिव्यफळीं । महाप्रसाद[४] भेटवा[५] ॥ ४५ ॥
आज्ञा[१] मागोनि नरेंद्रातें । सत्वर[२] जावें स्वस्थळातें[३] ।
पुढां वर्तेल[४] तें[५] तुह्मांतें[६] । जाणवेल सहजची[७] ॥ ४६ ॥
आछादूनि विशाळ तनु । आपण जाला कीटक अणु[१] ।
फळगर्भीं रिघाला प्राणु । ग्रासावया नृपाचा ॥ ४७ ॥
कृत्रिम ब्राह्मणाचा[१] वेश । धरूनि करिती[२] वेदघोष ।
तपोवनींचे[३] महातापस[४] । रक्षा करूं पातले ॥ ४८ ॥
पातले[१] स्तंभालयानिकटीं[२] । देखती मंत्रविद्येच्या[३] थाटी ।
गारुडी[४] विद्या जाणते[५] श्रृष्टी[६] । पंचाक्षरी[७] सभोंवते[८] ॥ ४९ ॥

---

४३. १ °रत्नांचे नि औं पु गो ; २ पाठविला पु , धाडी नां ; ३ धन्वांतरी पु४ धु गो ; ४ सहपरिवारीं औं पु धु ; ५ °पूर नां औं पु.

४४. १ सर्प गो२ ; २ °समय नि (स प्रसंप्रा), मृत्य° धु , मृत्यसमयें पु४.

४५. १ आह्मीं गो॰२ , (+) ब्राह्मणीं पु४ ; २ शीघ्र नि औं पु रा तं ; ३ पुस्पीं धु ; ४–५ महाप्रसादें भेटावें धु गो॰२.

४६. १ अज्ञा ख नां गो ; २ सीघ्र ख ; ३ स्वस्थानातें नि , स्थळातें ख ; ४ वर्तोलिया औं मुं , वर्तलें तं ; ५ (–) पु४ मुं नां औं पु ; ६ निरुतें नि , तें ख , जेथें पु४ , वृत्तांतातें मुं नां पु , वृत्तातें औं ; ७ सहजेंचि ख मुं नां औं गो॰२.

४७. १ सानु ख पु , यानु पु४.

४८. १ ब्राह्मणाचें रा धु ; २ करित ख रा तं ; ३ तेणें वनींचे ख ; ४ तापस पु॰४ नां.

४९. १ तंव मुं , आले धु ; २ स्तंभानिकटीं ख ; ३ मंत्रवेदाचिया ख ; ४ गरुड औं पु , (+) मंत्र नां ; ५ जाण ख ; ६ दृष्टी नि , श्रेष्टीं तं ; ७–८ रक्षा करूं पातले नां. औं पु मध्यें ४९–५१ ओव्यांची अदलाबदल.

गदक[1] भिषक[2] आणि तपी । प्रतिज्ञा करोनि बैसले जपीं[3] ।
त्यांतें देखोनि छद्मरूपी[4] । हास्य करिती परस्परें[5] ॥ ५० ॥
नृपा[1] जाणवती प्रधान[2] । दुरी तीर्थींचे[3] तपोधन[4] ।
पातले असती जी[5] दर्शन । इच्छितातीं स्वामींचें[6] ॥ ५१ ॥
रायें पाचारिले जवळिके[1] । फळें[2] दर्भ[3] तीर्थोदकें[4] ।
प्रसाद देतां[5] पैं हस्तकें[6] । मस्तकावरी वंदिला[7] ॥ ५२ ॥
प्रत्युत्थानीं अभिवंदनीं[1] । गंधपुष्पदक्षणादानीं[2] ।
ब्राह्मण गौरवुनि[3] वचनीं । बोळविले स्वस्थाना[4] ॥ ५३ ॥
मग अमात्यमंत्रियाचेनि[1] मेळें । मित्रांसि बोले गदारोळें ।
तापसीं[2] आणिलीं फळें । ते[3] समस्त[4] स्वीकारूं[5] ॥ ५४ ॥
पवित्र[1] पक्वें आणि सुवासें[2] । भरलीं पीयूषाचेनि रसें ।
सिद्धप्रसाद[3] सेवितां निरसे । दोषदुरित[4] आमुचें[5] ॥ ५५ ॥

---

५०. १ **गणक** नि ; २ **भिष्मक** ख ; ३ **जपी** मुं नां गो॰२ ; ४ **वेषरूपी** नां ; ५ **विनोदें** गो२. ही ओवी औं पु मध्यें नाहीं.

५१. १ **राया** औं पु ; २ **सेवकप्रधान** नि ; ३ **तीर्थाचे** नि पु धु ; ४ **ब्राह्मण** गो२ ; ५ (–) खवर्ग ( **जे** ख ) ; ६ **स्वामीयां** मुं.

५२. १ **जवळिक** औं पु ; २ **फळ** नां औं पु गो॰२ ; ३–४ **दर्भी तीर्थो॰** नि , **गर्भ तीर्थो॰** मुं , **प्रसाद तीर्थोदक** औं पु ; ५ **वोपितां** धु ; ६ **हस्तक** औं पु ; ७ **वंदिलीं** मुं गो॰२.

५३. १ **॰वंदुनी** खवर्ग ( ख प्रसंप्रा ) ; २ **गंधाक्षतादक्षणा देउनी** मुं , **॰दक्षिणा॰** नि तं पु४ ; ३ **गौरविले** पु४ ; ४ **स्वस्थळा** नि ख पु४.

५४. १ **आतया मंत्रि॰** पु४ , **आद्यंत मंत्रि॰** तं ; २ **तापसीयें** नि ख पु॰४ , **तपस्वीं** गो॰२ ; ३ **तीं** नि , **तीं हो** धु तं ; ४ **समस्तीं** नि ख गो॰२ ; ५ **स्वीकारावीं** नि.

५५. १ **पवित्रें** पु४ नां धु तं ; २ **सुरसें** ख मुं ; ३ **साधुप्रसाद** रा ; ४–५ **दोष त्वरित आमुचा** नि. नां मध्यें दुसरा चरण **द्विजमंत्रीसुहृद्विलासें** असा आहे. गो॰२ मध्यें ही ओवी नाहीं.

सकळां[1] विभाग वोपिले[2] पंक्ती । स्वकीय भाग घेतला भक्ती[3] ।
ज्यामाजी तक्षकाची वस्ती । तें[4] फळ हाता[5] पातलें[6] ॥ ५६ ॥
फोडूनि अंतर जवं न्याहाळी । तवं[1] माझारी देखे[2] कीटकआळी[3] ।
घेऊनि साक्षपें[4] करतळीं । दाखवीत[5] सर्वांतें ॥ ५७ ॥
आंग तयाचें ताम्रवर्ण[1] । काजळा[2] ऐसे[3] काळे[4] नयन[5] ।
पाहोनि ह्मणे ऐका वचन । जे[6] वाग्देवी[7] अनुवादे ॥ ५८ ॥
सप्तम दिवस तवं[1] लोटला । तक्षकभयाचा विटाळ फिटला ।
ऋषीनें[2] शापिलें त्याही बोला । करूं साचार थोडेनी ॥ ५९ ॥
कीटक भाऊनि तक्षक । ग्रीवास्थानीं स्पर्शउं[1] मुख ।
इतुकेनि[2] शृंगीचेंही वाक्य । जाणों[3] यथार्थ[4] फळलें हें[5] ॥ ६० ॥
ह्मणोनि[1] कीटक लाविता कंठीं[2] । धुधुकारला[3] महाफुफाटीं[4] ।
काळसर्प घातली आंठी[5] । मृत्युपाशासारिखी[6] ॥ ६१ ॥
नासिकीं[1] धूम्राचे कल्लोळ । मुखीं धांवती[2] महाज्वाळ ।
निमिषामाजि प्रचंड व्याळ । होऊनि ग्रीवा वेढिली[3] ॥ ६२ ॥

---

५६. १ **सकळ** पु गो·२ तं ; २ **वोपिला** नि खवर्ग ; ३ **हातीं** नि ख मुं नां ; ४ **तेंच** नि ; ५ **हातां** नि तं , **आतां** पु४ , **हातीं** गो२ ; ६ **पावले** औं पु , **पावेल** पु४.

५७. १ (–) नि ; २ **देखिली** औं ; ३ °**अळी** नि मुं नां गो·२ तं ; ४ **साक्षेपें** नि ( स प्रसंप्रा ) पु४ तं नां , **अक्षेपिली** मुं ; ५ **दाखवितसे** पु धु.

५८. १ **तांब्र**° नां गो२ ; २ **काजळ** धु , **कज्जला** मुं ; ३ **ऐसें** मुं धु ; ४ **काळें** धु , (–) मुं , **दिसती** औं ; ५ **वदन** मुं धु ; ६ **जों** नि ; ७ **वाग्देवता** पु.

५९. १ **तों** मुं धु तं , **पैं** पु४ गो ;२ **रुसीनें** पु४ धु औं.

६०. १ **स्पर्शावुनि** नां पु ; २ **इतुकेन** पु गो·२ ; ३ **जाणूं** नि , **जाणे** मुं , **जाण** नां , **जाणोनि** औं पु ; ४ **साचार** धु ; ५ **हो** नां औं , **सें** धु.

६१. १ **जाणोनि** नि , **ह्मणौनि** औं पु ; २ **होंटीं** औं ; ३ **धुधुःकारिला** नि , **तवं तो धुधुकारें** औं , **धुधुकारें** धु ; ४ **तो फुंफाटी** नि , **फुफाटीं** खवर्ग ; ५ **मिठी** नि , **आटी** ख मुं रा गो·२ , **आठी** पु४ तं ; ६ **मृत्य**° धु तं.

६१. १ **नाशिकीं** मुं नां औं ; २ **निघती** गो२ , (–) औं ; ३ **फोडिली** नि , **वोढिली** पु४ औं तं , **वेष्टिली** गो·२.

उडिया टाकोनि पळाले आप्त[1] । येक पहातांचि जाले प्रेत ।
येक पळतां[2] होती[3] मूर्छित । ठाईं[4] ठाईं[5] उलथले ।। ६३ ।।
कंठीं झोंबतां[1] कडकडाटीं[2] । ज्वाळा उठिल्या[3] धडधडाटीं[4] ।
नगरवासी[5] कोट्यानकोटी । भयें लंघिती[6] दशादिशा[7] ।। ६४ ।।
धैर्यें[1] परतोनि पाहती[2] दुरी । तवं अर्ध शरीर गगनोदरीं ।
अर्ध पसरलें पृथ्वीवरी । विशाळ[3] काळसर्पाचें ।। ६५ ।।
पद्मवर्णी[1] महाभीम । भेदित जातसे व्योम ।
प्रळयमेघगर्जनेसम[2] । घर्घराटें[3] गर्जतु ।। ६६ ।।
इंद्रधनुष्यासारिखा[1] गगनीं । जातां[2] लोक देखती नयनीं ।
हाहाकार सकळां[3] वदनीं[4] । हृदय[5] पिटिती हस्तकें[6] ।। ६७ ।।
वीज पडोनि भंगला तरु । तैसा निमाला राजेश्वरू ।
ऋषी[1] ह्मणती अनर्थ थोरू । नाहीं[2] ऐसा[3] वर्तला ।। ६८ ।।
राजदेह[1] उपरिकाधाम[2] । विषानळें जालें[3] भस्म ।
कल्पांतसमयासारिखें[4] विषम । प्रजांतें[5] गमलें ते काळीं ।। ६९ ।।

---

६३. १ **समस्त** गो·२ ; २–३ **पळतांही** ख औं , **पळतां हो** पु४ नां रा , **पळतांचि** गो·२ , **पळत पळत** नि ; ४–५ **ठायीं ठायीं** नि.

६४. १ **झोंबला** गो·२ ; २ °**कडाटी** नि ; ३ **निघती** नि , **उठल्या** ख नां रा गो२ तं , **धडकल्या** औं , **झोंबल्या** पु ; ४ **घडघडाटी** औं , °**धडाटी** नि ; ५ °**वासिये** ख पु४ औं ; ६ **उलंघिती** ख मुं औं पु , **लपती** गो ; ७ **दशातें** औं , °**दिशांतें** पु.

६५. १ **मयें** नि खवर्ग ; २ **पाहतां** नि पु४ मुं नां , **पाहात** पु ; ३ **विषाळ** मुं गो२.

६६. १ **पद्मवर्णा** तं ; २ °**गर्जनासम** गो२ ; ३ **घरघराटें** गो२ , **घर्घाटे** तं. ही ओवी नि खवर्ग मध्यें नाहीं.

६७. १ °**सारिखें** नां औं पु ; २ **जन** गो२ ; ३–४ **सकळ जनीं** नां ; ५ **टाळी** तं ; ६ **सकळीक** मुं.

६८. १ **रूसी** पु४ , **रुषी** धु औं ; २–३ **ऐसा नाहीं** मुं नां औं पु.

६९. १ **राजदेहो** नां गो२ ; १–२ °**देहोपरिकाधाम** नि ; ३ **जळे** तं ; ४ °**सारिखा** ख पु४ मुं गो ; ५ **प्रजांसि** रा गो·२ तं.

बाप ब्रह्मशापाची थोरी । राजा भस्मला[1] सहशरीरीं[2] ।
जाणते पुरुष हो संसारीं । ब्राह्मणक्षोभ[3] न[4] घ्यावा[5] ॥ ७० ॥
ब्रह्मशापें श्रीकृष्णासहित[1] । यादवकुळासि जाला अंत ।
ब्रह्मशापें भस्मभूत[2] । कार्तवीर्य[3] वंशेंसीं[4] ॥ ७१ ॥
ब्रह्मशापें शक्रसंपत्ती । पडिली समुद्रा आतौती ।
ब्रह्मशापें दंडक[1] नृपति । परिवारेंसीं भस्मला[2] ॥ ७२ ॥
भगांकित[1] सहस्रनेत्र । सलांछन रोहिणीमित्र ।
ब्रह्मशापें दासीपुत्र । यम जाला भूलोकीं[2] ॥ ७३ ॥
कपिलशापें[1] वैश्वानरें[2] । सगर जळतां[3] वर्षसहस्रें[4] ।
भगीरथभक्तीं[5] तुष्टोनि[6] हरें[7] । गंगादानें[8] उद्धरिले ॥ ७४ ॥
ब्रह्मशापें सर्पत्व नहुषा । सरडदेहो[1] नृगनरेशा[2] ।
ब्रह्मशापें[3] मुख्य महेशा । लिंगपतन निर्धारें ॥ ७५ ॥
श्रोतयांतें[1] नमस्कार । वक्ता करी वारंवार ।
ब्राह्मण क्षोभे[2] तो प्रकार । नाचरावा कोण्हीही[3] ॥ ७६ ॥

---

७०. १ **भस्म जाला** पु तं गो·२ ; २ **सहशारीरीं** नि ; ३ **ब्रह्मक्षोभ** ख पु४ मुं नां गो२ , **ब्रह्मशाप** रा गो ; ४–५ **हा भावा** पु४ , **नेघावा** पु तं.

७१. १ **श्रीकृष्ण°** पु गो२ तं ; २ **भस्मीभूत** नां तं ; ३ **कार्तिवीर्य** ख मुं नां रा गो·२ ; ४ **वंशासीं** नि ( **कार्तवीर्यवंशेसी** स ) पु.

७२. १ **दंड** औं पु ; २ **भस्म जाला** ख धु गो२ तं.

७३. १ (+) **जाला** धु ; २ **त्रिलोकीं** तं.

७४. १–२ **°शापवैश्वानरें** नि ; २ **वैंश्वानर** पु·४ औं गो·२ तं ; ३ **दाहिले** औं , **नलगतां** पु ; ४ **°सहस्र** पु·४ गो·२ तं , **साठसहस्र** औं ; ५ **°भक्तीनें** मुं औं , **°शक्ती** पु ; ६–७ **शंकरें** मुं , **अनुष्ठानतत्पर** गो·२ ; ७ **हार** पु·४ औं ; ८ **गंगा देवोनि** मुं.

७५. १ **सरटदेहो** नि , **सर्पदेहो** नां ; २ **नृघ°** ख , **मृग°** औं पु , **नृप°** गो ; ३ **ब्राह्मणशापें** गो·२.

७६. १ **श्रोतियांते** नां धु , **°यांसी** पु४ ; २ **क्षोभ** पु४ धु नां ; ३ **कोणींही** नि.

नि खवर्ग मध्यें ७४–७५–७६ ओव्यांचा क्रम ७५–७६–७४ असा आहे.

योग्यायोग्य ब्राह्मणजाती । घडे[१] तरी पूजणें[२] यथाशक्ति[३] ।
न[४] टके[५] तरी हो[६] निंदापंथीं । जिह्वा वर्तों[७] नेदणें[८] ॥ ७७ ॥

असो ब्राह्मणशापें[१] देखा । परीक्षिति गेला विष्णुलोका[२] ।
पात्र[३] जाले दुःखशोका[४] । प्रजा प्रधान संमंधी[५] ॥ ७८ ॥

मिळोनि ऋषी[१] थोरथोर । अमात्य मंत्री विवेकचतुर ।
राजपदीं[२] राजकुमर । अभिषेकिला[३] ते काळीं ॥ ७९ ॥

जन्मेजयो राज्यासनीं[१] । संस्थापिला बाळपणीं ।
प्रबुद्ध जाला दिनींदिनीं[२] । चंद्रवृद्धीसारिखा ॥ ८० ॥

पूर्वजपुण्यें[१] पूर्वपुण्यें[२] । सत्संगतीसद्भावमनें[३] ।
स्वधर्मपंथीं वर्ततां[४] जाणें[५] । सिद्धी होती वोळगण्या[६] ॥ ८१ ॥

सकळ विद्या कळासहित[१] । बत्तीस लक्षणीं[२] अळंकृत[३] ।
विवेकन्यायें[४] यशपुरुषार्थ । वसता[५] जाला[६] त्यापासीं ॥ ८२ ॥

---

७७. १ **थोडें** तं; २ **पूजावें** नां, **पूजन** पु४, **पूजण** तं; ३ °**भक्ती** गो; ४–५ **नाहीं** नि; ५ **टाके** ख नां औं धु गो·२; ६ (–) नि ख मुं औं पु; ७ **आतळों** पु, **चालों** धु; ८ **नेदावी** नि ख मुं धु, **न देणें** रा.

७८. १ **ब्रह्मशापें** पु; २ **येमलोका** धु; ३ **पुत्र** औं पु; ४ **शोकदुःखा** नि पु४ मुं; ५ **संबंधी** नि तं.

७९. १ **रुषिगण** धु; २ **राज्यपदीं** पु४ रा; ३ **अभिषेखिला** पु·४, **अभिशेचिला** धु.

८०. १ **राजस्थानीं** मुं; २ **दिनेदिनीं** ख औं गो·२ तं, **दिनादिनीं** नां रा.

८१. १ °**पुण्य** नि पु·४ नां तं; २ °**पुण्य** पु·४ औं नि; ३ °**सद्भावनें मन** नि, °**सद्भावनेनें** ख, °**सद्भावें नमन** औं पु, °**सद्भावनामनें** धु, °**सद्भावपूर्णें** मुं; ४ **वर्तों** ख; ५ **जाण** नि पु·४ नां औं धु तं; ६ **वोळंगण्या** नि ख मुं औं पु तं. ही ओवी गो२ मध्यें नाहीं.

८२. १ **सकळासहित** नि खवर्ग; २ **लक्षणें** नि; ३ **सालंकृत** धु गो२; ४ **विवेक न्याय** नि रा; ५–६ **वसतीं झालीं** नि.

व्रतबंध जालियावरी । विवाहविचारपरीक्षाचतुरीं ।
सुवर्णवर्मनृपाची[1] कुमरी । वपुष्टमा या नांवें[2] ॥ ८३ ॥
आर्तें[1] पाणिग्रहणविधी । वरिता जाला लावण्यनिधि ।
आंदणा[2] वोपिल्या समृद्धी । पैं मर्यादे[3] वेगळ्या ॥ ८४ ॥
दास दासी वारण रथ । असंख्यात[1] वाजी[2] साळंकृत ।
शकट[3] खरोष्ट्र[4] बळवंत[5] । श्वेतप्रयुतें[6] वृषभांचीं[7] ॥ ८५ ॥
सवछ[1] सुदोहा[2] धेनु महिषी[3] । सुवर्णदिव्यरत्नांचिया[4] रासी ।
निवेदिल्या कुरुरायासी । काशीश्वरें[5] उदारें ॥ ८६ ॥
वपुष्टमेसी[1] पुरवी[2] आर्त[3] । सरीं[4] प्रफुल्लीं[5] क्रीडा करित ।
पुरुरवा[6] उर्वसीयुक्त । तैसिया[7] शोभा शोभत[8] ॥ ८७ ॥
प्रति[1] रूपें[2] कंदर्पमूर्ति । कुरुप्रवीर[3] लाहोनी[4] पति[5] ।
वपुष्टमा[6] अक्षयप्रीती[7] । वल्लभेंसी[8] रममाण[9] ॥ ८८ ॥

---

८३. १ **सुवर्णवर्ण°** स ख मुं औं धु गो·२ , **सुवर्णसर्व°** पु ; २ **नामें** नि ख पु४ नां गो·२.

८४. १ **आर्ते** नि , **आर्त** तं ; २ **आंदणें** गो तं , **आंदण्या** ख पु४ ; ३ **मर्यादा** ख धु.

८५. १ **असंख्य** ख मुं गो तं पु , **अश्वयातीं** औं ; २ (–) **औं** ; ३ **शकटें** पु४ ; ४ **खरोष्ठ** औं, (+) **दिव्य** पु ; ५ **बळिवंत** औं पु धु तं ; ६ **शत°** नि ( **स्वेत°** स ) , **स्वेत°** ख , **शतप्रयुत** गो , **°प्रयुत** गो२ ; ७ **वृषभादि** ख , **वृषभातें** पु४.

८६. १ **सवत्स** नि पु·४ औं तं ; २ (–) गो ; ३ **म्हैसी** ख गो२ ; ४ **सुवर्णरत्नाचिया** नि मुं पु औं ; ५ **काशेश्वरें** ख पु४ नां औं गो.

८७. १ **°मेची** नि ; २ **पुरवित** गो·२ ; ३ **अर्थ** ख ; ४ **सिरीं** ख पु४ मुं नां गो , **शिरीं** पु , **शिखरीं** गो२ , **शरीं** रा ; ४–५ **सरितापुलिनीं** औं ; ५ **प्रफुलीं** पु ; ६ **पुरिरवा** नां औं पु रा धु गो·२ ; ७ **तैसी** ख , **तैसा** मुं ; ८ **शोभती** नि , **शोभतसे** रा.

८८. १ **प्रदीप्त** नि , **प्रतिपु** ख , **प्रतिपा** मुं , **प्रतिप** पु४ रा गो·२ तं ; १–२ **रतिसुरूप** औं ; २ **रूप** पु ; ३–५ **तेवीं कुरुप्रवीर नृपति** औं ; ६ **वपुष्टमेसि** ख औं ; ७ **अक्षयप्राप्ति** ख , **°प्रती** पु४ ; ८ **वल्लभासीं** नि मुं ; ९ **रममाणे** पु४ गो·२.

पंडुनृपातुल्य[1] पुरुषार्थी । विश्वीं विस्तारित[2] कीर्ती ।
जन्मेजय पवित्रमूर्ति[3] । राज्य[4] चालवी[5] स्वधर्में ॥ ८९ ॥
पुढें कैसी वर्तली कथा । ते आणावी श्रवणपंथा[1] ।
शौनकादि ऋषी[2] समस्तां । सौति बोले आदरें[3] ॥ ९० ॥
इति श्रीभारत[1] आदिपर्व । झाडित ग्रंथकथेचें[2] गर्व ।
अपूर्वाही[3] अति[4] अपूर्व[5] । दोषदाहक[6] अवधारा[7] ॥ ९१ ॥
श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमरु[1] । मुक्तेश्वर कविकिंकरु ।
सज्जनांचा[2] अभयंकरु[3] । कथाकौतुक[4] वदावया[5] ॥ ९२ ॥

इति श्रीभारते आदिपर्वणि अष्टमोऽध्यायः ॥

---

८९. १ **पांडु**° नि ; २ **विस्तारली** नि ख मुं , **विस्तारतां** पु४ ; ३ °**नृपती** नि ; ४–५ **चालवी राज्य** औं पु.

९०. १ °**पथा** नि मुं ; २ **रुषी** पु४ औं धु ; ३ **सादरें** ख पु४ मुं गो२ तं.

९१. १ **श्रीभारते** पु४ मुं नां , **भारथे** गो२ ; २ °**कथांचे** पु रा तं गो२ , °**कर्त्यांचें** धु , **श्रीमदाचे** मुं ; ३–५ **तें हें अपूर्वाही अपूर्व** नि , **ते ही अपूर्वा अपूर्व** खवर्ग ( **संतसज्जनीं असो भाव** मुं ); ६–७ **मुक्तेश्वर कवि वदे** मुं. नि मध्यें २ व ३ चरणांची अदलाबदल.

९२. १ **श्रीदत्तांघ्रियुगीं भ्रमर** नि ; २ **सज्जनदयेचा** मुं , **सज्जनाचिया** नां , **सज्जनाचाचि** धु , **सज्जनयांचा** पु गो२ ; ३ **अभयकर** नि मुं पु गो२ ; ४ **कथा कौतुकें** खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) रा त ; ५ **वदाव्या** ख गो२ तं.

॥ श्री ॥

# अध्याय नववा

## श्रीगणेशाय नमः

शौनकादि[1] ऋषेश्वर[2] । नैमिषारण्यवासी[3] थोर[4] ।
तपी[5] संयमी[6] योगेश्वर । प्रश्न करिती आदरें ॥ १ ॥
ह्मणती लौमहर्षणकुमरा[1] । वक्तयांमाजी चतुरेश्वरा[2] ।
कथा आणुनि विस्तारा[3] । विशद सांगें आम्हुतें ॥ २ ॥
कैसें[1] आस्तीकाचें जनन । सत्रीं[2] सर्पकुळाचें[3] दहन ।
केव्हडे[4] समर्थ[5] ते[6] ब्राह्मण । जे ऋत्विज[7] ते[8] यागीं[9] ॥ ३ ॥
कैसीं मंत्रबीजें तेजाळीं[1] । पाताळ पेटाराची[2] सगळीं[3] ।
उसळोनि सर्पांचीं वेटाळीं[4] । कुंडीं पडलीं[5] अपसया[6] ॥ ४ ॥
हेंचि सांगें सविस्तर । अवधान भुकेलें[1] असे[2] थोर ।
सौति[3] करूनि[4] नमस्कार । सांगता[5] होय[6] संतोषें[7] ॥ ५ ॥

---

१. १ श्रीशौनकादि नि ; २ रुषे° औं पु४ धु ; ३ °वासिये पु·४ गो·२ °रण्यीं औं ; ४ थोरथोर औं गो ; ५ तपस्वी गो·२ ; ६ नेमी गो·२ , संयती धु.

२. १ लौमहर्षणी कुमर नि ; २ °श्वर नि ; ३ विस्तार नि.

३. १ ऐकें मुं ; २ कैसें पु ; ३ (+) जालें औं ; ४ केवढे नि गो·२ नां , केव्हडें औं पु , केवढें पु४ ; ५ सामर्थ्यें औं , सामर्थ्य पु·४ ; ६ (–) नि गो२ नां ; ७ रित्विज ख , रुत्विज औं पु४ रा धु गो२ ; ८ त्या नि ; ८–९ तयालागीं पु४ , यज्ञालागीं पु ; ९ योगी ख.

४. १ ते काळीं मुं रा गो२ , तेजागळीं तं ; २ पेठाराचीं रा गो , पाठारिचीं नां , पेटारियाचीं धु ; ३ समुळीं ख , सकळीं औं ; ४ पेटाळीं औं पु ; ५ पडती धु ; ६ आपैसीं औं पु गो·२.

५. १–२ भुकेलेंसें नि पु·४ मुं गो·२ , भुकेलें नां औं ; ३ तवं सौति धु तं ; ४ करी धु तं , रुषि औं ; ३–४ सौतिक ऋषि ख पु ; ५–६ करुनी सांगे औं ; ७ तयांतें नि.

जरत्कार[१] तपस्वी[२] थोर । भ्रमत असतां देशांतर ।
गर्तेमाजी आपुले पितर । अधोवदनें[३] देखिले ॥ ६ ॥
तीहीं[१] आज्ञेनें[२] नेमिला[३] देख[४] । वंश वाढवीं आवश्यक[५] ।
तेणें अक्षई ब्रह्मलोक[६] । प्राप्त होती[७] आम्हुतें[८] ॥ ७ ॥
यालागीं दारार्थी आपण । करिता[१] जाला[२] पृथ्वीअटन[३] ।
गर्जोनि ऐसें यथार्थ वचन । जाणवीत[४] जगातें ॥ ८ ॥
जरत्कारी नाम[१] परिपाठी[२] । कन्या असेल जयाचे[३] पोटीं ।
ते मज द्यावी भिक्षेसाठीं[४] । वचन कानीं[५] ऐकतां ॥ ९ ॥
मी वृद्ध आणि[१] द्रव्यहीन[२] । देवों न सकें[३] अशन[४] वसन ।
आज्ञा भंगितां जाईन । त्यागुनियां तात्काळ[५] ॥ १० ॥
ऐसें वचन ऐकोनि कानीं । अविचार[१] ऐसें[२] मानूनि मनीं ।
उदासीन करोनि कोण्ही । प्रत्योत्तरही[३] नेदिती[४] ॥ ११ ॥

---

६. १ जरत्कारी पु४, °त्कारु नि गो·२ तं ; २ ऋषि ख ; ३ अधोवदन नि गो तं.

७. १ त्यांहीं नि, तेहीं पु·४ नां मुं ; २ आज्ञा नि, आज्ञेन गो·२, आज्ञें ख मुं औं पु ; ३ नेमिली नि ; ४ देखा नि तं ; ५ आवश्यका नि ; ६ °लोका नि ; ७ होईल नि मुं नां, होऊन धु तं ; ८ पैं आम्ही धु तं.

८. १–२ करीत असतां ख ; ३ पृथ्व्याटन पु·४ औं, पृथ्व्यटन स, पृथ्वीपर्याटन गो२ ; ४ जाणवी तूं नि, जाणवितु स औं पु, जे पावितु गो·२.

९. १ नामा गो·२ ; २ °पाटी नि, °पाटीं नां औं पु गो, प्रपाठीं धु, प्रपाटीं तं ; ३ जयाच्या नि औं पु तं, जयातें ख ; ४ °साटीं स खवर्ग ( मुं प्रसंप्रा ) धु गो तं ; ५ कांहीं पु.

१०. १ दरिद्री औं ; २ शक्ति औं, दरिद्री हीन मुं, दरिद्र हीन पु ; ३ शकें ख पु४ मुं औं गो२ ; ४ आसन पु·४ मुं औं गो·२, अन्न धु ; ५ तत्काळीं नि ख गो·२.

११. १–२ अविचारी औं ; ३ प्रत्योत्तर हें पु४, प्रत्युत्तरही नि ( स प्रसंप्रा ) ; ४ न देती नि ख.

देवलोका[1] आणि[2] भूतळा । शोधोनि[3] शोधिलें पाताळा ।
तेथेंहि[4] परि[5] संकल्प[6] फळा[7] । येतां[8] मार्ग दिसेना ॥ १२ ॥
मग उभा ठाकोनि[1] काननीं । ह्मणे पितर[2] हो ऐका श्रवणीं ।
उत्तीर्ण होतों[3] तुमचे[4] रुणीं[5] । येके[6] वाक्यें करूनियां ॥ १३ ॥
तुमचे गांठी असेल पुण्य । तरी सेवटील[1] माझें वचन ।
सुफळ होऊनि[2] कन्यादान । करू[3] कोण्ही मजलागीं ॥ १४ ॥
पाहिजे तितुका यत्न केला । आतां उत्तीर्ण तुमच्या बोला ।
ह्मणोनि येकदां गर्जिनला[1] । हाक मारूनि आक्रोशें[2] ॥ १५ ॥
जरत्कारी नाम जीतें[1] । कन्या भगिनी असेल ज्यातें ।
ते मज भिक्षेलागीं येथें । आणूनि देणें येकाळीं[2] ॥ १६ ॥
ऐसी ब्राह्मणमुखींची हांक । ऐकते जाले दंदशूक[1] ।
वासुगीतें[2] तात्काळिक । जाणविलें समस्तीं[3] ॥ १७ ॥
श्रवण होतांची पन्नगराजा । शृंगारूनि[1] पवित्र अनुजा ।
जरत्कारी आणूनि[2] द्विजा । निजहस्तकीं[3] वोपिली[4] ॥ १८ ॥

---

१२. १ °लोक नि नां मुं धु ; १–२ देवलोकाहुनि औं ; ३ साधोनि पु४ ; ४–५ परी तेथेंही नि , तेथेंही खवर्ग ; ६–७ मनोसंकल्प सफळा औं ; ८ होता औं.

१३. १ राहोनि औं पु ; २ पितृ नि पु·४ नां रा गो·२ , पित्रु ख ; ३ होतां ख पु·४ ; ४ तुमच्या नि गो·२ , तुमचा ( तुमचां ) ख रा धु तं ; ५ ऋणीं नि मुं औं तं ; ६ येक नि खवर्ग ( पु प्रसंप्रा ).

१४. १ शेवटील नि पु४ मुं ( स प्रसंप्रा ) ; २ करोनि मुं ; ३ करूत नि.

१५. १ गर्जिन्नला नि पु४ गो२ ; २ आकाशीं धु तं.

१६. १ जियेतें धु , निकें पु४ ; २ मजलागीं ख.

१७. १ द्वंदशूक पु४ मुं नां धु गो२ , द्वंद्वशुक औं पु , दंशाक रा , दत्तशूक गो , दंतशूक तं ; २ वासुकीतें नि ख औं रा गो२ तं ; ३ ते काळीं नि पु·४ मुं नां , ते वेळीं औं , सर्पांनीं ख.

१८. १ शृंघारूनि पु४ नां ; २ अर्पूनि नि ; ३ °हस्तकें मुं औं ; ३–४ दिधली ते हातीं ख ; ४ विधली औं पु.

ह्मणे हे माझी कनिष्ठ[1] भगिनी । लक्ष्मीसमान लावण्यखाणी[2] ।
स्वामीनें[3] करूनि स्वधर्मपत्नी । ग्रहस्तधर्में[4] वर्तावें[5] ॥ १९ ॥
ऋषि[1] ह्मणे हे समर्थदुहिता । रूपतारुण्यभूषणयुक्ता[2] ।
अंगिकारूनि विनितता[3] । नम्र वर्तलें पाहिजे ॥ २० ॥
ह्मणिजे[1] जातीची पद्मिणी । परी[2] गुणसंस्कारें[3] सर्पिणी ।
वाढली[4] सदन्नभोजनपानीं । वस्त्राभरणीं सुखाडें[5] ॥ २१ ॥
समर्थ माहेरींचें बळ । तेणें स्त्रिया उत्सृंखळ ।
भर्तार[1] मानूनि गोळांगुळ । अव्हेरिती सर्वस्वें ॥ २२ ॥
बंधुभाग्यें[1] सगर्व[2] मनीं । अमर्यादेनें[3] उद्धत गुणी ।
वर्ततां शापूनि ततक्षणीं[4] । भस्म करीन यथार्थ[5] ॥ २३ ॥
भरणपोषणउद्योग[1] । स्पर्शों नेदी[2] आपुलें अंग ।
अवज्ञा करितां करीन त्याग । हा निर्धार सर्पेशा ॥ २४ ॥
वासुगी[1] विनवी ब्रह्मविदा[2] । मीचि पुरवीन[3] सर्व संपदा ।
सनाथ[4] करणें[5] भाग्यमंदां । सर्पा आह्मां निजसंगें[6] ॥ २५ ॥

---

१९. १ लावण्य औं पु ; २ लावण्यगुणी नि खवर्ग ( स्वरूपगुणी औं ) ३ स्वाभिणी नि ; ४ ग्रहस्ताश्रमीं औं पु , गृहस्थ° नि तं ; ४–५ ग्रहस्त हा स्वधर्म वर्तता ख.

२०. १ रुसी पु४ , रुषि धु ; २ रूपलावंण्य° नां ; ३ विनयता स रा , वीनताता धु , विनतता नां , विनता ख मुं , व्निता नि.

२१. १ म्हणे हे नि ख पु४ , ह्मणे जे मुं ; २ गुणजा ख ; ३ संस्कारें ख , संस्कारें हे धु , गुणें संस्कारें पु४ , °संस्कार नां औं ; ४ वाढविली पु४ ; ५ सुरवाडे खवर्ग रा.

२२. १ भ्रतार नि ख मुं नां , भर्ता रा धु.

२३. १ °भाग्य ख नां , °योग्यें मुं ; २ सर्वस्व औं पु ; ३ अमर्यादे ख नां , अमर्याद औं ; ४ तत्क्षणीं नि पु ; ५ क्षणार्धें ख.

२४. १ °उदेग पु४ , उद्वेग स मुं ; २ नेंदी पु४ नां , नेदीं धु.

२५. १ वासुकी नि औं रा गो॰२ ; २ ब्रह्मवृंदा स पु४ औं ; ३ पुरवीं ख पु४ ; ४ सभाग्य मुं औं पु ; ५ करावें नि ; ६ निजांगें औं पु.

आम्हुची भगिनी ऐश्वर्यरासी[1] । परि हे[2] तुझी[3] विक्रीत[4] दासी ।
अणुमात्र[5] चुकलिया पाहिजे तैसी । सिक्षा[6] करणें स्वामिया ॥ २६ ॥

स्वीकारूनि प्रमाण[1] नेमा[2] । नमस्कारूनि ब्राह्मणोत्तमा ।
संभ्रमें आणितां स्वाश्रमा । नागलोकीं आल्हाद ॥ २७ ॥

बांधोनि दिधलें सुवर्णसदन । सर्व संपत्ती भरली[1] पूर्ण[2] ।
जो जो पदार्थ इछी मन । तो तो सन्मुख सर्वदा[3] ॥ २८ ॥

रमा रमेश मानूनि दोघें । सेवा करिते जाले अवघे ।
जरत्कार[1] स्वस्त्रीसंगें । ग्रहस्तधर्म[2] संपादी ॥ २९ ॥

स्नान संध्या जप हवन । स्वाध्याय हरिहरदेवतार्चन[1] ।
वैश्वदेव अतिथिपूजन । पितृतर्पण पैं नववें[2] ॥ ३० ॥

इयें[1] नवही कर्में आवश्यकें[2] । चालवी नित्यनैमित्तिकें[3] ।
काम्यनिषिद्धें[4] दोषात्मकें[5] । मनें शरीरें नातळे ॥ ३१ ॥

कुंडत्रय[1] वेदिकायुक्त । अष्टाविंशति पात्रांसहित[2] ।
अग्निहोत्रादि इष्टापूर्त । पैं विधियुक्त[3] संपादी ॥ ३२ ॥

---

२६. १ **लावण्यराशी** औं पु ; २ ( – ) नि ; ३–४ **विक्रीत तुमची** नि खवर्ग ( ख प्रसंप्रा , **विक्रित तुझीये** पु४ ) गो ; ५ **अनुमात्र** खवर्ग ; ६ **शिक्षा** नि पु तं

२७. १ ( – ) पु४ , **परम** नां औं पु ; २ **नीयेमा** धु.

२८. १ **भरलें** पु ४ ख , **भरल्या** धु तं ; २ **परिपूर्ण** तं ; ३ **सर्वथां** पु४.

२९. १ **जरत्कारी** ख , **जरत्कारु** नि पु४ गो·२ तं ; २ **गृहस्थधर्म** नि तं , **ग्रहस्ताश्रम** ख औं पु. तं मध्यें दुसरा चरण गहाळ.

३०. १ °**देवार्चन** नि ; २ **नेमें** औं.

३१. १ **हीं** नि , **हें** पु·४ रा नां औं , **एवं** ख गो·२ , **हे** मुं ; २ **आवश्यक** नि ( स प्रसंप्रा ) , **अवश्यकें** खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) गो·२ तं ; ३ °**नैमित्तिक** नि , °**नैमित्यकें** धु गो·२ तं रा नां ; ४ °**निषिद्ध** औं पु धु तं ; ५ **दोषात्मक** नि.

३२. १ ° **त्रया** रा, °**त्रई** पु४, °**त्रये** धु; २ **पात्रें**° ख मुं ना, **पात्र**° पु तं; ३ **विध्युक्त** मुं औं, **विद्युक्त** ख गो·२.

स्वीकारूनि[1] न्यायार्जित[2] धनी[3] । निष्ठा[4] संपूर्ण[5] तत्त्वज्ञानीं[6] ।
श्रद्धा अतिथीच्या[7] पूजनीं[8] । भगवद्भावें[9] सर्वदा ॥ ३३ ॥
व्यय शोभे शण्वती[1] श्राद्धीं । वाचा शोभे यथार्थवादीं[2] ।
ऐसा ग्रहस्त[3] मोक्षपदीं[4] । संन्यासाचें फळ लाभे ॥ ३४ ॥
ऐसिया परी सार्थक काळ । करुनी[1] ग्रहस्त[2] ऋषी[3] निर्मळ ।
पतिव्रताभावो[4] अचळ । स्वदारेचा[5] सर्वदा ॥ ३५ ॥
रुतस्नात[1] जालिया दिनीं । पुत्रफळार्थ याचाकिनी ।
भविष्य जाणोनि रेतदानीं । तोषविली स्वधर्में ॥ ३६ ॥
शुक्रभिक्षा[1] गर्भपात्रीं[2] । पडतां संतुष्ट पद्मनेत्री ।
भानुतेजें[3] पवित्र[4] गात्रीं । तपोबीज[5] विस्तारे[6] ॥ ३७ ॥
परी[1] ते[2] नेणेचि तये[3] काळीं । बाळबुद्धीनें[4] सलज्ज बाळी ।
ऋषीनें जाणोनि हृदयकमळीं । कृत[5] कार्यार्थ[6] मानिला[7] ॥ ३८ ॥

---

३३. १ श्वीकारी पु४, स्वीकारु गो॰२; २ न्यायार्चित पु धु गो २ ; ३ धन औं पु ; ४–५ संपूर्ण सर्व औं, सर्वसंपूर्ण पु; ६ °ज्ञान औं पु; ७ आतिथ्य औं पु; ८ पूजन औं पु ; ९ भगवद्भाव ख धु.

३४. १ षण्नवाति नि [ षण्णवति संस्कृत ], शाणवर्ति ख , शाष्ठवाति पु४ , षण्वाति रा गो२ तं ; २ सत्यवादीं मुं नां , यथावादीं ख ; ३ गृहस्थ नि ; ४ श्रम संपादी औं , संपादी पु.

३५. १ करीत नि ; २ (–) ख ; २–३ ऋषि ग्रहस्त नां धु तं , ४ पतिसेवे भाव नि , पतिव्रते भाव ख पु॰४ नां गो , पातिव्रत्यें भावो रा ; पातिव्रतें भावो गो२ तं ; ५ सदाचारें ख.

३६. १ ऋतुस्नाता नि तं , ऋतु° मुं गो२.

३७. १ शुक्र° नि (स प्रसंप्रा), शुक्ल तं ; १–२ पुरुषीगर्भ शुक्लपात्रीं धु ; ३ °तेज नि खवर्ग ; ४ लपवी नि ख मुं नां , लोपे पु४ , लोपवी औं , लपविलें पु ; ५ तपोतेजें औं पु , (+) चि पु४ ; ६ विस्तारलें ख, विस्तारें नि.

३८. १ वरि पु४ ; २ (–) औं पु , तें मुं गो॰२ ; ३ तिये पु४ रा गो॰२; ४ °बुद्धी ख , °बुधीनें धु ; ५ ऋतु नि ; ६ कार्यार्ध तं ; ७ मानिलें पु४ , नेमिला ख.

यावरी[1] कोणे येके[2] दिवसीं । भोजन सारूनि[3] सावकासीं ।
दाराअंक करूनि उसीसीं[4] । निद्रासुखें पहुडला ॥ ३९ ॥

झोंपेनें जाकळिला[1] प्रियो । तवं अस्तमाना पातला[2] सूर्यो ।
रंभोरूतें[3] डोलवी वायो । संशयाचा हृत्पद्मीं ॥ ४० ॥

जागृत केलिया[1] चढेल कोप । न करितां मानील[2] स्वधर्मलोप ।
अधैर्य[3] दोंमार्गीं[4] संकल्प । भयें निसरे[5] चाचरे[6] ॥ ४१ ॥

विचारी[1] सामान्य[2] कोण[3] विशेष । सत्कर्मलोपें स्पर्शेल[4] दोष ।
निद्रेसी आहे[5] अवकाश । रात्री सगळी[6] पुढारीं[7] ॥ ४२ ॥

मग चुरूनि[1] चरणतळा[2] । ह्मणे जी[3] साधिजे संध्याकाळा ।
होम देऊनि स्वधर्मसीळा[4] । मग संतोषें पहुडावें[5] ॥ ४३ ॥

पश्चिमसमुद्रीं[1] बुडतां[2] तरणी । विहितभंगें[3] सुकृतहाणी ।
व्यंगतेचा[4] विटाळ झणीं[5] । तुमच्या पायां[6] नातळो ॥ ४४ ॥

---

३९. १ **यापरी** ख ; २ (–) ख ; ३ **करोनि** नि गो·२ ; ४ **उसी** नि खवर्ग ( **उससी** ख पु ).

४०. १ **झांकाळिला** नि गो , **झांकुळला** गो२ ; २ **गेला** नि; ३ **रंभोरु तो** औं पु.

४१. १ **केलियां** पु४ नां धु ; २ **मानेल** नि , **होईल** मुं ; ३ **अधैर्यें** रा गो२ तं , **अधीर्यें** नां ; ४ **दोंमाजि** पु४ ; ५ **न सरे** नि ( स प्रसंप्रा ) ; ५–६ **शरीरीं वावरे** औं.

४२. १ **विचार** नि पु४ ; २–३ **करितां सामान्य** नि , **कोण सामान्य** खवर्ग ; ४ **स्पर्शला** पु४ धु ; ५ **पाहा हो** धु , **पाहे हो** तं , (+) **हो** रा ; ६ **लागीं** औं , **लागली** पु ; ७ **पुढारें** नि गो२.

४३. १ **चुरितां** मुं ; २ **पादकमळा** मुं ; ३ (–) नि खवर्ग ; ४ **°शीळा** नि मुं तं गो·२ ; ५ **पहुडणें** नि पु४ नां रा गो·२.

४४. १ **पश्चम°** पु·४ मुं नां धु ; २ **पडतां** ख ; ३ **विचारी नेमभंगे** मुं , **विहंगमभगें** नां ; ४ **अव्यंगाचा** औं , **अव्यक्ताचा** पु ; ५ **मनीं** गो·२ ; ६ **चरणा** औं.

ऐसें ऐकतां उत्तर[१] । कोपें खवळला वैश्वानर ।
ह्मणे मांडिये पडिला[२] भार । यालागीं[३] निद्रा मोडिली ॥ ४५ ॥
वृद्ध मी नावडें तुझिया मना । ह्मणोनि करिसी बहु[१] हेळणा[२] ।
आतां जा तूं बंधुसदना[३] । सेवूनि राहें भुजंगी[४] ॥ ४६ ॥
आज्ञा न घेतां मज रुषीची[१] । खंडना[२] करूनि मत्कर्माची[३] ।
प्राप्ति[४] नाहीं सवितयाची[५] । अस्तमाना जावया ॥ ४७ ॥
नावेक धरूनियां धीर । पाहावा होता चमत्कार ।
असो तो[१] अवघा उद्धताचार । तुझिये दुष्ट[२] बुद्धीचा ॥ ४८ ॥
वृद्ध रोगी[१] दरिद्री[२] भर्ता । विशेष[३] श्वशुरगृहीं[४] वसतां[५] ।
स्वरूप[६] तरुणी[७] समर्थदुहिता[८] । कांतारूपें हृद्रोग ॥ ४९ ॥
श्वानासारिखें[१] हेळसिती[२] । मर्कटातुल्य[३] उपहासिती ।
तर्‍हीं[४] निर्लज्ज कामासक्ती[५] । त्रास न[६] घेती[७] स्त्रियांचा[८] ॥५०॥
कुचपयःपात्र[१] देखतां[२] नयनें[३] । पुरुषमार्जार मियों[४] ह्मणे[५] ।
हृदयीं हाणीतल्या चरणें[६] । बळें संघटे पदसंधीं[७] ॥ ५१ ॥

---

४५. १ उतर पु४ गो२ ; २ पडला नि गो२ खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) ; ३ म्हणोनि नि खवर्ग. धु मध्यें दुसरा चरण गहाळ.

४६. १ ( – ) नि ; २ हेलना नि , हेळना औं तं ; ३ स्वबंधुसदना नि ; ४ भुजंगीं नि पु४ मुं नां.

४७. १ ऋषीची नि ख मुं नां गो तं ; २ खंडणा खवर्ग ( औं प्रसंप्रा ) ; ३ महत्कार्याची गो·२ ; ४ प्राप्त पु ; ५ सवित्याची नि खवर्ग.

४८. १ हा नि ख मुं गो२ , ते रा तं गो नां ; २ दुष्ट नां धु तं.

४९. १–२ दरिद्री रोगी नि खवर्ग ( मुं प्रसंप्रा ) ; ३ विशेषें नां औं तं ; ४ °ग्रहीं पु४ नां धु ; ५ वसता नि ख , वर्तता तं ; ६ सुरूप नि ( स प्रसंप्रा ) ; ६–७ तरुण रूपवंत औं , तरुणी रूपें पु ; ८ समर्थाची दुहिता नि.

५०. १ श्वानासरिसें ख ; २ हेलसाविती नि , हेळसाविती रा , हेळिती धु ; ३ कमटातुल्य ख मुं ; ४ तरी नि ख गो·२ ; ५ कामशक्ती ख पु४ धु गो ; ६–७ नेघती नां औं पु ; ८ स्त्रियेचा नि , विषयांचा मुं नां.

५१. १ पात्र खवर्ग ; २ देखोनि नि ; ३ नयनीं नां गो·२ ; ४ मियो-मियों धु ; ५ म्हणोनि नां गो२ ; ६ चरणीं नां गो·२ ; ७ पादसंधीं नि ख.

वर्मीं ताडितां कठिणवचनीं । लिंगमुख दाटी[1] भगभाजनीं[2] ।
वोंठ[3] चाटित[4] रोमस्थानीं । पुछ[5] उभारी[6] पुढारें ॥ ५२ ॥
कीं विषयविष्ठेलागीं[1] टोंकती[2] । मूत्रमोरियें[3] नित्य रमती[4] ।
नग्नस्त्रियांभोंवते[5] भोंवती[6] । ते शूकरव्यक्ती नरदेहीं[7] ॥ ५३ ॥
कीं[1] रेतपतनार्थ[2] मजुरिया[3] । उभय स्कंदीं[4] द्वयदांडिया[5] ।
वाहक होऊनि नरकालया । जीव नेती सकामें[6] ॥ ५४ ॥
हस्तदंड[1] टेंकूनि[2] स्तनीं[3] । श्रमल्या[4] विसावा[5] मानिती[6] मनीं[7] ।
तृषानिवृत्ति[8] मृगजळपानीं । तेंवि चुंबनीं परितोष[9] ॥ ५५ ॥
यापरी[1] आयुष्य[2] वेचूनि व्यर्थ । नरकयात्रे चालिले बहुत[3] ।
वैराग्येंवीण[4] मोक्षपंथ । वोस पडिला[5] प्राणियां[6] ॥ ५६ ॥
असो हे[1] कुश्चित[2] संसारराहाटी[3] । मी तवं[4] तपियांमाजी धूर्जेटी[5] ।
त्यागूनि जातों सुखसंतुष्टी । राहें[6] स्वेछा[7] आपुलिया ॥ ५७ ॥

---

५२. १ दाटलें नि , दाटिच ख , दाटितिच्चि नां ; २ गमताजनीं ख , °भजनीं पु४ ; ३ ओंठ नि , होंट औं पु·४ ; ४ चावित नि ; ५ पुच्छ नि ; ६ उभारित नि खवर्ग ( उभावित मुं ).

५३. १ °विष्ठेला धु , °विष्टे मुं ; २ टोंकिती नां , टोंकाती औं धु तं , टेंकाती पु ; ३ °मोहरियें ख धु ; ४ मरती नि ; ५ °स्त्रिये° नि, °स्त्रियाभंवते ख मुं रा गो·२ तं ; ६ भंवती ख रा गो·२ , भ्रमती औं; ७ °देह नि औं , देहें ख पु गो.

५४. १ ( – ) ख पु४ धु तं ; २ °पानार्थ नि ; ३ मंजुरिया नि पु४ नां , मजुरया पु ; ४ स्कंधीं नि रा गो तं , स्कंधें औं ; ५ दोनी दांडिया पु४ ; द्विपदादंडिया नां ; ६ सकाम नां औं पु गो·२ रा , सकामा ख.

५५. १ हस्त दंड नि , हस्त ख ; २ ठेवोनि गो·२ ; ३ शुनी नि ख मुं नां औं, सुनी पु , सीनि पु४ ; ४ श्रमल्यां नां पु तं ; ५ विश्रांति औं ; ६–७ मानीं मुं ; ८ तृषानिर्जळ मुं ; ९ परमतोषु औं.

५६. १ यावरी पु४ ; २ आयुष्यें नि ; ३ समस्त ख ; ४ वैराग्या° नि ; ५ पडले नि ; ६ पापियां गो·२ , प्राणिया नि ख.

५७. १ ( – ) गो·२ तं ; २–३ संसारकुश्चित राहाटी नि खवर्ग ( मुं प्रसंप्रा ) ; ४ ( – ) पु४ ; ५ धूर्जटी नि मुं तं ; ६ राहेन स , ग्रह धु ; ७ इच्छा नि , इत्सा पु४ मुं , इछा ख़ नां औं पु.

पाय[१] धरूं धांवे[२] कांता । ऋषि चरणें[३] लोटी[४] माथा ।
ह्मणे धीटे[५] सन्मुख येतां । भस्म करीन क्षणार्धें[६] ॥ ५८ ॥
भयें[१] कंप[२] सुटला[३] गात्रीं । अश्रुधारा लोटल्या नेत्रीं ।
धाकें शब्द न[४] फुटे वग्त्रीं[५] । मुख आच्छादी पल्लवें[६] ॥ ५९ ॥
भयें[१] सर्प दडाले सदनीं । धाकें समोर[२] न येती कोण्ही ।
ह्मणती कोपिष्ठ तपस्वी मुनि । ह्मणीं[३] शापील[४] आम्हुतें ॥ ६० ॥
मातृशापें[१] पावलों व्यसन । दुसरा[२] प्रळयो[३] साहेल[४] कोण ।
भगिनीचे धरिती चरण । पति शांतवीं आपुला ॥ ६१ ॥
देव धोत्रें[१] घेऊनि[२] हातीं । ऋषि[३] चालिला वैराग्यपंथीं[४] ।
येरी मागें मागें येती । शोक करिती[५] आक्रोशें ॥ ६२ ॥
अंतरें[१] जाऊनि[२] मागें पाहे । तवं प्रिया पाठिसीं[३] येत[४] आहे[५] ।
मग उभा ठाकोनि[६] ह्मणे राहें । गृहा[७] जायें[८] परतोनि ॥ ६३ ॥
भार्या विनवी सर्वज्ञ देवा । विचारमूर्ती[१] करुणार्णवा ।
जन्मोनि नेणें दुष्ट भावा[२] । भोळेपणें[३] आरज[४] ॥ ६४ ॥

---

५८. १ पाव पु४ ; २ जाणे पु४ ; ३ चरणीं गो॰२ ; ४ ठेविला गो ; ५ यावरी नि , तूं ख मुं , ( – ) पु४ नां , मज औं पु ; ६ क्षीणार्धें पु४ गो.

५९. १–२ भयकंप पु ; ३ सुटला गो॰२ , दाटला ख ; ४ ( – ) ख मुं ; ५ वक्त्रीं नि औं पु गो२ ; ६ पालवें औं पु , आपुलें रा.

६०. १ रागें रा गो॰२ ; २ सामोरे ख ; ३–४ शाप देईल धु तं.

६१. १ मात्रुशापें ख नां धु गो॰२ ; २ दुसरे रा गो॰२ ; ३ हें रा गो॰२ , ( + ) हा नि ; ४ साहील नि औं पु धु , साहे मुं नां.

६२. १ क्रोधें मुं ; २ धरी गो२ ; ३ रुसी पु४ , रुषी धु औं ; ४ अरण्यपथीं ख ; ५ करीत नि मुं औं पु रा तं , करी गो२.

६३. १ आंतरिं पु४ ; २ जव मुं , राहोनि औं , हूनि पु ; ३ मागें गो॰२ ; ४–५ येताहे पु४ , येती लवलाहें गो॰२ ; ६ राहोनि गो॰२ ; ७ ग्रहा पु४ धु गो२ ; ८ जाईं मुं धु गो२ , जावें पु.

६४. १ विचारसुमति धु , विचारसुमूर्ति तं ; २ भवा औं , स्वभावा मुं पु रा गो२ तं ; ३ °पणीं गो॰२ ; ४ आजवरी नि ( आरुष स ), आरजें पु॰४ , आरजा धु तं.

स्वामीनें[1] शब्द ठेविला क्षोभें । हें[2] दुष्ट प्रारब्ध राहिलें उभें ।
आतां क्रोध सांडूनि लोभें । कृपानुग्रह करावा ॥ ६५ ॥
थोर दुराशा धरूनि चित्तीं[1] । वडिलीं[2] वोपिलें तुमचे[3] हातीं ।
स्वामी त्यांचिये मनोरथीं[4] । शून्याकार दिसताहे ॥ ६६ ॥
तुह्मांपासोनि लाधेल[1] फळ । तेणें अक्षई माझें कुळ ।
तयांचा संकल्प नव्हे विफळ । ऐसें केलें पाहिजे ॥ ६७ ॥
ऐसें प्रियेनें[1] प्रार्थितां तेथें । कृपेनें[2] आश्वासी[3] अभयहस्तें ।
ह्मणे गर्भशुक्तिके[4] आतौतें । रत्न वाढे अनर्घ्य ॥ ६८ ॥
नाहीं[1] फळाची नास्तिक । पोटीं आहे[2] आस्तीक ।
रजनीजठरींहूनि तीव्रार्क । प्रगटे जैसा प्रभातें ॥ ६९ ॥
कपिल अथवा स्वामिकार्तिक । याज्ञवल्की योगेंद्र[1] शुक ।
यांचिये[2] पंक्ती[3] हा[4] आस्तीक । तुळिजेल महिमानें[5] ॥ ७० ॥
जोहरीं[1] रक्षील सर्पातें[2] । पितर[3] पाववील[4] ब्रह्मलोकातें ।
तुझी कीर्ती त्रैलोक्यातें[5] । पावन करील पवित्रे[6] ॥ ७१ ॥

---

६५. १ **स्वामींनीं** नि औं ; २ **तें** ख.

६६. १ **चित्तीं** पु४ धु ; २ **वडिलें** ख पु४ मुं धु ; ३ **तुमच्या** नि रा गो·२ तं , **तुमचा ( चां )** पु धु , **तुह्मां** ख ; ४ **मनोवृत्तीं** मुं.

६७. १ **लाधले** ख धु तं.

६८. १ **स्त्रियेनें** ख औं , **प्रियेन** गो·२ ; २ **कृपेन** गो·२ ; ३ **आश्वासिलें** मुं औं ; ४ °**सुक्तिके** रा गो·२ , °**सुक्ती** मुं तं , **शुक्तिके** ख.

६९. १ **नास्ति** नां ; २ ( + ) **वो** औं तं , ( + ) **हो** रा , ( + ) **गे** गो.

७०. १ **योगींद्र** नि नां रा गो तं , **योगिया** औं पु ; २ **यांचे** नि औं ; ३ **पंक्तीस** नि ; ४ ( – ) ख धु , ५ **महिम्यानें** नि.

७१. १ **जोहारीं** ख ; २ **संततीतें** ख पु४ , **सर्पसंततीतें** धु , **संपत्तीतें** तं , **मातुळातें** मुं ; ३ **पितृ** ख पु·४ नां औं रा , **पित्रु**° गो·२ , **पितृगण** मुं ; ४ **पावतील** नि मुं औं , **पावती** ख पु·४ नां रा गो ; ५ **तिहीं लोकांतें** औं पु ; ६ **पवित्र** औं पु.

ऐसें बोलोनि स्वदारेसी । अदृश्य जाला ब्रह्मऋषि ।
वियोगदुःखें[१] कासाविसी[२] । येरी[३] मूर्छित[४] धरणीये[५] ॥ ७२ ॥
सावध[१] होवोनि वाढवेळां[२] । जळ[३] स्पर्शिलें नेत्रकमळा[४] ।
गृहा[५] पातली[६] तवं[७] व्याळा[८] । देखे[९] विवर्ण[१०] सचिंत ॥ ७३ ॥
वासुगी[१] ह्मणे[२] विशाळनयने । सर्व जाणसी विचारनिपुणे[३] ।
तुज वोपिलें कारण[४] जेणें[५] । तें सिद्ध[६] कीं[७] असिद्ध[८] ॥ ७४ ॥
प्रार्थिलें असतां आह्मुच्या काजें । काय बोलिलें[१] तपस्विराजें ।
येरी ह्मणे नुद्वेगीजे[२] । आश्रयो[३] कांहीं दिसताहे[४] ॥ ७५ ॥
वैश्वानरातुल्य[१] तेजाळा[२] । तपोधन[३] दैवागळा[४] ।
आस्तीक जन्मोनि[५] तुमच्या कुळा । कवच[६] होईल निर्वाणीं[७] ॥७६॥
ऐसें परिसतां[१] उत्तर[२] । हर्षें[३] नाचती[४] दर्वीकर[५] ।
अवघे करिती जयजयकार[६] । सुखें साखरा[७] वांटिती ॥ ७७ ॥

---

७२. १ उद्वेगदुःखें पु४ ; २ खासाविसी गो॰२ ; ३ पडे नि; ३–४ मूर्छित पडे औं , ४ मृर्छित धु ; ५ धरणीं ये नि.

७३. १ साधन पु४ ; २ वाडवेळा ख पु४ , वाढवेळा नि मुं औं , ३ उदक औं पु ; ४ मुखकमळा नां ; ५ ग्रहा ख पु४ नां धु ; ६–७ पातलिया धु तं ; ७ तव नि ख पु४ मुं ; ८ वेळा धु तं ; ९–१० विवर्ण देखे नि खवर्ग.

७४. १ वासुकी नि ख गो॰२ तं ; २ विनवी नि ; ३ विचार पूर्णें नि खवर्ग ; ४ कारणें नि मुं औं रा ; ५ जाणें ख , देणें पु४ , (–) औं ; ६–८ साध्य कीं असाध्य नि.

७५. १ बोलिजेलें नि ; २ तुह्मीं ना उद्वेगीजे पु ; ३ अश्रो ख ; ४ दिसतसे ख.

७६. १–२ वैश्वानरा तपोतेजाळा औं पु ; ३ °धनें पु॰४ नां रा गो२ ; ४ देवा° नि ख पु४ मुं ; ५ होवोनि औं पु, जन्मेल रा ; ६ तोचि धु ; ७ निर्धारें ख.

७७. १ परिसोनि ख मुं ; २ उतर पु४ रा ; ३ हरुषें रा गो॰२ ; ४ नाचे नि खवर्ग ; ५ दर्वीकार ख मुं गो , दर्विखार गो२, निर्विकार स , सर्विकार पु४ , काद्रवभार औं पु , द्रव्याधिकार नां , कद्रीविकार तं , कादिविखार धु ; ६ जयजेकार ख ; ७ शर्करा ख , साकरा औं पु.

मीनाक्षी[1] गौरीचिये सेवे । तिष्ठती यक्षिणींचे[2] थोवे[3] ।
कीं श्रिया[4] सिद्धीचे मेळावे । इंदिरेतें वोळंगती ॥ ७८ ॥
तैस्या[1] पद्मिणी नागकन्या[2] । सर्वोपचारें[3] गुणैकधन्या ।
जरत्कारी[4] पूजिती मान्या । कुळदेवतेसारिखी[5] ॥ ७९ ॥
शुक्लीं[1] दिवसां[2] गणणा[3] चढे । तवं[4] तवं[5] मृगांकीं[6] कळा वाढे[7] ।
तैसा पवित्रोदरीं विरूढे । गर्भांकुर आगळा ॥ ८० ॥
अभ्रें झांकिलें[1] आदित्यबिंबा[2] । परी विश्वीं प्रगटवी[3] राजशोभा[4] ।
तैसी जठरांतूनि प्रभा । बाहेर[5] फांके तयाची ॥ ८१ ॥
स्फटिकनिकेतनींचा दीपु । कीं[1] पापेआंतील[2] अंगनावपु ।
कीं बाह्यक्रिया[3] प्रगटी रूपु । आत्मनिष्ठाचे[4] लक्षणीं[5] ॥ ८२ ॥
नवमास लोटलिया अंतीं । पावती जाली सुखप्रसूती ।
विधूम[1] पावकाचिये[2] दीप्ती । तपोतेजें[3] सुतेज ॥ ८३ ॥

---

७८. १ **मीनाक्ष** औं पु·४ ; २ **यक्षणीचे** नि पु·४ धु, **योगिणीचे** ख मुं ; ३ **थवे** नि ख धु, **थोंवे** पु४ मुं रा ; ४ **स्त्रिया** नि मुं नां, **अष्टम** औं.

७९. १ **तैशा** नि नां रा गो·२, **तैसी** ख पु ४ मुं ; २ **कन्या** ख पु·४ औं ; ३ °**चारीं** नां पु रा गो, °**चारीक** तं ; ४ °**त्कारीतें** नि ; ५ °**सारिख्या** स पु·४ नां, °**सारिखें** तं.

८०. १ **शुक्ल** ख धु ; २ **दिवस** नि पु४ मुं नां औं ; ३ **गगना** नि, **गणना** पु४ नां तं ; ४–५ **तों तों** औं ; ६ **मृगांकित** ख, **मृगांक** औं ; ७ **चढे** ख गो.

८१. १ **आच्छादिलें** नि, **आछादिलें** खवर्ग ; २ **सूर्यबिंबा** ख, **रविबिंबा** औं ; ३–४ **प्रगट विराटशोभा** पु४, **अधिक प्रगटे शोभा** मुं, **प्रगटे विराजशोभा** धु गो, **विराजे प्रकटे शोभा** गो२, **प्रगटे शोभा** नि ; ४ **निजशोभा** औं ; ५ **बाहीर** धु गो.

८२. १ **कां** पु·४ नां औं ; २ **पंपे**° नि, **कांपे**° पु ; ३ **ब्रह्मक्रिया** नि ; ४ **अंतरनिष्ठेचे** औं पु, °**निष्ठाचा** धु तं ; ५ **लक्षणें** नि औं पु, **लक्षण** ख पु४ मुं नां.

८३. १–२ **विबुध पावकादित्य** औं ; २ **पावकाचेनि** नि ; ३ **जन्म पावे** नि.

कृत्तिकांचे[1] प्रथमचरणीं । जन्म पावला आस्तीक मुनि ।
तेवेळीं वासुगीचे[2] सदनीं । मंगळोत्साह[3] मांडिला[4] ॥ ८४ ॥

गुडिया तोरणें घरोघरीं । मंगळवाद्यें[1] वाजती[2] गजरीं ।
उचित दक्षणेच्या[3] भारीं[4] । वोझीं[5] केलीं[6] याचकां ॥ ८५ ॥

अति आल्हाद[1] दंदशूकां[2] । परम निधान मानूनि देखा ।
रक्षिते जाले त्या बाळका । प्राणातुल्य साक्षेपें[3] ॥ ८६ ॥

चंदन कर्पूर दवना[1] जैसा । वाढता होय परिमळासरिसा[2] ।
बुद्धि[3] विवेक[4] संस्कार तैसा । योगभ्रष्ट स्वयें वाढे ॥ ८७ ॥

जातकर्म नामकरण[1] । निष्क्रमण[2] अन्नप्राशन ।
चौलानंतरें उपनयन । वासुगी सांग संपादी ॥ ८८ ॥

व्रतबंध जालिया[1] मग । चवनभार्गवापासूनि[2] सांग ।
वेद पढिन्नला[3] निर्व्यंग । ज्योतिषांत[4] शिक्षादि[5] ॥ ८९ ॥

---

८४. १ **कृत्तिकांचा (चां)** ख पु·४ नां धु गो तं, °**काच्या** रा गो२ ; २ **वासुकीच्या** नि ख रा गो२ , **वासुगीचा** पु·४ औं नां धु गो तं ; ३ **मंगळोत्सव** औं पु , **मंगळसोहळे** धु तं ; ४ **मांडले** धु गो तं.

८५. १ **वाद्यें** औं पु ; २ **गर्जती** नि ; ३ **दाक्षिणेच्या** नि गो२ , °**णेचा** औं , **दक्षिणेचा** गो तं , **दक्षणाचा** धु , **दक्षणा** ख ; ४ **संभारीं** नि खवर्ग ; ५–६ **वोझें केलें** धु तं.

८६. १ **उल्हास** औं पु ; २ **द्वंद**° मुं नां धु , **द्वंद्व**° औं पु ; ३ **साक्षपें** औं पु रा गो·२.

८७. १ **वर्नी** स औं , **दवणा** नि पु४ ; २ **परिमळ**° नि ; ३ **बुधी** धु , **बंध** तं ; ४ **विवेकें** नि ( स प्रसंप्रा ).

८८. १ **नामकर्म** स गो·२ ; २ **निष्कर्म** ख धु , **निष्क्रम** तं.

८९. १ **जालियां** पु·४ नां तं ; २ **च्यवन**° नि मुं गो२ ; ३ **पढविला** नि मुं पु , **पढिला** ख रा , **पढिनला** नां औं तं धु ; ४ **ज्योतिषादि** नि ख औं पु ; ५ **शिक्षाही** नि , **सीक्षादि** खवर्ग रा.

विवेकबुद्धि[1] सत्त्वसीळ[2] । तपश्चर्येनें[3] क्रमीत[4] काळ ।
प्रभाकरातुल्य तेजाळ । सीतळ[5] चंद्रासारिखा ॥ ९० ॥

गांभीर्यें[1] जैसा रत्नाकरू । औदार्यें[2] मेघ कां[3] कल्पतरु[4] ।
सामर्थ्यें[5] जैसा[6] सर्वेश्वरू । घडी मोडी संकल्पें ॥ ९१ ॥

इंदिरेश बळाची[1] आश[2] । धरूनि[3] इंद्रायणीचा[4] ईश ।
अमरगणेंसि[5] सावकाश । सेवेनें[6] रक्षी[7] सर्वदा ॥ ९२ ॥

नाना यक्षगणाचे लक्ष । घेऊनि मुख्य[1] धनाध्यक्ष ।
रक्षिता[2] ह्मणोनि विरूपाक्ष । सेवेनें[3] रक्षी सर्वदा ॥ ९३ ॥

तैसियापरी[1] पन्नग सकळ । वासुगीसहित सर्वकाळ[2] ।
सेवाभक्ती[3] ऋषीचा बाळ । संरक्षिती सर्वदा ॥ ९४ ॥

सूचना कथेची पुढारीं । येरीकडे हस्तनापुरीं ।
राजा[1] क्षोभोनि जिव्हारीं[2] । पन्नगसत्र[3] आरंभी[4] ॥ ९५ ॥

---

९०. १ विवेकादि पु ; २ सत्वशीळ नि तं औं पु , सत्यशीळ मुं ; ३ तपश्चर्यें औं गो ; ४ रक्षीत ख ; ५ शीतळ नि मुं नां पु.

९१. १ गांभिर्य ख पु४ नां धु , गंभीर औं पु ; २ औदार्य ख पु·४ नां ३ किंवा नि ख औं पु , ४ तरु पु४ ; ५ समर्थ पु४ ; ६ ( – ) रा.

९२. १–२ बळाचा अंश औं पु ; ३ रणधीर औं ; ४ इंद्राणीचा नि मुं नां ; ५ सेवाविनयें औं , समरंगणीं पु , °गणासी नि ; ६ सेवेन गो·२ तं ; ६–७ रक्षिताती औं·

९३. १ मुक्ष गो·२ , मुमुक्ष औं ;२ रक्षीं औं पु; ३ सेवेन गो·२. ख मध्यें ही ओवी नाहीं.

९४· १ तैसेपरी नि , ऐसिया° औं ; २ सार्वकाळ गो२ ख तं ; ३ °भक्तीनें नि. नि मध्यें ९३–९४ ह्या ओव्यांची अदलाबदल झाली आहे.

९५. १ जनमेजयें नि ; २ पुढारीं पु ; ३ पन्नगास्त्र पु·४ औं; ४ आरंभिलें नि.

इति श्रीभारत समुद्ररूपी । मद्वाणीकुरळीचंचूचां[1] मापीं ।
उमाणी[2] हें[3] मनसंकल्पीं । अघटतमान[4] चतुराचें[5] ॥ ९६ ॥
परी विश्वंभरगुरुप्रसादें[1]। मुक्तेश[2] वदे आरुषशब्दें ।
तें परिसोनि सज्जनवृंदें । संतोषती यथार्थ ॥ ९७ ॥

॥ इति श्रीभारते आदिपर्वणि नवमोऽध्यायः ॥

---

९६. १ मद्वाक्यकुररीचां धु , मद्वाणीकरुनी° ख , मद्वाणीकुररी-चंचूमापीं नि ; २ उमाणितां धु , आणि पु , अमन औं ; ३ नव्हे ख , (–) मुं नां धु ; ४ अघटित मान नि , आघट जाणे पु४ ; ५ चतुरांतें गो२.

ही ओवी मुं मध्यें अशी आहे:—

इति श्री भारतरूपी समुद्र । मद्वाणीचंचूमापाकार ।
उमाणितां मनसंकल्पिता थोर । अघटित मान चतुराचें ॥

९७. १ विश्वांभर° पु४ नां गो२ , विश्वंभरप्रसादें पु धु ; २ मुक्तेश्वर नि खवर्ग , मुक्तीश रा गो.

॥ श्री ॥

# अध्याय दहावा

## श्रीगणेशाय नमः

श्रोते ह्मणती जी[1] वक्तया[2] । उत्तंकऋषीनें[3] जन्मेजया[4] ।
तिरस्कारिलें[5] मग मंत्रिया । काय बोलिला[6] तें सांग[7] ॥ १ ॥
सौति[1] ह्मणे सावधान । ब्राह्मणें कथितां[2] पितृमरण[3] ।
संतोषनौका भंगोनि[4] मन[5] । शोकार्णवीं नृपनाथ[6] ॥ २ ॥
अमात्य मंत्री[1] वडील वृद्ध[2] । पाचारूनि सोयरे[3] सुहृद[4] ।
तयांप्रती सखेद शब्द[5] । ऐसा[6] बोले[7] ते[8] काळीं[9] ॥ ३ ॥
माझा पिता परीक्षिती । मरण पावला कवणे रीति ।
तक्षकें[1] विषाग्नीच्या[2] दीप्तीं । दाहिला[3] ऐसें ऐकिजे[4] ॥ ४ ॥
परी हे वार्ता तुह्मीं कोण्ही । लाविली[1] नाहीं[2] माझिये[3] श्रवणीं ।
बाळबुद्धी[4] किंवा[5] अगुणी[6] । मानूनि[7] केली उपेक्षा ॥ ५ ॥

---

१. १ (–) नि खवर्ग ; २ **वक्तेया** गो·२ , **वक्तिया** नां ; ३ °**रुषी** पु ४ , °**ऋषि** नि ख मुं नां , **उत्कंठित** औं पु , **रुषीनें** धु , **उत्तंक रुसुनी** तं ; ४ **जनमेजया** नि रा धु तं , **जन्मो**° ख नां गो ; ५ **तिरस्कारी** नि खवर्ग ( **तिरस्कारेंसि** औं ); ६ **बोले** नि खवर्ग ; ७ **सांगा** नि.

२. १ **वक्ता** ख पु४ नां औं , **श्रोतिया** पु ; २ **कथिलें** नि खवर्ग ; ३ **पित्रु**° ख धु गो·२ ; ४ **भंगोन** ख मुं पु तं ; ५ (–) मुं , **मन्न** रा गो·२ , **मनें** धु ; ६ **नरनाथ** नि.

३. १ **थोरथोर** धु तं , **मंत्रिया** औं पु ; २ **वृद्धां** औं पु ; ३ **सोहिरे** गो·२ ; ४ **सुहृदां** औं पु ; ५ **शब्दां** औं ; ६–७ **सांगता जाला** मुं , **कैसा बोलिला** औं ; ८–९ **नरेंद्र** नि पु·४ मुं नां , **तें सांगा** ख , **नृपेंद्र** औं.

४. १–२ **तक्षकविषाग्नीच्या** नि गो२ , **तक्षकविषाग्नीचा** पु·४ नां औं ; २ **विषाग्नीचा (चां)** धु ; ३ **दहिला** रा गो२ नां , **दग्धला** स गो२ ; ४ **ऐकिलें** नि खवर्ग , **सांगती** गो२.

५. १–२ **न लाविली** मुं ; ३ **माझा (झां)** औं पु रा तं गो ( प्रसंप्रा ) ; ४ °**बुधी** धु , °**बुत्धी** ख नां तं , °**बुद्धीनें** औं ; ५ (–) औं ; ६ **अवगुणी** औं पु ; ७ **ह्मणोनि** नां धु.

पुरोहित ह्मणती[1] लोकनाथा[2] । कवण ते[3] संतोषाची वार्ता ।
जे[4] सांगोनि तुमच्या[5] चित्ता[6] । बळें शोकाग्नि लावणें[7] ॥ ६ ॥
विष वाढितां[1] वंचिलें[2] पंक्तीं । ह्मणोनि रुसावें अमृतभोक्तीं ।
श्रवणीं पडतां[3] संताप[4] देती[5] । ते काय गोष्टी सांगणें ॥ ७ ॥
आतां सहज प्रसंगें[1] आलें । साक्षेपें[2] करूनि[3] स्वामिनीं पुसिलें ।
तरी सांगिजेल[4] श्रवण केलें । प्रतापरुद्रें[5] पाहिजे[6] ॥ ८ ॥
कौरवपांडवविरोधवातु[1] । माजला असतां अत्यद्भुतु ।
पांडवसंततीचे[2] तंतु[3] । सातही[4] तुटले[5] येकदां ॥ ९ ॥
द्रौपदीचे पांचही[1] कुमर । घटोत्कच[2] भैमी[3] राक्षस क्रूर ।
कर्णद्रौणीचेनि[4] संव्हार[5] । जाला साही जणांचा ॥ १० ॥
सप्तम तोही पावला क्षयो । कृष्णभगिनीसुभद्रातनयो ।
अभिमन्य[1] अपर धनंजयो । चक्रभेदनीं[2] निमाला[3] ॥ ११ ॥

---

६. १ (+) गा नां ; २ नृपनाथा नि ख पु४ रा ; ३ (−) नां गो·२ ; ४ ते नि गो ; ५ तुझिया नि ; ६ चिता पु४ धु ; ७ लावावा मुं.

७. १ वाटितां नि ( वांटितां स ) गो ख पु४ , वाटिका औं , वाटी पु ; २ वेंचिली औं पु ; ३ पडल्या नि ; ४ सखेद पु४ मुं , खेद नि ख नां औं पु ; ५ चिति पु४ नां , चित्तीं नि ख मुं औं पु.

८. १ प्रसंगा ख मुं नां औं , प्रसंगीं गो·२ ; २ साक्षपें पु·४ औं रा गो , साक्षप ख नां , साक्ष गो२ ; ३ (−) मुं ; ४ सांगीतलें पु४ ; ५–६ पाहिजे प्रतापरुद्रा नि ( °प्रतापरुद्रें स ) औं पु , पाहिजे प्रतापरुद्रें खवर्ग ( मुं प्रसंप्रा ).

९. १ कौरवां पांडवां विरोध° नां, कौरवां पांडवां विरुद्ध ह्मातु पु , कौरवपांडवां विरुद्ध वातु औं , °पांडवां विरोध° पु४ , °विरोधार्थु मुं , °विरोधवंतु धु गो·२ ; २–३ होऊनि दृष्टनीपातु नां ; ४ सातै ख पु रा , सत्य धु तं , तै नां , सांते गो·२ ; ५ सुटले गो२.

१०. १ पांच मुं औं पु गो२ ; २–३ भीमता घटोत्कच औं पु ; ३ भैमसेनी नि ; ४ °द्रोणाचेनि पु४ औं , °द्रोणीचेनि धु तं नां ; ५ संहार नि औं पु तं.

११. १ अभिमन्यू नि , °मन्यो ख ; २ व्यूह° नि, व्यूहु भेदुनि औं पु , व्यूह भेदुनि पु४ , विभुभेदनीं नां ; ३ निघाला पु४ , पाडिला गो२.

कृष्णावतार संपल्या अंतीं । पांडव निघतां[1] महापंथीं ।
राज्यीं[2] स्थापिला परीक्षिति । अभिमन्यपुत्र[3] तव[4] पिता[5] ॥१२॥
तेणें साठी[1] वरुषेंवरी[2] । गुणी पूर्वजां आणूनि हारी[3] ।
स्वधर्मे पाळिली धरत्री । श्रीरामचंद्रासारिखी ॥ १३ ॥
राक्षस त्रासूनि[1] जगतीतळीं । रक्षी जैसा श्रीकांत बळी ।
अरिष्टापासूनि प्रजा सकळी । संरक्षिल्या प्रतापें ॥ १४ ॥
साधुसंग्रहो[1] दुष्टनिग्रहो[2] । शरण आलियां[3] अनुग्रहो[4] ।
धर्मविग्रही[5] त्यां[6] विग्रहो[7] । अधर्मेसि[8] सर्वदा[9] ॥ १५ ॥
दानदंडाचेनि निघातें[1] । जगाचीं दुःखें दोष दुरितें ।
दरिद्र दवडिलें दिशांपरतें[2] । स्पर्शों नेदी कळि[3] धर्मा[4] ॥ १६ ॥
जितेंद्रिय सत्यसीळ[1] । प्रजापालक भूतदयाळ ।
विष्णुभजनीं अतिप्रेमळ । साधुमित्र[2] सद्भावें[3] ॥ १७ ॥
शारद्वत गौतमकुमरु[1] । कृपाचार्यापासूनि चतुरु ।
धनुर्विद्या पावोनि[2] गुरु । जाला शस्त्रास्त्रधरांचा[3] ॥ १८ ॥

---

१२. १ **निघाले** औं ; २ **राजीं** पु४ नां , **राजा** औं पु धु ; ३ **अभिमन्यु-पुत्र** नि ख मुं तं ; ४–५ **तेकाळीं** औं पु.

१३. १ **साटी** ना पु तं ; २ **वर्षें** ख पु४ मुं धु , **सहस्रेंवरी** नां ; ३ **सरी** गो·२. तं मध्यें दुसरा चरण गहाळ.

१४. १ **त्रासवूनि** नि. तं मध्यें ही ओवी नाहीं.

१५. १ °**संग्रह** नि खवर्ग, **साधुसंग** मुं ; २ °**निग्रह** नि खवर्ग , **दुष्टविग्रहो** मुं धु ; ३ **आलिया** नि मुं रा , **आलेया** गो·२ , **आलिनया** ख ; ४ **अनुग्रह** नि खवर्ग , **नीग्रह** पु४ ; ५–६ **धर्मविग्रहाचा** नि मुं , °**विग्रही यांचा** पु४ नां , °**निग्रही यांचा** औं पु ; ७ **संग्रह** नि खवर्ग ; ८ **केला नाहीं** नि खवर्ग ; ९ **सर्वथा** नि खवर्ग.

१६. १ **घातें** नि खवर्ग ; २ **देशापरतें** नि पु४ नां , **देशापरौतें** ख मुं औं पु ; ३–४ **कलिधर्मा** नि.

१७. १ °**शीळ** नि मुं नां औं पु तं ; २ **साधु मित्र** नि ; ३ **स्वभावें** तं.

१८. १ **गौतम थोरू** स पु४ ; २ **लाधोन** मुं ; ३ °**धनाचा** औं पु.

ऐसा पवित्र नरेंद्रोत्तम । पावता जाला निधनधर्म ।
तें[१] सांगतां वाटेल[२] श्रम । तथापि धैर्यें[३] आकर्णीं[४] ॥ १९ ॥
मृगयाव्याजें वनासि गेला । शमीकऋषीच्या आश्रमा आला ।
ध्यानस्त[१] देखोनि कंठीं सूदला । मृत[२] पन्नग[३] तयाचे[४] ॥ २० ॥
ऋषीच्या पुत्रें तेणें रोषें । शाप[१] दिधला अति[२] आवेशें[३] ।
सप्तम[४] दिवसीं[५] तक्षकदंशें । मृत्यु पावसी निश्चित ॥ २१ ॥
ऐकतां[१] चिंतेणें[२] ग्रासिला[३] नृप[४] । ऋषीनें[५] मानिला[६] पश्चात्ताप[७] ।
प्रजांसी[८] उदेला[९] भयकंप[१०] । विश्वप्रळयासारिखा[११] ॥ २२ ॥
सुहृदप्रधान[१] ते[२] समयीं । राजा रक्षिला[३] स्तंभालयीं[४] ।
तवं[५] सप्तम[६] दिवसाचे[७] ठाईं[८] । मार्गीं येतां तक्षकें[९] ॥ २३ ॥

---

१९. १ **तो** नि खवर्ग ; २ **वाटे** औं पु ; ३ **धैर्य** ख नां गो·२ ; ४ **आकळीं** गो. धु तं मध्यें यापुढें पुढील ओवी आहे:-

**दीर्घस्वरें रुदना करीत । भयें थरथरां कांपत ।**
**ह्मणे स्वामी चुकवीं घात । प्राणदाता मज होईं ॥ १९ अ ॥**

२०. १ **ध्यानस्थ** नि ; २ **मृत्य** पु४ , **मृत्यु** औं पु गो२ ; ३ **सर्प** औं पु ; ४ **तयातें** धु तं.

२१. १ **श्राप** औं पु धु ; २ ( – ) धु तं ; २–३ **क्रोधावेशें** रा गो·२ ; ४–५ **सप्त दिवसांतीं** पु४ , ° **दिवसांतीं** नि , °**दिवसांत** ख पु , °**दिवसां** औं.

२२. १–३ **ऋषीनें सांगून धाडितां** नि खवर्ग ( **ऋषीनें सांगतां** मुं ); २ **चिंतेन** गो२ ; ४ **नृपा** नि पु४ नां औं , **निरोप** मुं ; ५–६ **तात्काळ पावला** नि खवर्ग ; ७ **पश्चात्तापा** नि ख पु४ नां औं, ८ **प्रजाप्रधाना** खवर्ग , **प्रजा प्रधान** नि ; ९ **उपजला** गो·२ , **उदेलिया** पु४ ख ; १० **कंपा** नि पु४ ख नां , **कंप** मुं पु ; ११ **निश्चळ प्रळया**° पु.

२३. १ **सुहृद प्रधानीं** नि ख रा , °**प्रधानें** औं ; २ **तिये** रा गो·२ ; ३ **लक्षिला** तं ; ४ **स्तंभाच्या ठायीं** नि , **स्तंभाचे ठायीं** ख मुं नां , **स्तंभाचा ( चां ) ठायीं** पु४ औं ; ५–७ **सप्तम दिवसाच्या** नि , **सप्तम दिवसाचा ( चां )** रा धु गो·२ तं ; ८ **अंतीं पाहीं** नि खवर्ग ; ९ **तक्षका** नि ( स प्रसंप्रा ).

कश्यप ब्रह्मऋषि[1] सुजाण । सर्पविषहरविद्ये[2] निपुण[3] ।
सत्वर येतां देखिला प्राण । वांचवावया नृपाचा ॥ २४ ॥
तक्षकें[1] कारण विचारिलें । ऋषीनें यथार्थचि कथिलें ।
प्रतीत[2] दावीं ह्मणतां बोलें । अवश्य ह्मणे कश्यप[3] ॥ २५ ॥
तेवेळीं[1] वृक्षदाहा[2] परीक्षा[3] । दाऊनि[4] दाविली[5] समक्षा[6] ।
ह्मणे[7] मंत्रज्ञामाजि दक्षा[8] । इछित[9] सांग मजप्रती[10] ॥ २६ ॥
हस्त धरूनि कश्यपाचा । ह्मणे मागसी[1] तें[2] देईन लांचा[3] ।
ब्राह्मण ह्मणे बहु धनाचा । लाभ जालिया परतणें[4] ॥ २७ ॥
संख्येवेगळें देऊनि वित्त[1] । वैद्य फिरविला येत येत[2] ।
पुढें तक्षक नगराआंत[3] । कपटवेशें पातला[4] ॥ २८ ॥
मोहूनि सकळांचीं[1] ज्ञानें । राजा तक्षकें[2] घेतला प्राणें ।
आह्मी सकळही जालों दीनें । स्वामीविण[3] ते काळीं ॥ २९ ॥

---

२४. १ धन्वंतरी नि, ऋषि अति औं, (+) सुत ख; २ सर्पविखारी नि ख पु४ मुं पु, सर्पउतारी नां, सर्पविद्ये औं, सर्पहरणिं गो२, सर्पविषइं रा; २–३ सर्पविषहरनिपुण तं; ३ विद्यानिपुण नि ख पु४ नां पु, विद्यापूर्ण मुं, अतिनिपुण औं.

२५. १ (+) त्यासि तं; २ प्रचीत ख नां औं पु; ३ धन्वंतरी औं.

२६. १ तेणें नि, तेव्हां खवर्ग; २ °दाह नि, ° दह्य नां, °दाहक रा; २–३ तक्षकें दाहिलें वृक्षा गो; ४–६ कश्यपें जिवउनी दाविली परीक्षा गो; ५ पुरविली नि खवर्ग; ६ समीक्षा औं पु; ७ तेणें गो; ८ दीक्षा पु४; ९ इच्छा ते नि, इत्सा पु४, इछा नां, इप्सित औं; १० मजपासीं नि खवर्ग.

२७. १–२ मागे तें ख, मांगुता पु४, मागतें पु; ३ वाचा नि पु४ औं गो·२, कांचा तं; ४ परतेन नि.

२८. १ वीत पु४, वित्ता औं पु; २ येतां औं पु; ३ नगरातौता औं पु; ४ पावला स पु४ नां.

२९. १ सकळिकांचीं ख रा गो·२; २ सर्वथा औं, सकळही पु; ३ °विणें नि पु४ मुं रा.

विषानळें अतिसकुमार । राजा[1] भस्मला[2] सहशरीर[3] ।
नगरीं राष्ट्रीं हाहाकार । थोर जाला[4] प्रजांतें[5] ॥ ३० ॥
आम्हुतें अनाथ केलिया[1] रायें । मग आश्रइले[2] तुझे पाये ।
तुज देवतरूचे सीतळ[3] छाये । हा काळवरी[4] निवालों[5] ॥ ३१ ॥
पुढेंही[1] अनंत संवत्सर । होईं विजयलक्ष्मीचा[2] वर ।
वार्ता[3] ऐकोनि राजेश्वर । शोक करी[4] आक्रोशें ॥ ३२ ॥
त्यांत[1] विचारी विशेष[2] मात[3] । वैद्य फिरविला देऊनि अर्थ[4] ।
नगरीं[5] कांतारींचा[6] वृत्तांत[7] । तुह्मां[8] कैसा[9] जाणवला[10] ॥३३॥
राया न्यग्रोधवृक्षावरुता । ब्राह्मणकुमर[1] वळघला[2] होता ।
तेणें गुप्त[3] राहोनि वृत्तांता[4] । दोहींच्याही[5] ऐकिलें[6] ॥ ३४ ॥
वृक्षदाहें[1] जाला दहन[2] । वृक्षजीवनें[3] संजीवन[4] ।
तेणें येऊनि केलें कथन । तें यथार्थ आह्मीं सांगीतलें ॥ ३५ ॥

---

३०. १–३ **भस्म जाला उत्तराकुमर** धु ; २ **भस्म जाला** पु गो·२ ; ४ **माजला** नि ; ५ **प्रजांत** ख , **प्रलाप** औं , **प्रतापें** धु. तं मध्यें ही ओवी नाहीं.

३१. १ **केलें** नि औं पु , ( – ) ख , **कोलियां** धु ; २ **आश्रयले** नि , **अश्राइले** धु , **आश्रिले** रा ; ३ **शीतळ** नि ख मुं पु , ( – ) गो·२ ; ४ **काळपर्यंत** मुं औं पु ; ५ **निघालों** पु४.

३२. १ **पुढांही** धु तं , **पुढें** नि खवर्ग ; २ °**लक्ष्मी** ख औं पु गो ; ३ **हे** औं , **कथा** पु ; ४ **करिती** मुं धु.

३३. १ **त्यावरी** नि ; २–३ **विषमता** औं पु ; ४ **वित्त** नि ख नां , **वित** पु४ , **वित्ता** औं पु ; ५ हे **नगरीं** नि खवर्ग , हे **नगारिकां** नां ; ६ **अंतरीची** नां , **कांतारींची** धु तं औं पु नां सोडून इतर ; ६–७ **तुह्मां समस्तां** औं पु ; ७ **मात** औं पु धु तं सोडून इतर ; ८–१० **कैसी मात जाणवली** औं पु ; १० **जाणविली** धु तं सोडून इतर.

३४. १ °**कुमार** नि ख मुं ; २ **वळंघला** नि , **वोळगला** पु४ ; ३ ( – ) खवर्ग ( मुं प्रसंप्रा ) ; ४ **व्रतांता** पु४ मुं ; ५ **दोह्नींचाही** नि पु४ नां गो२ , **दोघांचेंही** ख ; ६ **ऐकिला** नि पु४ गो२ नां.

३५. १ °**दाहो** गो·२ ; २ **हनन** गो२ ; ३–४ **संजीवनें जीवन होऊन** धु. ही ओवी नि खवर्ग मध्यें नाहीं.

समिधापर्णेकाष्ठभारा[1] । मस्तकीं होता[2] ब्राह्मणकुमरा ।
तो जळोनि पातला[3] आकारा । पहिल्याऐसा[4] ऋषिमंत्रें[5] ॥ ३६ ॥
वस्त्रें आच्छादुनी वदन । राजा करी दीर्घ रुदन ।
ह्मणे तक्षका निसंतान । करीन तुझें पापिष्ठा[1] ॥ ३७ ॥
विषें[1] जाळिलें जनकातें । स्मरोनि[2] हृदय पिटी[3] हातें[4] ।
ह्मणे[5] प्राण त्यजीन येथें । कां[6] वधीन[7] तो सर्प ॥ ३८ ॥
वैद्य पावता[1] हस्तनापुरा । तरी वांचविता[2] राजेश्वरा ।
तक्षकाचिया[3] वैराकारा[4] । मज मर्यादा दिसेनां[5] ॥ ३९ ॥
आतां प्रतिकार[1] करीन[2] याचा । सूड घेईन[3] पितयाचा ।
संततीसहित तक्षकाचा । देह जाळीन हुताशीं[4] ॥ ४० ॥
उत्तंक ऋषीचें मनोगत[1] । तेंचि[2] माझें हृदयीं[3] आर्त ।
तक्षकदहनें[4] म्यां[5] पुरुषार्थ । सर्व जोडिले[6] संसारीं ॥ ४१ ॥
उष्णश्वास[1] टाकी[2] वदनीं । रागें[3] अधर चावी[4] दशनीं ।
हस्त[5] चुरीत[6] तुळीत[7] मूर्धी । आरक्त[8] नयनीं[9] संतप्त ॥ ४२ ॥

---

३६. १ **सामिधाकुशकाष्ठ**° नि खवर्ग ; २ **असतां** स ; ३ **पावला** नि ( स प्रसंप्रा ) ; ४ **पाहिल्या ऐसें** ख पु४ , °**ऐसें** रा गो·२ ; ५ **प्रत्यक्ष** नि , **ऋषिपुत्र** खवर्ग ( **रुषीपुत्रें** पु४ ) स.

३७. १ **पापिया** गो. ही ओवी नि खवर्ग मध्यें नाहीं.

३८. १ **ऐशिया विखें** नि , **ऐसें विखें** नां , **ऐस्या विषें** स औं पु , **ऐसे विषें** पु४ ; २ **तें स्मरोनि** नि मुं नां पु धु तं ; ३ **पिटीत** नि ; ४ **हस्तें** पु४ नां ; ५ (+) **मीं** औं पु ; ६ **कीं केव्हां** औं , **केव्हां** पु ; ७ **वधीं न** नि.

३९. १ **पावतां** स पु४ औं धु ; २ **वांचावितां** पु४ ; ३ °**काची** नि ; ४ **वैराकरा** ख औं , **वैराचारा** गो ; ५ **असेना** ख गो२.

४०. १-२ **प्रतिस्कारीन** तं , **प्रतस्कारीन** धु ; २ **करुनी** पु·४ औं ; ३ (+) **हो** रा गो२ तं ; ४ **हुतांशें** पु४ औं तं.

४१. १ **मनोरथ** गो ; २ **हेंचि** पु४ ; ३ **हृदयींचें** नि ख नां औं रा गो·२ , **मनींचें** मुं ; ४ °**दहन** ख पु४ ; ५ (-) ख पु४ नां ; ६ **जोडलों** ख ,**जोडिला** पु४.

४१. १ **उश्वास** नि , **उस्वास** पु·४ नां ; २ **टाकीतसे** नि , **घालितसे** खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ) ; ३ (-) औं पु ; ४ **चावीतसे** औं पु, **चालिवीतसे** ख ;

ब्राह्मण पाचारूनि सकळ । त्यांप्रती बोले उतावीळ[1] ।
सर्पयज्ञक्रियाकुशळ[2] । कोण ते निवडा[3] निराळे[4] ॥ ४३ ॥
विषें दाहिला[1] जनकोत्तम । मीही करीन तक्षकहोम ।
साह्य[2] होवोनि अभिमान नेम[3] । सिद्धी न्यावा समस्तीं ॥ ४४ ॥
अभिज्ञ[1] पन्नगसत्रविधी[2] । कुशळ जाणते मंत्रवादी ।
तिहीं[3] विलंब न करितां आधीं । सत्रारंभ[4] करावा ॥ ४५ ॥
जे[1] मंत्र उच्चारितां वोठीं । पावक[2] निमंत्रितां[3] बोटीं[4] ।
उसळोनि[5] सर्पांचिया कोटी । कुंडीं पडती[6] अपसया[7] ॥ ४६ ॥
ऋषी बोलती परम पवित्र । विध्युक्त[1] आहे पन्नगसत्र[2] ।
श्रेष्ठनि[3] निर्मिलें स्वतंत्र । तुजचिलागीं भूलोकीं ॥ ४७ ॥
मार्गें[1] आचरला[2] कोण्ही । ऐसें बोलों न सके[3] वाणी ।
पुढां[4] आचरेल हे[5] काहाणी[6] । भुवनत्रयीं नायकों[7] ॥ ४८ ॥

---

५ **हस्तें** नि ख पु४ ; ६ **चोळी** मुं , **चुरी** औं तं , **चुरुनि** रा गो·२ ; ७ **तळवा** नि खवर्ग ( **लत्ता** औं पु ), **चुरित** तं ; ८ **अश्रु** धु तं ; ९ **नयन** नि मुं गो२.

४३. १ **उतावेळ** स ख नां पु ; २ **सर्वयज्ञी°** ख , **सर्वज्ञ आणि क्रियाकुशळ** मुं , **सर्वज्ञ जाणोनि तत्काळ** औं , **सर्वज्ञा करुनि सकळ** पु ; ३-४ **निराळे निवडावे** औं पु.

४४. १ **दहिला** रा गो.२ ; २ **सत्य** नि ख पु·४ नां ; ३ **नियम** धु तं.

४५. १ **अभिनव** नि खवर्ग , **अभिज्ञ** रा गो·२ , **अभिमंन्य** धु ( रा२ प्रसंप्रा ) ; २ **पन्नगास्त्रविधी** नि खवर्ग ( ख प्रसंप्रा ) ; ३ **तेहीं** पु४ नां तं ; ४ **सत्वरारंभ** औं पु.

४६. १ **जो** नि ; २ **आणि** नि ख नां औं पु, **आणोनी** पु४, **आणूनि** मुं ; ३ **निमंत्रणा** ख औं पु ; ४ **जवं बोटीं** खवर्ग, **हस्तबोटीं** नि; ५ **तवं उस°** नि खवर्ग ; ६ **पडाव्या** नि ; ७ **आपैसा** नि.

४७. १ **विधियुक्त** पु धु ; २ **पन्नगास्त्र** औं पु ; ३ **विधीनें** नि खवर्ग.

४८. १ **तैसा मागें** नि ख पु औं, **तैसें मागें** मुं नां, **तैसें माझें** पु४ ; २ **आचरले** नां गो ; ३ (+) **कोणाची** नि ख पु४ मुं पु ; ४ **पुढें** नि खवर्ग तं ; ५ **हें** मुं, (–) नि पु·४ नां औं ; ६ **कोणी** नि, **कोण्ही** गो·२ रा२ सोडून इतर; ७ **असेना** नि. ही ओवी नि खवर्ग मध्यें येथें नसून पुढील ५२ च्या नंतर आहे.

पाषाण तारूनि[1] सागरांत[2] । येकें[3] रामें[4] बांधिला सेत[5] ।
गरळप्राशनीं[6] समर्थ[7] । शंकर स्वामी येकचि[8] ॥ ४९ ॥
रात्रीमध्यें[1] योजनें[2] च्यारी कोटी । द्रोणाचळ वाहूनि पाठीं ।
आणूनि न्यावया[3] जगजेठी । हनुमंत येक जन्मला ॥ ५० ॥
व्यूह[1] भेदूनि जयद्रथ[2] । वधावयाचा[3] प्रमाणशपथ[4] ।
सिद्धी[5] नेता[6] येकचि पार्थ[7] । वडील तुमचा[8] निवडला[9] ॥ ५१ ॥
सिंधुप्राशना[1] येक[2] अगस्ति[3] । तमिस्राहरणीं[4] येक गभस्ति ।
धराधर्ता[5] धैर्यप्रशस्ति[6] । आदिकूर्म[7] येकचि[8] ॥ ५२ ॥

---

४९. १ तारिले पु गो२ ; २ सागरांतु नि ; ३ येक खवर्ग ( येका ख, असे मुं ) ; ४ श्रीरामें नि खवर्ग ; ५ सेतु नि, स्वेतु ख पु४ औं, श्वेत रा ; ६ °सागर प्राशुनी औं पु , °प्राशुनी पु४ मुं, °प्रासुनी धु , °प्रासितां रा ; ७ समर्थु नि ख मुं नां पु ; ८ तो येक नि खवर्ग. औं मध्यें चवथा चरण तो अगस्ति पैं रुषी असा आहे.

५०. १ रात्रीं नि खवर्ग गो२ , रात्रींत रा ; २ शतयोजनें नि खवर्ग ; ३ जावया नि खवर्ग. औं मध्यें ही ओवी अशी आहे:—

रात्रिमाजी च्यारी कोटी । योजनें पंथ जगजेठी ।
द्रोणाद्रि वाहोनियां पाठी । हनुमंत येकाचि जन्मला ॥

५१. १ व्यहु ख धु , विहु औं पु , व्यभु गो , विभु नां गो२ ; २ जयद्रथा औं पु गो ; ३ °याची स औं , °याचे पु, वांचावयाची मुं ; ४ प्राणशपथ स , प्राणशफत ख मुं धु , प्रधानशफत पु४ , °शपथा औं , °शपता गो , °शफत गो२ ; ५ सिधी तं ; ६ नेला तो नि ( नेली तो स ) खवर्ग ( औं प्रसंप्रा ) ; ७ पार्था औं पु गो ; ८ तुझा नि खवर्ग ; ९ निवाडी स.

५२. १ °प्राशनीं नि खवर्ग ( °प्रासीतां पु४ , विषप्राशनीं औं ); २ (–) नि खवर्ग ( ख प्रसंप्रा ) ; २–३ शंकरमूर्ति औं ; ४ तमोहरणीं नि, तमहरणीं खवर्ग ( तनुहारिणी पु४ ) ; ५ धर्ताधैर्यें पु४ , धरणीधरितां नां , धराधरी औं पु , धराधरितां धु तं ; ६ धैर्यप्राप्ती नि ( स प्रसंप्रा ), °प्रस्तुती औं पु, प्रशस्तीं पु४ ; ७ आहि कर्मे पु४ ; ८ तो येक मुं.

पितृवैरें[1] पन्नगहोम । कर्ता तूं[2] येक[3] प्रतापी[4] परम ।
उपमें कृष्ण[5] कां[6] परशराम[7] । तिसरा दृष्टी[8] दिसेना ॥ ५३ ॥
येकें वधिलें कंसादिकां । येकें निर्वीर[1] केली[2] भूमिका[3] ।
पितृमारका[4] परमारका[5] । दग्धकर्ता[6] तूं येक ॥ ५४ ॥
वंशीं[1] येक[2] देशीं येक । जगीं येक युगीं[3] येक ।
ब्रह्मकल्पीं उपजे[4] येक । कीर्तिघोष तुज ऐसा ॥ ५५ ॥
आज्ञा देईं नरनायका । कौतुक दाऊं[1] ब्रह्मादिकां ।
तव कीर्तिभेरी[2] तिहीं लोकां । चहुंयुगीं[3] परिसऊं[4] ॥ ५६ ॥
राजा ह्मणे भूसुरस्वामी । चित्त[1] व्याकुळ संतापउर्मी[2] ।
स्तुतिवादें गौरवा तुह्मी । परी तें[3] गोड वाटेना ॥ ५७ ॥
शब्द[1] उसीणें[2] फेडितां बहुत[3] । विलंबें काळ जातसे व्यर्थ ।
आतांचि[4] वदलेति[5] तो[6] अर्थ[7] । यथार्थ करूनि दाखवा[8] ॥५८॥
अवश्य ह्मणोनि द्विजवरीं । करविते[1] जाले सिद्ध सामग्री[2] ।
पुढती[3] बोलती अवधारीं । राजेश्वरा चतुरेशा ॥ ५९ ॥

---

५३. १ **पितृवेगें** पु४ ; २–३ **तूंचि** नि खवर्ग ( **तोचि** मुं ) ; ४ **प्रतापें** पु४ , **प्रतापवंत** ख ; ५ **तूंचि** पु४ ; ६ **कीं** नि ( स प्रसंप्रा ) , **किंवा** मुं , (–) पु४ ; ७ **परशु°** नि ; ८ **कोणी** नि.

५४. १ **निर्वैर** गो·२ तं ; २–३ **सहस्त्रार्जुना वधिलें देखा** नि, **सहस्त्रार्जुना देखा** ख नां , **सहस्त्रार्जुन वधिला देखा** मुं पु ; ३ **गणिका** रा धु गो तं ; ४ **°मारक** नि ख नां , **°मार** पु४ मुं ; ५ **संहारका** पु औं , **अपर°** तं ; ६ **दहनकर्ता** नि खवर्ग.

५५. १ **वौंशी** धु ख ; १–२ **वंसीक** पु४ ; ३ **यागीं** धु ; ४ **उरे** औं. मुं मध्यें ही ओवी नाहीं.

५६. १ **दावूं** नि , **दाखवि** पु४ , **दाखउं** मुं ; २ **कीर्ति भरे** पु४ नां , **°भरी** मुं तं , **कीर्तिघोष** औं ; ३–४ **श्रवण करवूं चहूं युगीं** नि खवर्ग.

५७. १ **चिंता** ख , **चीत** पु४ धु ; २ **संसारउर्मी** मुं ; ३ **तो** पु. ही ओवी गो·२ मध्यें येथें नसून ५८ ओवीनंतर आहे.

५८. १–२ **शब्दासी उणें** पु४ ; २ **उसने** नि मुं ; ३ **येथ** गो ; ४ **आतां** औं पु ; ५–६ **वदले तितें** नि, **वदला तो तो** ख ; ६ **जो** औं पु ; ७ **येथ** नि ; ८ **दाखवावा** ख पु४ मुं नां , **दावा** औं पु.

५९. १ **कारिते** धु ; २ **सामुग्री** नि नां , **सामोग्री** ख धु गो२ ; ३ **पुढें** औं.

आम्ही वित्पन्न ग्रंथज्ञानी[1] । परि[2] क्रियाआचारअनुष्ठानीं[3] ।
करूनि निवडिले विज्ञानी[4] । ते सिद्ध समीप असावे ॥ ६० ॥
आगमीं[1] निगमीं[2] अथर्वणीं[3] । मंत्रावतार[4] परम[5] ज्ञानी ।
तीर्थी[6] गिरीगुहारण्यीं[7] । वसते[8] येथें[9] आणावे[10] ॥ ६१ ॥
कृपा आज्ञा अनुग्रहप्रभे[1] । कर्मसिद्धीसी[2] ठाकले[3] उभे ।
त्यांचिया संनिध[4] सुकृतें[5] शोभे[6] । येईल उद्योग[7] आमुचा[8] ॥६२॥
गौड मल्याळ[1] अंध्रदेशस्त[2] । कदळी-श्रीशैल्य-बदरीवनस्थ[3] ।
यांचिये[4] मंत्रीं मंत्रदैवत[5] । उभें[6] जागत[7] फळेंसीं ॥ ६३ ॥
गंगा-गौतमी-नर्मदातीरीं[1] । छाया-भगवती-गोकर्णेश्वरीं ।
ताम्रपर्णी[2] पुण्यकावेरी[3] । मानससरोवरीं जे[4] वसती[5] ॥ ६४ ॥

---

६०. १ **अर्थज्ञानी** औं पु ; २-३ **परिक्रियाविचार अनु°** स ; ३ **क्रियाविचार अनु°** नि , **क्रिया आचरे अनु°** पु४ मुं , **क्रियाचार°** औं ; ४ **ज्ञानी** नि खवर्ग. पु४ मध्यें ३-४ चरण नाहींत.

६१. १-२ **आगम निगम** मुं औं ; ३ **अर्थवर्णी** तं ; ४ **मंत्रवादी** औं पु, **मंत्रोच्चार** धु तं ; ५ **त्रिकाळ** नि , **मंत्र** ख , **माह्यं** नां ; ६ **तीर्थं** स मुं धु ; ७ **°गुहारणीं** मुं पु रा गो२ , **गिरीकंदरीं गुहा°** औं ; ८-९ **वसती तेथ** औं ; ९ **तेथें** गो२ ; १० **असावे** औं पु.

६२. १ **आनुभवप्रभे** पु४ ; २ **°सीधीसी** पु४ , **कर्मविधी** गो२ ; ३ **केवळ** धु , **ठाकेल** रा ; ४ **संन्निधी** पु४ नां , **सानिध्यें** रा तं गो२ ; ५ **सुकृत** नि खवर्ग ( पु प्रसंप्रा ) ; ६ **सभे** नि , **उभें** ख पु४ मुं नां , **लाभ** औं पु ; ७ **उद्देगें** पु४ , **उपेगा** औं , **उद्योगें** नि ख मुं ; ८ **आमुच्या** नि खवर्ग. ही ओवी ख मध्यें मागील ५९ ओवीनंतर आहे.

६३. १ **मालव** औं ; २ **अर्धदेशस्था** नि, **सीध्रदेशस्त** पु४ , **अग्रदेशस्थ** नां, **अग्रदेशस्त** गो२ , **°देशस्था** मुं औं पु, **°देशस्थ** रा तं; ३ **कर्दळी श्रीशैल्य बदरीवनस्था** नि, **कर्दळी श्रीशैल्यबद्री°** पु४ , **कुंतलश्रीशैलबद्रिवनस्था** औं, **छायाभगवतीतीरीवनस्थ** धु ; ४ **त्यांचिये** नि; ५ **मंत्रदेवता** नि खवर्ग ( **देवता** ख ) ; ६ **उभ्या** नि खवर्ग ; ७ **जागतें** धु , **जागती** नि ख पु४ मुं नां , **जागृती** पु, **तिष्टती** औं , **जाणत** गो२.

६४. १ **गंगागोमती°** गो२ , **°गौतुमीनर्मदे°** पु४, **°गौतमीरेवातीरीं** औं; २ **तांब्र°** धु नां ; ३ **शुद्धकावेरी** ख ; ४-५ **वसती जे** ख औं.

मांत्रिकवृक्ष[1] यांचेनि[2] जळें[3] । वाढले[4] तेथें सिद्धीचीं फळें ।
प्रत्यक्ष ह्मणोनि[5] ते ते[6] जवळें । यज्ञकाळीं असावे ॥ ६५ ॥
ऐसें विनंवितां[1] पुरोहितीं । द्विज[2] धाडूनि[3] मानसगती ।
अनुष्ठाते[4] मंत्रमूर्ति[5] । शिष्यसमुदायेंसि[6] आणिले[7] ॥ ६६ ॥
कृष्णवस्त्राचें परिधान[1] । कृष्णांबरेंचि[2] प्रावर्ण ।
धूमसंरक्तसुलोचन[4] । देदीप्यमान[5] तेजस्वी ॥ ६७ ॥
जयांचा क्रोधहुताशन । ब्रह्मांड जाळी[1] नलगतां क्षण[2] ।
प्रसाद[3] देती इंद्रभुवन । तुळसीदळासारिखे[4] ॥ ६८ ॥
ऋग्यजुःसामअथर्वणी[1] । षडंगयुक्त दशलक्षणी[2] ।
तर्कवेदांतसांख्यजैमिनी[3] । योगशास्त्रीं[4] अतियोग्य[5] ॥ ६९ ॥
व्याकर्णकार[1] स्मृतिकार[2] । साहित्यसंगीतकाव्यकार[3] ।
पौराणिक ऋषेश्वर[4] । ज्योतिर्विद[5] पातले ॥ ७० ॥

---

६५. १–२ मातृकावृक्षाचेनि नां, °वृक्षाचेनि धु गो२ ; २ त्याचेनी नि ख औं पु·४ मुं ; ३ बळें मुं औं पु ; ४ वाढती नि ख औं, वाढलीं पु·४ नां गो ; ५ म्हणऊनि नि ; ६ (–) नि.

६६. १ बोलतां मुं ; २ द्विजां स तं ; ३ धांवोनि पु·४, धांविले औं ; ४ अनुष्ठानातें नि (अनुष्ठानीं स) ; ५ मंत्रमुहूर्तीं गो·२ ; ६ सिघ्र समु° ख ; ७ आणविले नि पु·४ मुं औं, आणावे नां.

६७. १ परिधानें पु४ मुं धु ; २ °बराचें नि औं पु गो·२, °बराची पु४ मुं, °बरचि नां ; ३ प्रावर्णें पु४ मुं धु तं ; ४ धूम्रआरक्तनयन नि, धूम्रआरक्तनयनें पु४, धूम्रें आरक्तलोचनें मुं ; ५ दैदीप्य° नि ख रा गो·२.

६८. १ जाळील नि खवर्ग ; २ क्षीण पु४; ३ प्रसादा पु४ नां, प्रसादें गो तं ; ४ तुलसीपत्रासारखें नि.

६९. १ °अथर्वण नि खवर्ग ; २ °लक्षण नि खवर्ग ; ३ °सांख्यज्ञान नि खवर्ग (संख्याज्ञान पु४, सांख्यव्याकर्ण मुं); ४ यागशास्त्रीं पु४ ; ४–५ अतर्क्य तर्कातें आणिती औं, अतियोग्यता जाणती पु.

७०. १ व्याकरण° नि गो ; २ श्रुति° औं गो, स्मृति° पु ; ३ °संगीतव्यवहार स पु४, सहितसंगीत° मुं, °संगीतवाग्व्यापार ख, °संगीतदयासागर औं ; ४ ऋषीश्वर नि, वेदांतपार औं ; ५ जितेंद्रिय नि खवर्ग.

धनधान्यरत्नवसनीं[1] । पूजूनि स्वस्थ[2] अंतःकरणीं[3] ।
करूनि[4] प्रवर्तविले[5] यज्ञीं[6] । सर्पसत्रीं याजक[7] ॥ ७१ ॥
वास्तुविद्याविशारद[1] बहुत । मंडप[2] चैत्य[3] यूपांकित[4] ।
शिल्पिकारीं[5] निर्मिले तेथ । विबुधसदनासारिखे ॥ ७२ ॥
पताका तोरणें कनकध्वज[1] । शोभेनें[2] स्वर्गा[3] आणिली[4] लाज[5] ।
स्थानकीं[6] नेमिले[7] रुत्विज[8] । कर्मकुशळ[9] विवेकी ॥ ७३ ॥
होता मैत्रावरुण[1] पोता[2] । अछावाक[3] ग्रावस्तोता[4] ।
अध्वर्यु आणि प्रतिप्रस्थाता[5] । नेष्टोन्नेता[6] ब्रह्मा पैं ॥ ७४ ॥
ब्राह्मणाछंसी[1] आणि[2] उद्गाता[3] । आग्नीध्र[4] प्रस्तोता प्रतिहर्ता[5] ।
सुब्रह्मण्येसीं[6] जाणिजे[7] श्रोता । षोडश ऋत्विज[8] महायज्ञीं[9] ॥७५॥

---

७१. १ रायें धन° नि, रायें धनधान्य रत्नासनीं औं पु; २ स्वस्त नां तं, स्वछ धु, स्वतंत्र पु; ३ अन्तःकर्णीं नां पु; ४ ( – ) धु तं, प्रार्थुनि औं; ५ प्रवर्तले मुं गो·२, बैसविले औं, वर्त्तविले पु; ६ यज्ञअनुष्ठानीं धु तं; ७ यजनार्थ स, यागार्थ ख पु४, पैं यागा नां.

७२. १ °विशारदत्व तं; २–४ चैद्यमंडपरत्नखचित औं; ४ मुक्ता-फळांकित स; ५ शिल्प° नि.

७३. १ °ध्वजा नां औं पु; २ शोभे नि खवर्ग धु; ३–५ स्वर्गातुल्य सुतेज, नि ख मुं पु४, स्वर्गातुल्य सुतेजा नां औं पु; ४ आणिती रा गो; ६ स्थानीं मुं औं, स्वस्थानीं नि ख पु·४; ७ स्थापिले नि; ८ ऋत्विज नि मुं तं, ऋत्विजा नां औं पु; ९ कर्मशीळ गो·२.

७४. १–२ मैत्रावरुणपोता नि, °पोत स ख नां गो; ३ अच्छवाग नि, अच्छादावा स, आछादावा नां, दावा औं पु ( अच्छावाक संस्कृत ); ४ कुग्राव स्तौता नि, कुग्रावस्तौत स नां ( ग्रावस्तुत् संस्कृत ): ५ °प्रस्थान स ख नां गो; ६ नेष्टा नेता नि.

७५. १ °च्छंसी नि ( संस्कृत ); २ ( – ) नि खवर्ग; ३ उद्गता पु४, यज्ञस्था औं; ४ अग्नीध्र मुं नां रा गो·२; ५ प्रतिहंता ख नां, प्रतिहोता नि; ६ स्रुव शेषी नि, सुवंण्येसी पु४; ७ जाणवेजि पु४; ८ रुत्विज पु४ धु गो२; ९ महायोगी नां पु, महायागीं औं धु.

कपिलकश्यपातुल्य[1] ऋषिवर्य[2] । तपोतेजें जैसे[3] सूर्य ।
असो हे अमंत्रिले[4] अर्य[5] । अवतार अग्निपुरुषाचे[6] ॥ ७६ ॥
गोयोनीकुंड[1] गर्तावेदी[2] । निर्मिली ग्रंथोक्त[3] प्रमाणविधी ।
हवनद्रव्याच्या[4] समृद्धी । पर्वतप्राय[5] लोटिल्या[6] ॥ ७७ ॥
लोहिताक्ष सूत्रधार । सुत[1] पौराणिक[2] चतुर ।
त्रिकाळज्ञानें[3] महाथोर । भविष्यज्ञाते[4] ते[5] ठायीं[6] ॥ ७८ ॥
अवलोकोनि[1] यज्ञायतन । ह्मणती कर्मी[2] उदित विघ्न ।
तेणें[3] सिद्धी न पवे[4] यज्ञ । चिह्न[5] ऐसें[6] दिसताहे ॥ ७९ ॥
निमित्त[1] होईल[2] ब्राह्मण येक । तेणें मध्येंचि खंडेल[3] मख ।
हांवें भरला नरनायक । आग्रहें[4] कांहीं लक्षीना[5] ॥ ८० ॥
दीक्षाग्रहणीं[1] भार्येसहित । यजमान राजा महाव्रतस्थ ।
सदस्य[2] मिनले द्वादशादित्य । येकासनीं[3] पैं जैसे ॥ ८१ ॥

---

७६. १ **कौशिककश्यप** औं , **कलीलकस्यप** पु ; २ **वर्य** रा गो·२ तं ; ३ **जैसा** ख पु४ मुं औं पु गो२ ; ४ **आमंत्रिले** नि गो·२ , **मंत्रिले** नां ; ५ **आचार्य** नि ख मुं औं पु गो२ , **आच्यार्यें** पु४ , **आर्य** धु गो ; ६ **यज्ञपुरुषाचे** ख.

७७. १ **खाणोनि** नि , **योगिनीकुंड** तं ; २ **गर्ताअवधी** नि , **गर्ता-आवधी** पु४ नां ; ३ **विधानोक्त** औं ; ४ **हव्यद्रव्याच्या** तं ; ५ °**प्रायें** औं पु ; ६ **लोटल्या** औं पु धु तं.

७८. १–२ **पुराणिक अत्यंत** औं पु, **पौराणिक अत्यंत** नि , **पौराणिक आति** ख पु४ ; ३ °**ज्ञानी** नि खवर्ग ( °**ज्ञान** पु४ ) ; ४ **भाविष्यज्ञ** रा गो·२ ; ४–५ °**ज्ञातेचा** तं ; ५–६ **चाळिती** धु.

७९. १ **अवलोकोनियां** नि ; २ **यज्ञिं** नां ; ३ (–) नि , **पूर्ण** खवर्ग ; ४ **पावे हा** नि ; ५–६ **ऐसें चिन्ह** नि खवर्ग.

८०. १ **निमित्य** ख पु·४ मुं नां धु ; २ **होई** पु४ ; ३ **खंडिजे** पु·४ ; ४ **आग्रह** नि ख मुं रा , **आश्रय** औं पु , **आग्रही** तं ; ५ **लक्षेना** पु४ धु , **दिसेना** औं पु.

८१. १ °**ग्रहण** नि खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ) ; २ **सद्दस्य** पु४ गो२ ; ३ **एका सर्वी** नि ( स प्रसंप्रा ).

कुंडीं प्रतिष्ठिला वन्ही । पर्युक्षणीं[1] परिसंमूहनीं[2] ।
कुशबर्हिपरिस्तरणीं । पात्रासादनीं[3] विधिमंत्रें[4] ॥ ८२ ॥
इध्मा[1] समंत्र[2] विसर्जिली[3] । संस्थापूनि आज्यस्थाली[4] ।
प्रणीतापात्रें[5] संमार्जिली[6] । श्रुकश्रुवा[7] इत्यादि ॥ ८३ ॥
प्रोक्षोनियां यज्ञोपचार । हवनीं वोंकार वषट्कार ।
उठतां केला जयजयकार । उभयलोकीं सुरनरीं ॥ ८४ ॥
आह्वानिला[1] प्रळयानळ । जागृत होय[2] तैसा[3] सरळ ।
सप्ताजिव्हा[4] सप्तज्वाळ । सप्तहस्तीं कवळितु[5] ॥ ८५ ॥
महानदीचे[1] जळसंघाट[2] । वसुधारांचे[3] लोट ।
तेणें[4] भेदला[5] हव्यवाट । कनकस्तंभ[6] गगनातें[7] ॥ ८६ ॥
प्रळयीं कृतांतवक्त्र प्रचंड । तैसें विशाळ प्रदीप्त कुंड ।
कीं[1] पन्नग भक्षावया तोंड[2] । धरादेवीनें पसरिलें ॥ ८७ ॥

---

८२. १ परीक्षुनि नां, **परियुक्षणीं** धु गो·२ पु, **पर्येक्षीणी** पु४; २ **परिसंमोहनीं** नि ख पु४; ३ **पात्रसाधनीं** नि पु गो·२ ख; ४ **रूषीमतें** पु४. या पुढें औं मध्यें पुढील ओवी आहे:—

> ऐसें पुढील होईक । याजकां जाणविती गाणिक ।
> होणार होतसे नावेक । जाणोनि पाहा सर्पसत्र ॥ ८२ अ ॥

८३. १ विद्या औं पु; २ **समंत्रें** नि ख पु४; ३ **अव्हानिली** औं; ४ **आज्यीं स्थापिली** नि, **आज्य स्थापिली** तं, **आज्यस्थळीं** गो, **आज्यस्ताली** गो२; ५ °**पात्रीं** नि नां गो; ६ **विसर्जिली** ख; ७ **स्रुचि स्रुवा** नि, **वाक**° पु४, **भृक**° ख, **श्रृक**° नां पु धु रा गो२ [ **स्रुकस्रुवा** शुद्ध संस्कृत ].

८४. ही ओवी नि खवर्ग मध्यें नाहीं.

८५. १ **आव्हानितां** नि खवर्ग ( **आवाहनितां** पु४ ); २–३ **होतांचि** नि खवर्ग; ३ **जैसा** गो·२; ४ °**जिव्ह** नि; ५ **मंडित** नि खवर्ग.

८६. १ **महानदी** मुं नां, **महाजळनदी** पु४; २ **संघाट** पु ४ रा; ३ **वसुधारांचें** नि ख नां औं पु, **वसोधारांचे** स मुं, **वसुधरांचे** तं; ४–५ **ते भेटतां** नि खवर्ग; ६ **होय कनक**° नि पु·४, **होय स्तंभ** ख मुं, **होय गगनस्तंभ** नां; ७ **गगनांत** ख, **कनकाचा** नां.

८७. १ (+) **तें** धु तं; २ **तुंड** नि.

याजक द्रष्टे[1] अतिसावध । अनावर[2] जाणोनि[3] जातवेद ।
पृषदाज्यें[4] केलीं[5] सिद्ध । क्षीरसिंधूसारिखीं[6] ॥ ८८ ॥
समिधा वोपितां[1] पावकमुखीं । उत्पात उठिले नागलोकीं[2] ।
भवंडी[3] दाटल्या[4] मस्तकीं । मनीं[5] शरीरीं[6] सर्पातें[7] ॥ ८९ ॥
वैकल्यकश्मलतेच्या[1] भरें[2] । सकंप थरकती[3] शरीरें[4] ।
आसनें[5] उडोनी[6] येकसरें । गगनमार्गीं[7] उसळती ॥ ९० ॥
येक वृक्षासि घालिती वेढे । येक वेष्टिती[1] शिळाधोंडे ।
तेणें[2] उन्मळोनि झुंबाडें । व्योमपंथें[3] धांवती ॥ ९१ ॥
येकमेकातें बोभात । येकमेकां परिवेष्टित[1] ।
देहरज्जू[2] शतानुशत । येके[3] ग्रंथीं[4] वोपिती[5] ॥ ९२ ॥

---

८८. १ कर्मीं औं, द्दष्टीं नां, द्दष्ट पु·४; २ अनिवार गो·२ नां; ३ देखोनि नि खवर्ग (मुं प्रसंप्रा), जिणोनि गो, जींकोनि गो२; ४ पृषदाज्य नि खवर्ग; ५ केलें नि मुं, केल्या पु४, केला ख नां औं पु; ६ °सारिखें नि मुं, °सारिखा ख नां औं पु·४. पु४ मध्यें ८८ व ८९ ओव्यांची अदलाबदल.

८९. १ वोपिली गो२; २ स्वर्गलोकीं औं, गगनलोकीं पु; ३ भोंवंडी औं पु·४ घु; ४ दाटली ख, लागली पु४; ५ नश्वर नि, नैश्वर ख मुं औं पु, नैश्वर्यें पु४ नां; ६ मानिती नि, दाविती पु४; ७ संपत्ती नि खवर्ग गो२, कांपती गो.

९०. १ केवळ कश्मल° नि, विकल्पकश्मल° पु४, कैवल्यकश्मल° रा, विश्वकल्पांतकार° औं; २ भारें नि पु·४ गो२ औं; ३ थरारिती औं पु; ४ शिखरें औं पु; ५ आसन ख पु·४ नां; ६ सोडोनी नि ख पु४, सांडूनि मुं नां औं पु; ७ °मार्गें नि औं पु गो२. ही ओवी गो मध्यें नाहीं.

९१. १ वेढिती मुं; २ तेणेसीं नि खवर्ग रा; ३ °पंथीं नि खवर्ग (मुं प्रसंप्रा). मुं मध्यें खालील ओवी जास्त आहे:—

येक उदकांत लपती । येक प्रचंड दरीं निघती ।
येक स्त्रिया कुटुंबें बोभाती । मरण पातलें हो उभयतां ॥ ९१ अ ॥

९२. १ वेष्टित औं गो; २ देहज्वरें धु तं; ३-४ येक ग्रंथीं नि खवर्ग गो२; ५ गोंविती नि खवर्ग.

ऐशा सर्पांगजाळिया[1] । नभीं धांवती[2] गुंफिलिया[3] ।
मेघमाळा उचलिलिया[4] । तैसे निबिड आकाशीं ॥ ९३ ॥
तेथूनि धूम्राचेनि पंथें । हवनीं पडती शतानुशतें ।
विविध नाद उठती[1] तेथें । हाहाकार सर्पांचे[2] ॥ ९४ ॥
शृंखळाकारें कंकणाकारें । शरीरें[1] गोविती परस्परें ।
तेणेंसीं उसळोनि येकसरें । काळानळीं[2] रिचविती[3] ॥ ९५ ॥
येक व्याकुळते[1] निचेष्टित[2] । येक फडियातें[3] झाडित[4] ।
येक चपळते[5] चळबळित । पुच्छें तोडिती[6] निजदांतीं ॥ ९६ ॥
येकीं[1] भयें पसरिलीं मुखें । येक[2] जिह्वा लाळित[3] विखें[4] ।
येक भोइनव्यासारिखे[5] । वान्हिस्फुलिंग सांडिती[6] ॥ ९७ ॥
मातृवाग्दंडीं[1] पिटिले[2] । ब्राह्मणीं[3] क्षोभें[4] उच्चाटिले[5] ।
काळाग्निकुंजरें दाटिले । युक्षदंड[6] आननीं[7] ॥ ९८ ॥

---

९३. १ सर्पसांखळिया नि खवर्ग , सर्पांगझालिया गो॰२ ; १-३ गुंफिती धांवलिया धु ; ४ उसळलिया औं पु , चाललिया नि ख पु४ मुं नां.

९४. १ उठले नि , उठिले खवर्ग ; २ सर्पांचा नि खवर्ग ( मुं प्रसंप्रा ).

९५. १ शरीर ख औं पु ; २ काळाननीं मुं धु , अग्निकुंडीं औं पु , कालाबुली ख नां ; ३ उसळती पु४ , विचरती मुं गो.

९६. १ व्याकुळ नि खवर्ग गो॰२ ; २ निश्चेष्टित नि ; ३ ते प्राणांतें नि , ते फणांतें पु४ , फेणातें ख ; ३-४ तडफडीत झडा देत औं , तडफाडिया झाडित पु; ४ सांडित नि ख नां , नांडित पु४ ; ५ चपळत्वें मुं ; ६ झाडिती ख पु४ , खांडित नां , डंखित औं.

९७. १ येकें नि पु४ धु गो॰२ , येक स ख औं पु ; २ एकें नि ; ३ लळलळ नि , लळलळित खवर्ग ; ४ देखें मुं धु , दुःखें नां ; ५ भुइ° नि मुं रा गो॰२ ; ६ झाडिती गो॰२ , रिचाविती औं.

९८. १ °वाग्वज्रें नि ख पु४ नां मु , °वाग्जल्पें औं पु ; २ पीडिले नि गो२ ; ३ ब्राह्मण ख औं पु ; ४ क्षोभोनि नां ; ५ उच्चारिले नि खवर्ग ( उलथले औं ) तं ; ६ इक्षुदंड नि, उरगयुक्ष धु तं , इंद्रदंडें मुं औं पु , इंद्रदंड ख पु४ नां; ७ दांडिले औं , दंडिले आनानी पु.

येक काजळाऐसे काळे । खदिरांगार[1] तैसे[2] डोळे[3] ।
येक हाटकवर्ण[4] पिवळे । येक निळे शुकरंगी[5] ॥ ९९ ॥
येक ते तप्त लोहार्गळा[1] । स्थूलदीर्घ अतिविशाळा[2] ।
मुखीं नासिकीं[3] महाज्वाळा[4] । विषाग्नीच्या[5] धडकती ॥ १०० ॥
येक शंखवर्ण[1] धवळ[2] । येक माणिकरंगी[3] निखळ[4] ।
येक[5] चित्रांग[6] विशाळ[7] । येक विक्राळ[8] विकटदंती ॥ १०१ ॥
येक[1] अस्वलाकार रोमाळे[2] । येक[3] श्मश्रुखाडे[4] सरळे[5] ।
येक वृद्ध बहुत[6] काळे[7] । सुपरिमळें[8] मघमघिती[9] ॥ १०२ ॥
मुखीं[1] मस्तकीं[2] धरिले[3] मणी । वृद्ध बाल[4] तरुण[5] फणी[6] ।
प्रवेशती पावकाननीं । कोटिच्या कोटी येकदां ॥ १०३ ॥
ब्राह्मणमंत्राचा आंकडा[1] । वोढिले[2] मारूनि आसडा[3] ।
कुंडीं[4] पडोनि[5] तडफडां[6] । भस्म होती असंख्य[7] ॥ १०४ ॥

---

९९. १–२ **खदिरांगारा ऐसे** नि ; ३ **डोळें** रा तं ; ४ ° **वर्णी** नि ख पु·४ मुं ; ५ **सुरंगी** नां औं पु गो२.

१००. १ ° **र्गळ** स औं पु धु ; २ ° **विशाळ** स औं पु धु ; ३ **नाकीं** नि ; ४ ° **ज्वाळ** स औं पु धु ; ५ ° **ग्नीच्चे** औं धु , ° **ग्नीनें** पु.

१०१. १ ° **वर्णी** नि ख नां रा ; २ **निखळ** ख , **धवळे** पु·४ मुं औं धु गो ; ३ **माणिकवर्णी** ख पु , **माणिकवर्ण** औं गो , **चित्रांग** मुं नां ; ४ **व्याळ** ख , **विशाळे** मुं , **विशाळ** नां; ५–७ **मुखि नासिकी महाज्वाळ** मुं , **येक माणिक्य-वर्णी निखिळ** नां ; ८ **कराळ** औं. गो मध्यें चौथा चरण पुढील ओवीचा आहे. गो२ मध्यें ही ओवी नाहीं.

१०२. १ ( – ) मुं ; २ **रोमाळ** नि , **रोमाळें** पु४ मुं रा ; ३ **येका** तं मुं गो·२ ; ४ **श्मश्रुखांड** नि ख पु४ , ° **खांडें** रा धु ; ५ **सरळें** पु४ मुं रा , **सरळ** नि नां ; ६ **बहु** नां धुं ; ७ **काळें** पु४ रा , **काळ** नि नां ; ८ **सुपरिमळ** स नां ; ९ **घमघमीत** स. गो·२ मध्यें चौथा चरण मागच्या ओवीचा. तं मध्यें पहिला चरण नाहीं. ही ओवी औं पु मध्यें नाहीं.

१०३. १–३ **मस्तकीं एका अमोल्य** औं ; ४–६ **बोलती फणोफणीं** खवर्ग स ; ५ **तरुणे** नि.

१०४. १ **आंकुडां** रा , **आंकुडा** गो·२ तं ; २ **वोढिल्या** पु·४ नां , **वेढिले** गो२ ; ३ **आसुडा** ख औं गो·२ रा ; ४ **अग्नींत** नि खवर्ग ; ५ **पडती** तं ; ६ **तडतडां** नि रा गो·२ , **तडाडां** पु४ ; ७ **क्षणार्धें** ख गो२.

डोंबे[1] गव्हाळे[2] शंखपाळ । येरंडे[3] धामणे[4] कवडियाळ[5] ।
परड[6] फोंडसे[7] महांडुळ[8] । आर[9] अजगर[10] दुतोंडे ॥ १०५ ॥
येक पंचमुख[1] दशमुख । शतमुख[2] द्विशतमुख ।
मुगुटमंडित मस्तक । आशीविष[3] काळसर्प[4] ॥ १०६ ॥
गोकर्णप्रमाण गोप्रमाण । अश्वगजगिरिप्रमाण ।
भयानक[1] विषोल्बण[2] । दर्शन[3] देती[4] मृत्यातें[5] ॥ १०७ ॥
क्रोश द्विक्रोश क्रोशत्रय । योजनायत[1] महाकाय ।
ऐसे असंख्य काद्रव्य[2] । भस्म जाले हुताशीं ॥ १०८ ॥
वृकमुख जंबुकमुख । व्याघ्रमुख सिंहमुख ।
वराहमुख[1] नक्रमुख[2] । महिषमुख[3] आडेती[4] ॥ १०९ ॥
ऐसिया सर्पांचिया कोटी । पावकीं रिचविती[1] पाठोपाठीं[2] ।
नाद उठती तडतडाटीं[3] । अस्थि[4] जाळें[5] पळिपतां[6] ॥ ११० ॥

---

१०५. १ डांब औं तं, डोंबें नि, डोंब नां पु ; २ गव्हळे ख पु४ ; ३ सरड नि ( एरंड स ) , बेरडे औं पु , भरडे धु, थेरडे तं ; ४ धामन नि पु४ मु ; ५ कराडियाळ नि , कडियाळ ख , कवडे व्याळ औं पु ; ६ फरड नि ख नां, फारड पु४, फरडे औं पु; ७ कोंडस पु ४; ८ महास्थूल नि ; ९-१० अजगर आणि नि ख , अजगर आर पु४ नां , गज आर पु , अजगर औं.

१०६. १ (+) येक औं पु ; २ येक शतमुख नि खवर्ग ; ३ ऐसे विशाळ नि खवर्ग ; ४ कर्कोटक औं. औं पु मध्यें दुसरा चरण गाळून तिसरा चरण दुसरा व चौथा चरण तिसरा घातला आहे आणि चौथ्या चरणांच्या जागीं भस्म जाले ते काळीं असा नवा चरण घातला आहे.

१०७. १ भयें वमिती नि खवर्ग ; २ विद्योद्कें जाण औं पु ; ३-५ दर्शनें मनुष्य पावे मरणातें औं पु ; ५ मृत्यूतें नि ख पु४ नां.

१०८. १ योजनांत ख ; २ काद्रवेय नि रा , काद्रव्यये पु·४ धु , काद्रव्यय नां , काद्रव्य पाहे औं.

१०९. १-२ नक्रमुख महिषमुख नि खवर्ग ; ३ श्वापदमुख नि खवर्ग; ४ अनेके नि , अनेक खवर्ग , आडोती धु तं [ आरडती ? ].

११०. १ विचरती नि ( स प्रसंप्रा ) ; २ पाटोवाटीं ख पु·४ ; ३ कडकडाटी नि खवर्ग ( मुं प्रसंप्रा ) ; ४ अस्ति धु गो·२ , पृथ्वी नि ; ५ ज्वाळें नि खवर्ग ( जाले ख , ज्वाळकल्लोळीं औं ) ; ६ पळिंपतु नि , प्रलपत मुं , प्रलिपति नां , तापली औं , जळपती पु , तळपतां गो·२.

वसामेदेचे[1] संघाट । कढतां[2] वाहों लागले[3] घाट ।
ज्वाळाजिह्वेनें हव्यवाट । चाटूनि नेत[4] क्षणार्धें[5] ॥ १११ ॥
जळतां[1] मांसाचिये[2] घाणी । कुवास भरला[3] मेघघ्राणीं[4] ।
चिळसीनें[5] तोंडीं सुटलें पाणी । तें अद्यापि श्रवताहे[6] ॥ ११२ ॥
प्रयुतें[1] अर्बुदें[2] निर्बुदांत । खर्वी निखर्वी नव्हे गणित ।
चित्रभानूच्या[3] जिह्वा[4] ज्वलित[5] । जिह्मग[6] जाले[7] जे[8] जाणों[9] ११३॥
पद्माचे[1] पद्म[2] शंखाचे शंख । निधीच्या[3] निधी[4] नव्हे लेख ।
सहस्रमुखाचेंहि मुख । संख्या करितां ढांसळे[5] ॥ ११४ ॥
न कळे मातृशापाची[1] गरिमा । किंवा[2] ऋत्विजऋषींचा महिमा ।
कीं जनमेजयाची प्रतापसीमा । येकी[3] वाचा[4] न वदवे ॥ ११५ ॥
इतुकें भक्षूनी पावकें । पुढतीं पसरिलीं[1] दोन्ही मुखें ।
राजा ऋत्विजां ह्मणे तवकें । तक्षक न पडे कां[2] अझुनी[3] ॥११६॥
ऐकोनि यजमानमुखींचें[1] वचन । तक्षकनामें अभिमंत्रून ।
ब्राह्मणीं उचलिलें अवदान । हरहर शब्दें गर्जोनि[2] ॥ ११७ ॥

---

१११. १ **मांसमेदाचे** नि मुं, **मांसमेदाचा** ख पु·४ नां औं; २ **प्रवाह** औं, **वाढतां** पु, **काढिता** गो·२; ३ **लागला** नि खवर्ग; ४ **घेत** औं; ५ **क्षीणार्धें** पु४·

११२. १ **जळत** पु४ मुं नां; २ **मांसाचिया** नि ख नां पु, **मांसाची** धु औं; ३ **भरलासे** नि खवर्ग; ४ **घ्राणीं** खवर्ग ( **मेद्घ्रणीं** पु४, **मेघ्राणीं** ख ); ५ **चिळसी** औं पु; ६ **न जाय** नि ( निपा प्रसंप्रा ), **सुटताहे** ख पु·४ नां औं, **पडताहे** धु तं.

११३. १ **प्रयुत** नि खवर्ग ( **अयुत** औं ) तं; २ **अर्बुद** नि ख पु४ मुं, **प्रयुत** औं ( **अयुत** नां ); ३ **°भानूचे** नि ख मुं नां, **°भानूतें** पु४, **चित्तभानूचे** औं पु; ४–५ **लिहितां हात** नि, **विव्हाळित** खवर्ग; ६–९ **ते काळीं पैं राहिले** नि, **ते काळीं पैं जाले** खवर्ग, **जीव्हींगण जळाले** धु.

११४. १–२ **पद्मार्चीं पद्में** रा धु; ३ **निधीचे** नि खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ); ४ **निधीनें** धु तं; ५ **ढेसळें** ख नां, **भागलें** पु, **ठेसलें** मुं, **लागलें** औं.

११५. १ **°शापाचा** नि; २ **कीं** औं; ३–४ **एकें वाचें** नि.

११६. १ **पसरुनी** ख तं; २–३ **अझुनि कां** नि.

११७. १ **जनमेजयाचें** नि खवर्ग; २ **गर्जोनियां** नि, **करोनि** गो·२.

पुढां[१] वर्तलें काय विचित्र[२] । तें परिसतु[३] सभाग्यश्रोत्र ।
सज्जनांचें कृपापात्र । मुक्तेश्वर कवि ह्मणे[४] ॥ ११८ ॥

इति श्रीआदिपर्व महाभारत[१] । सकळ ग्रंथांचें[२] कुळदैवत ।
हें[३] येकचि[४] पुरवी[५] आर्त[६] । श्रवणसुखाचें[७] श्रोतियां[८] ॥११९॥

आणिक[१] ऐकावी[२] हे[३] बुद्धी[४] । वासनालेश[५] उरों नेदी ।
शब्दब्रह्माची[६] सकळार्थसिद्धि[७] । येणें[८] येकें[९] आतुडे[१०] ॥१२०॥

इति श्रीमहाभारते दशमोऽध्यायः ॥

---

११८. १ **पुढें** नि खवर्ग ; २ **चरित्र** नि खवर्ग रा ; ३ **परिसोत** नि धु , **परिसा तुह्मी** औं , **परिसा पुढें** पु ; ४ **वदे** नि गो२.

११९. १ **भारत** नि ख मुं रा गो॰२ ; २ **कथेचें** नां ; ३-४ **ऐकतां** नि खवर्ग ; ५ **पूर्वील** धु गो२ , **पुरती** औं ; ६ **मनोरथ** औं पु ; ७-८ **श्रोते वक्ते श्रवण करितां** औं पु.

१२०. १ (+) **येक** नि ख मुं औं पु ; २-४ **ऐका विधी** नि खवर्ग ; ५ **हें वासना॰** नि खवर्ग ; ६ **वेदब्रह्मचि** रा गो॰२ , **देवाब्राह्मणाची** खवर्ग ( **वेदब्रह्मयाची** मुं ) ; ७ **सकळ सिद्धी** नि खवर्ग ; ८-९ **श्रवण केलिया** औं पु; १० **आवडे** नि.

---

॥ श्री ॥

# अध्याय अकरावा

## श्रीगणेशाय नमः

शौनक पुसे आर्तेंकरून[१] । सर्पसत्रीं रुत्विज[२] कोण[३] ।
तें आपुल्या मुखें ज्ञान । करीं आम्हुतें सर्वज्ञा ॥ १ ॥
देवऋषी ब्रह्मऋषी । सद्स्य[१] कोण तपोरासी ।
तें वाक्यदीपकें[२] प्रकाशीं । श्रवणनेत्रीं[३] आम्हुचिये[४] ॥ २ ॥
जी जी[१] ह्मणोमि वक्ता वचनीं । ह्मणे मुख्य तें लावा[२] श्रवणीं ।
इतर सांगतां विस्तारूनी । अतिप्रसंग होतसे ॥ ३ ॥
चवनऋषीचा कुळसंभव । होता[१] प्रचंड चंडभार्गव[२] ।
वेदविदां[३] वरिष्ठ देव[४] । चतुरानन पैं जैसा ॥ ४ ॥
धर्माधर्मविचारतरणी[१] । मीमांसाकार[२] परमज्ञानी ।
तो उद्गाता तेथें जैमिनि[३] । कुत्सऋषि[४] त्या जवळा[५] ॥ ५ ॥
भव्य ते[१] ऋग्वेद[२] सावेव[३] । तो ब्रह्मा[४] जाला[५] शार्ङ्गिरव[६] ॥
अध्वर्य[७] ते यागीं स्वयमेव[८] । हेमपिंगळ ब्रह्मऋषी[९] ॥ ६ ॥

---

१. १ आर्तें करून नि, अर्तें करून ख नां , आर्तिं करून रा तं, आरतीं करून धु ; २ ऋत्विज नि मुं नां गो तं पु; ३ कवण नि तं, गण मुं.

२. १ सद्दश्य पु·४ तं ; २ °दीपें नि औं , वाक्यें धु तं ; ३ श्रवणीं–नयनीं गो२ ; ४ आमुचे नि खवर्ग.

३. १ (–) औं पु ; २ लावूं नि खवर्ग ( लागे पु४ ), लावावें धु तं.

४. १ होतां पु४ मुं गो२ , तो हा औं पु ; २ भार्गव नि नां गो·२ ; ( चंडभार्गव सं. भा.); ३ वेदवेद्यां नि, वेदवेत्ता ख, वेदवेदांत मुं; ४ सर्व ख.

५. १ कर्मधर्म° रा धु तं ; २ मीमांसक मुं औं पु , मीमांसका ख गो·२ तं ; ३ जयमिनी ख पु·४ औं धु गो·२ तं , जयमुनी नां ; ४ कुच्छ° ख पु४ नां , कुत्छ° धु , वत्स° औं पु ; ५ जवळी नि , वेळीं गो·२.

६. १ तो धु ; १–२ तरुऋग्वेदादि औं पु ; ३ सावेवें औं ; ४–६ ब्रह्मा शांडिल्यरव ख नि , ब्रह्मत्वें यज्ञीं मिरवे औं , ब्रह्मचारी मिरवे पु ; ६ [ शार्ङ्गरव सं. भा. ]; ७ अध्वर्यू नि ; ८ स्वमेव नां औं धु तं ; ९ ब्रह्मर्षी रा गो तं.

कुंडलद्वेष[1] धरूनि मनीं । तेथ[2] उन्मेता[3] उत्तंकमुनि ।
सर्प[4] जाळिले हुताशनीं । कोटीच्या[5] कोटी[6] त्या रागें ॥ ७ ॥
व्यासपुत्र जीवन्मुक्त । शुकयोगींद्र[1] शिष्यांसहित[2] ।
सर्वां श्रेष्ठ सभेआंत । व्यंग तें सांग त्याचेनी[3] ॥ ८ ॥
उद्दालक[1] माठरक[2] । श्वेतकेतु शांडिल्य[3] देख[4] ।
असित देवल तपोतेजार्क[5] । नारद पर्वत[6] पैं दोघे ॥ ९ ॥
आत्रेय दुर्वास ऋषिश्रेष्ठ । कुंड[1] जठर[2] कालघट[3] ।
वात्स्य[4] श्रुतश्रवा वरिष्ठ । कोहल आणि देवशर्मा[5] ॥ १० ॥
मोद्गल्य[1] सौरभ[2] मुख्यकरूनी । समर्थ सदस्य सभास्थानीं ।
पन्नगसत्रीं महायज्ञीं । पारीक्षितिरायाचे[3] ॥ ११ ॥
याहीवेगळे असंख्यात । संशितव्रती[1] ब्राह्मण बहुत ।
मूर्त[2] वन्ही कीं आदित्य । किंवा प्रतिमा रुद्राच्या ॥ १२ ॥
कीं[1] विष्णुबिंबित[2] दर्पण[3] । कीं[4] नाट्य[5] अवगला[6] चतुरानन ।
ज्यांचें[8] सहजचि दर्शन[9] । काम पुरवी इच्छिलें[10] ॥ १३ ॥

---

७. १ **कुंडली द्वेष** नि, **कुंडलांचा द्वेष** धु तं; २–३ **तेथें येतां** नि; ३ **उन्मता** गो, **उद्गता ( उद्गाता ? )** गो२; ४ **सर्व** पु·४ मुं औं; ५–६ **कोट्यानुकोटी** नि.

८. १ **°योगेंद्र** पु४ मुं औं; २ **सिष्यें°** ख धु औं पु रा; ३ **संपादी** गो२.

९. १–२ **मार्कंडेय उद्दालक** औं; २ **मावरक** मुं ना पु, **मांसक** ख, **मांरक** पु४, **प्रमतक** [ सं. भा. ]; ३–४ **शांडिल्यादिक** मुं; ५ **तपस्तेजोर्क** नि; ६ **तुंबर** मुं.

१०. १–२ **कुंजरट** ख औं, **कुजरुट** पु नां, **कुंजारुढ** मुं; ३ **कालघंट** ख पु४ मुं औं रा गो; ४ **बाष्कळ** नां, **वासुदेव** औं, **वत्स** गो·२; ५ **देवश्रमा** धु तं.

११. १ **मौद्गल्य** नि पु४ रा धु तं, **मुद्गल** ख मुं औं पु; २ **सौरभ्य** खवर्ग; ३ **परिक्षिति°** ख पु·४ नां रा धु, **जन्मेजयरायाच्या** औं.

१२. १ **सुशीळवृत्ति** ख, **सदाशिष्य** नां; २ **मूर्तिमंत** नि, **मुहूर्ति** गो·२. ही ओवी औं पु मध्यें नाहीं.

१३. १–२ **विष्णुप्रतिबिंब** नि खवर्ग; ३ **दर्पणें** धु; ४ (–) धु ५ **नाय** नि, **न्यायें** मुं, **नाट्यें** धु, **देहीं** गो·२, **वाद्यें** तं; ६ **आगळा** पु,

महासाक्षेपें[१] आदरिलें[२] देख । फळों[३] नये काय[४] तें[५] येक ।
ह्मणोनि भस्मले दंदशूक[६] । परहिंसक पातकी ॥ १४ ॥
असंख्य पडिले[१] काळानळीं । पुढती[२] सर्पांचीं वेंटाळीं[३] ।
पडतां देखोनि बद्धांजुली[४] । स्तवी[५] यजमान[६] याजकां[७] ॥१५॥
राजा ह्मणे ब्राह्मणोत्तमा । मुख्य शत्रु तक्षकनामा ।
तो पाहूनि संतोष आह्मां । दिधला आतां[१] पाहिजे[२] ॥ १६ ॥
अवश्य ह्मणोनि[१] ऋत्विजवरीं[२] । तक्षक अकर्षणार्थ[३] मंत्रीं ।
अभिमंत्रूनि श्रुवापात्रीं[४] । महाअवदान[५] उच्चारिलें ॥ १७ ॥
तवं मरणाचिन्हाचें[१] त्रिदोषवारें[२] । तक्षकाआंगीं भरलें शारें[३] ।
कार्मुकापासोनि सुटिजे शरें । तैसा सत्वर पळाला[४] ॥ १८ ॥
सांडूनियां पाताळभुवन । शक्रलोका[१] जाऊनि[२] जाण[३] ।
देवेंद्रातें रिघाला[४] शरण[५] । प्राणधाकें ते[६] काळीं[७] ॥ १९ ॥

---

आवगीजे धु ; ७ चतुराननें धु पु४ ; ८ जयाचिया धु ; ९ दर्शनें ख पु४ ; १० अपुलें ख , इच्छिलें नि. ही ओवी औं मध्यें नाहीं.

१४. १ म्यां साक्षपें ख रा गो , मां साक्षेपें पु४ धु तं , साक्षेपें औं , मासाक्षेपें नां पु ; २ आरंभिलें नि मुं ; ३ फळा नि मुं गो , फळ औं पु ; ४–५ तें काय नि खवर्ग ( तें कांहीं पु४ ) ; ६ दंशशूक नि , द्वंद्वशूक औं पु , द्वंदशूक पु४ मुं नां धु गो·२ तं , दशक रा.

१५. १ पडले ख औं धु ; २ पुडती पु·४ औं गो·२ तं , पुणती गो ; ३ पेटाळीं पु४ ; ४ बद्धांजळी नि ; ५–६ यजमान स्तवी नि खवर्ग ; ७ याजका नि.

१६. १ तुह्मीं गो ; १–२ पाहिजे स्वामिनी नां , पाहिजे ब्राह्मण हो गोरे.

१७. १ म्हणून नि , ह्मणे पु४ ; २ ऋत्विज° नि तं , मुनिवरीं मुं ; ३ आकर्षणार्थ नि औं पु·४ गो·२ ; ४ स्त्रुवा° नि तं मुं, सुधापात्रीं गो२; ५ °अवदाना नि.

१८. १ मरणाचें नि मुं ; २ त्रिदशवारें धु ; ३ सारें ख नां औं , ज्ञारें नि ; ४ पावला मुं.

१९. १ °लोकीं मुं पु ; २ गेला ख औं ; ३ शरण औं , आपण धु तं ; ४ निघे मुं ; ४–५ लोटांगण औं ; ६–७ घातलें औं.

दीर्घस्वरें रुदना करीत । भयें थरथरां[1] कापत ।
ह्मणे स्वामी चुकवीं घात । प्राणदाता मज होईं ॥ २० ॥
असर्पी[1] जाली सकळ[2] सृष्टी । मी शरण रिघालों तुझे[3] पाठीं ।
मज वांचवावें[4] ये संकटीं । शिबी[5] ऐसें[6] देवेशा[7] ॥ २१ ॥
इंद्र ह्मणे दुष्ट[1] प्राणी । निःशंक निर्भय पापाचरणी ।
अनर्थ पातलिया[2] निदानीं[3] । मग दीनता अवगती[4] ॥ २२ ॥
वंशीं[1] अनृतवादी[2] येक । त्याचेनि पूर्वजां[3] होय नरक ।
तेविं तव दोषें पावक । पन्नगारण्या लागला ॥ २३ ॥
शरीरबळें[1] कां समर्थाश्रयें । ऐश्वर्यबळें महाअन्यायें ।
राहटतां[2] तयातें[3] अपायें[4] । महद्व्यसनीं पाडिजे[5] ॥ २४ ॥
जाणतां जोडोनि पापठेवा । मग ह्मणे धांव[1] सोडवीं देवा ।
तरी[2] तो देवाचियाही देवा । रक्षिला न वचे संकटीं[3] ॥ २५ ॥

---

२०. १ चळचळां औं पु.

औं मध्यें पुढील ओवी अधिक आहे.

तुजवीन आतां नाहीं अश्रे । मातें रक्षि देउनि अये ।
प्रळ (?) काद्रव्य कळाक्षय । जाला जन्मेजयसत्रीं ॥ २० अ ॥

२१. १ निःसर्पी नि, निसर्प गो·२ ; २ सर्व नि खवर्ग ; ३ तुझा (तुझां) ख पु४ रा तं गो पु, तुझ्या नि ; ४ वांचवुनी नि, वांचवीं ख पु·४ मुं औं रा गो·२ ; ५ सीभ्री ख पु४ मुं नां औं, शिभ्री पु रा, सिभि तं, सीश्री, धु (औं२ प्रसंप्रा), श्रेय नि ; ६ घेईं नि ; ७ देवेंद्रा नि खवर्ग.

२२. १ दुर्घट खवर्ग, दुर्धर रा ; २ पावलिया ख पु गो ; ३ निर्वाणीं औं ; ४ अवगमीं ख मुं, अवलंबी धु.

२३. १ वौंशीं नां धु गो ; २ अनर्थवादी ख ; ३ पूर्वजा नि ख पु४.

२४. १ प्रसादबळें मुं ; २ राहतां पु४ ; ३ तया नि ख औं पु ; ४ उपायें पु४ ; ५ पाविजे मुं औं पु, पाडिलें पु४.

२५. १ धांवें धु ; २ मग नि ; ३ सर्वथा रा, सेवटीं धु. ही ओवी गो·२ मध्यें नाहीं.

ह्मणोनि[1] पहिलेंचि[2] सांभाळावें । अन्याय[3] आतळों[4] नेदावें[5] ।
दोषातीत त्या[6] स्वभावें । दुःखभोग[7] असेना ॥ २६ ॥
असो ये समर्थीं न बोलों बोला । सदोषी[1] शरण[2] ह्मणोनि[3] आला ।
तोही न[4] वचे[5] त्याग[6] केला[7] । उत्तम पुरुषें[8] सर्वथा ॥ २७ ॥
आतां मरणभयाची वेथा[1] । सांडूनि[2] स्वस्थ[3] करीं चित्ता ।
पितामह ब्रह्मा[4] याची[5] अर्था[6] । असे[7] म्यां[8] पूर्वीं[9] प्रार्थिला ॥२८॥
सर्पसत्रापासूनि तूतें । भय नाहीं निज[1] निश्चितें ।
तक्षक ह्मणे माझेनि[2] चित्तें[3] । धैर्य सर्वथा न पविजे[4] ॥ २९ ॥
उत्तरी[1] करूनि आपुला[2] अंगीं । मज वांचवीं[3] ये[4] प्रसंगीं ।
इंद्रें बंधुत्व स्मरोनि[5] जगीं[6] । भोगी केला स्वकंठीं ॥ ३० ॥
येरीकडे पाताळभुवनीं । वासुगी[1] संतप्त अंतःकरणीं ।
भगिनी समीप[2] पाचारूनी । तियेप्रति[3] विलपतु[4] ॥ ३१ ॥

---

२६. १ ह्मणौनि औं पु , ह्मणउनी तं ; २ पूर्वीं मुं ; ३ अन्याया नि पु४ ; ४ आंग नातळों पु४ , आंतळों नि ; ५ द्यावें पु४ ; ६ या नि , (–) मुं गो२ ; ७ दुष्ठभोग नां.

२७. १ सदोषही धु , सदोसिही तं ; २–३ ह्मणोनि शरण नि ख गो॰२ ; ४–५ वचनें ख , न वटे धु ; ६–७ त्यागिला ना पु ; ८ पुरुषीं गो२ , पुरुष तं.

२८. १ व्यथा नि मुं रा गो , व्येथा पु४ , वार्ता ख ; २ सोडोनि नि ; ३ स्वस्त पु धु तं ; ४ ब्रह्मी पु॰४ औं धु ; ५ याच्या औं पु ; ६ वार्ता पु४ ; ७–९ म्यां पूर्वीं असे खवर्ग.

२९. १ गा नि पु४ औं , तुज नां गो , (–) मुं पु ; २ माझ्या औं पु ; ३ चितें पु४ धु गो ; ४ धरवे नि खवर्ग.

३०. १ उत्तरीय नि ; २ आपुल्या नि मुं औं [ आपुलां ] ; ३ वांचविजे मुं नां पु ; ४ हे गो ; ५ सांडोनी पु४ ; ६ वेगीं मुं , श्रेहांगीं रा , स्वर्गीं धु , स्वांगीं गो२ , स्रगी तं.

३१. १ वासुकी नि ख औं रा तं ; २ सम्मुख धु ; ३ तिये जवळी नि खवर्ग ; ४ विलपत नि ख पु४ रा.

भ्रम लागला माझिये शरीरीं[1] । दृष्टी[2] येतसे अंधारी[3] ।
बोलतां चालता चांचरी । वाचा[4] शरीर[5] जातसे[6] ॥ ३२ ॥
विस्मृति उपजे क्षणक्षणां[1] । पतंगाऐसी मनवासना ।
धांवोनि प्रदीप्त हुताशना । आलिंगावें वाटतसे ॥ ३३ ॥
इष्ट मित्र बंधु कुमर । जाला सकळांचा संव्हार[1] ।
उरले[2] तीहींसीं[3] मत्शरीर[4] । पडेल[5] आतां हुताशीं ॥ ३४ ॥
ग्रीष्मीं आटे[1] तडागजीवन । तैसा[2] परिवार जाला न्यून[3] ।
शेष सर्पांसहित जाण । पूर्णाहुती म्यां होणें ॥ ३५ ॥
जिये[1] अरिष्टपरिहारार्थीं । तुज वोपिलें ऋषीचे[2] हातीं ।
तिये[3] व्यसनदुस्तरावर्ती[4] । आजि[5] आह्मीं[6] बुडालों ॥ ३६ ॥
प्रार्थूनियां[1] आपुलिया पुत्रा । सीघ्र पाठवीं[2] नरेंद्रसत्रा ।
बोधूनि[3] पार्थिवा[4] सुपवित्रा । यज्ञसमाप्ति करविणें[5] ॥ ३७ ॥
राजहृदयींचा कोपाग्नी । शांत होय जिहीं[1] वचनीं ।
ऐसें सीतळ[2] अनुवादोनि । समाधान करावें[3] ॥ ३८ ॥

---

३२. १ **सिरीं** रा ; २ **पृष्टी** गो·२ ; ३ **अवधारीं** गो·२ ; ४–६ **शरीर विकल होतसे** औं.

३३. १ **क्षीणक्षीणां** पु४ गो·२. ही ओवी नां मध्यें नाहीं.

३४. १ **संहार** नि ख मुं औं पु ; २ **उरलें** पु·४ ; ३ **तेही** ख मुं औं, **तेंहिस** पु४ गो , **तेंही** पु ; ४ **मच्छरीर** नि , **मत्सर** ख , **मछरीर** पु४ नां , **मत्तशरीर** तं ; ५ **पडती** गो·२.

३५. १ **वाटे** गो२ ; २ ( – ) गो·२ ; ३ **क्षीण** नि , **शून्य** ख मुं औं , **तैसा न्यून** गो२.

३६. १ **ज्या** नि ; २ **रुषीचा ( चां )** पु४ , **ऋषीच्या** ख औं पु रा , **ऋषीचा** गो२ तं ; ३ **त्या** नि ; ४ °**दुरावर्ती** नां पु , °**दुस्तरगतीं** नि ; ५–६ **आह्मीं सर्वही** नां.

३७. १ **पाचारूनि** औं पु ; २ **धाडीं** मुं ; ३ **बोधीं** पु४ ; ४ **पार्थिव** मुं नां औं ; ५ **कारणें** धु गो , **करवणें** नि.

३८. १ **जिये** पु गो·२ , **जिया** औं रा ; २ **शीतळ** नि पु तं ; ३ **करवावें** पु. धु मध्यें ३८ व ३९ ह्या ओवींची अदलाबदल आहे.

मैत्रें[1] अथवा तपोबळें । वांचवावीं मातुळकुळें[2] ।
याहीहूनि[3] येश[4] आगळें । भुवनत्रयीं असेना[5] ॥ ३९ ॥
ऐकोनि अग्रजमुखींची मात । जरत्कारीनें आस्तीक[1] सुत[2] ।
अनुष्ठानींहुनी[3] त्वरित । सावध केला ते काळीं ॥ ४० ॥
त्याप्रति[1] सांगे[2] रुदितवक्त्रीं । जनमेजयाचे महासत्रीं[3] ।
तुझे मातुळ पुत्रपौत्रीं । भस्म जाले असंख्य ॥ ४१ ॥
उरले तेही पडतील[1] कुंडीं । यालागीं[2] जाई[3] तूं[4] तांतडीं ।
यज्ञसमाप्ति[5] करूनि खंडीं । मृत्युपाश[6] सुहृदांचे[7] ॥ ४२ ॥
पुत्र पुसे[1] अति साक्षेपें[2] । सर्प किमर्थ जाळिले नृपें ।
येरी[3] ह्मणे मातृशापें । बांधोनि बळें होमिले[4] ॥ ४३ ॥
त्या शापासि मूळ कारण । उच्चैश्रवा[1] श्वेत कीं कृष्ण ।
यदर्थीं शफतांचें[2] प्रमाण । कद्रुविनतेसीं मांडलें[3] ॥ ४४ ॥
कृत्रिम करूनि सुनीळ वेष[1] । कद्रु ह्मणे भोगीन[2] यश[3] ।
सर्प साह्य नव्हतां रोष । मातेसि आला ते काळीं ॥ ४५ ॥

---

३९. १ **मंत्रें** नि रा खवर्ग ; २ **मातृकुळें** नि ; ३ **याहुनि** नि खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) ; ४ **यश** नि ख मुं , **येक** रा ; ५ **न देखें** नां.

४०. १–२ **आपुला सुतु** औं पु; ३ **अनुष्ठाना°** धु तं मुं , **ध्यान भंगूनि** नि

४१. १–२ **पुत्रा बोधी** नि ; ३ **सर्पसत्रीं** गो२.

४२. १ **पडती** नि औं नां , **पडिले** गो२ ; २–४ **तुवां जावोनि** गो२ ; ५ **मखसमाप्ति** नि ; ६ **मृत्यपाश** रा धु ; ७ **मातुळांचा** पु , **सुहृदांचा** औं धु तं. पु४ मध्यें तिसरा चरण नाहीं व चौथा चरण **येज्ञसमाप्ति करवणें** असा आहे.

४३. १ **विचारी** नि ; २ **साक्षपें** औं पु रा गो२ ; ३ **येरू** नि ; ४ **होमिती** रा.

४४. १ **उच्चैःश्रवा** नि ; २ **शपथांचें** नि तं नां रा , **शपतेचें** औं पु , **शफथाचें** गो२ , **शफतासी** ख ; ३ **मांडिलें** नि.

४५. १ **केश** पु४ ; २–३ **भोगीश यीश** धु. ही ओवी नि खवर्ग ( पु४ प्रसंप्रा ) मध्यें नाहीं.

साच न करा[1] माझें वाक्य । मातृद्रोही परमभक्षक ।
तुह्मां भक्षू रे[2] पावक । सत्रीं[3] पारिक्षिताचे[4] ॥ ४६ ॥
निष्ठुर शाप ऐकतां[1] तेथ । शेष वासुकी भयकंपित[2] ।
यत्न[3] करिते[4] जाले[5] घात । चुकवावया स्वकुळाचा[6] ॥ ४७ ॥
आंथुरणा[1] वोपिला देहो । माथां मेदिनी वाहिली[2] पाहा[3] हो[4] ।
कंठभूषणीं[5] गिरिजानाहो । तोषविला चिरकाळ[6] ॥ ४८ ॥
नेत्र[1] होऊनि सिंधुमथनीं[2] । सुरांसहित वज्रपाणी ।
आराधिला कुळरक्षणीं । याचीलागीं सुपुत्रा[3] ॥ ४९ ॥
तपें[1] आर्जवें आंगसेवा । संतोषविलें ब्रह्मदेवा ।
तेणें उपाय कथिला बरवा । कृपेंकरूनि तो[2] ऐक[3] ॥ ५० ॥
जरत्कारूसी[1] जरत्कारी । दिधलिया[2] जन्मेल[3] तिचां[4] उदरीं ।
तो आस्तीक पावकजोहरीं । संरक्षील सर्पांतें[5] ॥ ५१ ॥
तो[1] आजि प्राप्त जाला काळ । सत्वर उठीं न लगतां[2] वेळ ।
वचना[3] गोवूनि कुरुनृपाळ[4] । यज्ञसमाप्ति करवणें[5] ॥ ५२ ॥

---

४६. १ **कराल** नि, **करी** ख, **करवे** नां; २ **सापत्न** नि; ३ **पत्रीं** गो·२ ४ **परिक्षिताचे** मुं पु·४ धु, **परिक्षितीचे** ख नां रा गो, °**क्षिताच्या** नि.

४७. १ **ऐकोनि** नि; २ **भयचकित** धु, **भयें कंपित** पु४ मुं तं; ३ **यत्नें** ख पु४ मुं, **यज्ञ** धु; ४–५ **करिता झाला** नि; ६ **कुळाचा** नि.

४८. १ **आंथरुणा** नि ख पु·४ नां; २ **धरिली** नि; ३–४ **पाहों** ख नां औं; ५ °**भूषणें** पु४ मुं औं; ६ **चिरकाळें** पु४ मुं नां.

४९. १ **रज्जु** नि, **वेत्र** मुं रा, **सूत्र** धु गो२, **मित्र** औं; २ **समुद्रमथनीं** मुं; ३ **पावित्रा** ख.

५०. १ **तणें** गो, **तव** पु; २ **तें** मुं गो२; ३ **ऐकें** नि, **ऐका** मुं गो२ तं.

५१. १ **जरत्कारासि** मुं औं पु; २ **दिधल्या** नि; ३ **उपजेल** मुं औं पु, (–) धु तं; ४ **तिच्या** नि, **तिचा** पु४ नां औं गो२ तं; ५ **सर्वांतें** नि ख पु·४ नां, **निर्धारें** मुं, **प्रतापें** औं·

५२. १ **तोचि** ख; २ **लावीं** नि; ३ **वचनीं** नि, **वचनें** औं गो·२; ४ **भूपाळ** नि औं, **कुरुभूपाळ** ख मुं नां रा गो, **कृपाळ** पु, **करुणापाळ** धु; ५ **कराविणें** नि.

उरलीं वांचवीं[1] सर्पवृंदें[2] । भूगोळ चर्चीं कीर्तिसुगंधें ।
मातृमुखींच्या[3] सखेदशब्दें । आवेशला[4] आस्तीक ॥ ५३ ॥
उठता[1] जाला अतिलगबगें[2] । गमन इछी[3] मानसवेगें[4] ।
तेवींचि[5] माते[6] मातुळा सांगें । चिंता कांहीं न करावी ॥ ५४ ॥
वार्ता न पडेचि[1] माझिये[2] कानीं[3] । तवं[4] प्रारब्धें आटले[5] फणी ।
आतां स्पर्शों न[6] सके[7] वन्ही[8] । हें साचार जाणिजे[9] ॥ ५५ ॥
मातृमुखींचा[1] अलोट शाप । जन्मेजयाचा असाध्य कोप ।
रुत्विजांचा[2] सिद्धसंकल्प[3] । तीन्ही[4] करीन निस्तेज[5] ॥ ५६ ॥
स्तवनीं तोषवूनि नृपति । प्रसन्न करीन[1] वरदमूर्ति[2] ।
संभावने[3] यज्ञसमाप्ति । हेचि दक्षणा मागणें[4] ॥ ५७ ॥
ऐसें भगिनीचे[1] वचनामृतें । अमरत्व[2] देऊनि[3] वासुकीतें ।
माघारूनि मनपवनातें । सत्रसदना पातला ॥ ५८ ॥
द्वारस्त[1] आड करितां दंड । देखे[2] प्रदीप्त दिव्य मार्तंड ।
माघारूनि म्हणे[3] प्रचंड । ईश्वरपुरुष[4] दिसताहे ॥ ५९ ॥

---

५३. १ वांचीजे पु४ , वांचवुनी गो२ , २ सर्पकुळें वृंदें धु ; ३ मातृ° नां गो·२ , मातेचिया धु ; ४ अवश्य चालिला नां.

५४. १ उठिता नां तं ; २ अति लागवेगें पु , लागवेगें धु , लगबगें पु४ ; ३ इच्छी नि ; ४ मनोवेगें नि ; ५ तेवी पु४ , तेवेळे मुं , तेविषीं गो·२ ; ५–६ मातेसि म्हणे नि.

५५. १ पडतां नि ; २ माझे नि , माझा ( माझां ) ख पु४ रा ; ३ श्रवणीं नि; ४ तव नि पु४ मुं तं , ५ आठवे पु४ ; ६–७ नेदी औं ; ८ कोण्ही ख ; ९ मांनीजे पु४.

५६. १ मातेमुखींचा पु४ ; २ ऋत्विजांचा नि नां तं पु ; ३ सिद्धि° नि; ४ तोही औं पु , वन्ही गो२ ; ५ निस्तेजें पु४ नां रा तं.

५७. १ करूनि पु४ गो·२ ; २ हव्यमूर्ती नि , ३ संभावना ख नि औं ; ४ मागेन नि मुं औं पु.

५८. १ मातेच्या नि ख ; २–३ वचनें अमरत्व औं.

५९. १ द्वारस्थें नि रा ख , द्वारस्तीं औं , द्वारस्थ मुं ; २ देखोनि नि ; ३ (+) हा नि ; ४ ईश्वरी° नि.

सत्कारूनि[1] शीरशरदंडें[2] । ह्मणे स्वामिया[3] जाइजे[4] पुढें ।
येरें[5] प्रवेश करोनि कोडें । यज्ञमंडपा[6] पातला ॥ ६० ॥

कुंडीं प्रत्यक्ष हुताशन । राजा सदस्य[1] ऋत्विजगण ।
वाटे येकचि मेषवाहन । अवघीं[2] रूपें[3] अवगला ॥ ६१ ॥

कीं त्या चंद्रसूर्यप्रतिमा । तैसें देखिलें ब्राह्मणोत्तमा[1] ।
आणि[2] ब्राह्मणींही ऐसिया[3] उपमा । त्या वरिष्ठा देखिलें[4] ॥ ६२ ॥

जेंवी बळीचिया[1] यज्ञमंडपीं । उपेंद्र[2] उभा ब्रह्मस्वरूपीं[3] ।
तैसा आस्तीक परमतपी । ऋत्विजगणीं देखिला ॥ ६३ ॥

पसरूनि पवित्र पद्महस्त । लक्षूनि समुदाय समस्त ।
स्तवनीं नमनीं[1] विनयवंत । आसीर्वचनीं[2] अनुवादे ॥ ६४ ॥

कीं[1] वाक्यपुष्पीं पुष्पवंत[2] । सिद्धिगंधें[3] मघमघित[4] ।
प्रसन्नतेचा[5] पारिजात । वृष्टी करीत[6] रायातें[7] ॥ ६५ ॥

प्रणम्य यज्ञनारायणा । नमो सदस्य[1] ऋत्विजगणा ।
स्वास्ति पांडवकुळभूषणा । जयकल्याण तुज असो[2] ॥ ६६ ॥

---

६०. १ **नमस्कारोनि** नि खवर्ग ; २ **शिरसा दंडें** नि , **सीर सदंडें** पु४ मुं , **शरीरदंडें** गो॰२ ; ३ **स्वामी** नि ख ; ४ **जावें** नि , **जाइजो** गो२ तं ; ५ **मुनी** नि ; ६ **°मंडपीं** नि.

६१. १ **सदृश्य** पु४ , **सादृश्य** गो ; २ **ऋत्विज** मुं , **अवघियां** औं पु ; ३ **रूपीं** नां औं.

६२. १ **द्विजसत्तमा** औं ; २ **हवनीं** नि , **आस्तीक** मुं ; ३ **ऐसी** नि ख ; ४ **देखिली** नि.

६३. १ **बळीचा (चां)** ख पु रा धु गो तं ; २ **कीं उपेंद्र** नि ; ३ **ब्रह्मरूपी** नि औं पु धु तं , **येब्रस्वरूपी** पु४.

६४. १ **मानीं** धु , **मनी** पु ; २ **आसीर्वचनें** औं पु , **आसीर्वचना** धु.

६५. १ **किंवा** ख औं ; २ **पुष्पवसंत** नि , **प्रफुल्लित** मुं ; ३ **सिद्धगंधें** ना पु धु , **सींधुगंधें** गो , **बुद्धिसुगंधें** नि ; ४ **घमघामित** नि , **मगमगीत** पु४ ; ५ **सुप्रसन्न°** औं पु , ६–७ **करी तयातें** नि.

६६. १ **सदृश्य** ख पु४ ; २ **आसे** पु४.

तुष्टिरस्तु पुष्टिरस्तु । धर्मैश्वर्यवृद्धिरस्तु[१] ।
सार्थकायुःसिद्धिरस्तु[२] । शांतिरस्तु[३] तव प्रभो ॥ ६७ ॥
विवेकज्ञानसमृद्धिरस्तु । संततहरिहरभक्तिरस्तु[१] ।
प्रतापप्रतिज्ञाविजयोस्तु[२] । भद्रमस्तु[३] तव प्रभो ॥ ६८ ॥
भवदुर्जयशत्रुक्षयोस्तु[१] । अक्षयपदप्राप्तिरस्तु ।
भूतदयाविशेषोस्तु[२] । कुशलमस्तु[३] तव प्रभो ॥ ६९ ॥
सर्वाभीष्टप्राप्तिरस्तु । सर्वारिष्टशांतिरस्तु ।
संततनित्यानंदभोगोस्तु[१] । शिवमस्तु[२] तव प्रभो ॥ ७० ॥
निर्दोष[१] कीर्ति[२] अक्षय[३] असो[४] । लोकापवादीं[५] सभयता[६] असो[७] ।
याचकार्तिशमनीं[८] असो[९] । प्रशस्त[१०] बुद्धि[११] सर्वदा[१२] ॥ ७१ ॥

---

६७. १ **धर्मधैर्य°** पु४ ; २ **प्रतापप्रज्ञाविजयोस्तु** पु४ , **सार्थकासिद्धि°** धु तं , **सार्थकार्य°** गो ; ३ **भद्रमस्तु** पु४.

६८. १ **संततीहरिहर°** नां औं पु गो ; २ **प्रतापप्राज्ञा°** नि , **प्रतापज्ञानविजयोस्तु** मुं औं , **प्रतापप्रज्ञा°** नां , **प्रतापप्रजाविजयोस्तु** पु ; ३ **सर्वभद्रमस्तु** नि , **शांतिरस्तु** पु४.

पु·४ यांत ६७ व ६८ ओव्यांचा गोंधळ केलेला दिसतो.

६९. १ **भवद्दुर्जय°** नि , **भयदुर्जनक्षयोस्तु** ख , **°शत्रुक्षोभोस्तु** औं; २ **विषयेदयाविषयेतस्तु** पु४ , **°विशेषस्तु** ख औं गो२ , **सर्ववरिष्टशांतिरस्तु** गो ; ३ **कुळमस्तु** ख पु४ औं. ही ओवी पु व धु मध्यें नाहीं.

७०. १ **संतती°** नां पु गो२ , **संततीनित्यानंत** ख , **°नित्यानंत°** मुं, **सतत°** नि ; २ **कुशलमस्तु** गो·२.

७१. १–४ **प्रताप प्रजा विजय वसो** औं ; ३ **अक्षई** पु४ धु गो२ , (–) मुं ; ४ **आसे** पु४ ; ५ **°वादें** पु४ गो ; ६ **भय** ख , **सभ्यता** गो ; ७ **वसो** नि , **नसो** तं , **नसे** पु४ ; ८ **येशकीर्तिसी°** पु४ , **निर्दयावरी दय** औं ; ९ **नसो** औं, **आसे** पु४, **वसो** पु तं ; १० **प्रस्तुत** ख पु४ मुं निपा, **प्रस्तुति** नां ; १०–१२ **विषेषात्कारें तुज प्रभो** औं ; ११ **समंधि** ख, **सद्बुद्धि** पु४, **सिद्धि** नि पा ; १२ **समस्ता** ख , **सर्वथा** गो·२.

निर्दयाचारीं[1] आवडी नसो । दुराग्रहीं दृढता नसो ।
पूर्णापूर्णकर्मीं नसो । असंतोष[2] विकळता[3] ॥ ७२ ॥
अहंममतेची[1] भावना[2] नसो । दुष्टापराधीं[3] स्मरण[4] नसो ।
संतमहंतवचनीं नसो । अनादर आणि उपेक्षा ॥ ७३ ॥
श्रद्धा[1] मेधा प्रज्ञा येश । विद्या बुद्धि बळ विशेष ।
तेजारोग्य[2] श्री आयुष्य[3] । हो[4] वाढतें तुज राया ॥ ७४ ॥
माझे आशिष[1] अनेक । फळप्रद होतु[2] तात्काळिक ।
माझेंही वांछित येक[3] । हो संपूर्ण तुझेनी ॥ ७५ ॥
तथास्तु ऐसें[1] त्रिवारवचनीं । उत्तरें[2] दिधलीं ऋषिब्राह्मणीं[3] ।
पुढती[4] ऐकों ठेले श्रवणीं । वाग्विलास ऋषीचा ॥ ७६ ॥
सोमयज्ञ वरुणयज्ञ । ब्रह्मयज्ञ यमधर्मयज्ञ ।
हरिमेध रंतिदेवाचा[1] यज्ञ । तत्समान तव क्रतु ॥ ७७ ॥
गययज्ञ शशबिंदुयज्ञ[1] । वैश्रवणाचा[2] सुमेधयज्ञ[3] ।
नृगयज्ञ अजमीढयज्ञ । तत्समान तव क्रतु ॥ ७८ ॥
रामदाशरथीचा यज्ञ । युधिष्ठिराचा महायज्ञ[1] ।
कृष्णजगदीश्वराचा[2] यज्ञ । तत्समान तव क्रतु ॥ ७९ ॥

---

७२. १ निंदाचारीं ख, निर्दयांवरी मुं; २ संतोष धु तं, (+) आणि नि धु तं; ३ विकलपता ख.

७३. १ °ममता मुं, °ममती गो·२; २ वासना ख; ३ दुष्टापवादी तं; ३-४ दुष्टापराध स्मरणीं नि, दुराग्रहीं दृढता धु नि.

७४. १ श्रधा धु, श्रत्धा गो तं पु४; २ तेज आरोग्य गो नि; ३ आयुष नि तं; ४ होवो नि, हें पु·४, हों गो·२.

७५. १ अशेष ख मुं नां औं पु रा, आशेष पु४ गो·२, असिस तं; २ हो नि ख, होत नां तं, होतुं कां गो·२, होतुं पु४; ३ वाक्य औं पु.

७६. १ (−) गो२; २ उतरें पु४; ३ ऋषिमुनीं औं; ४ पुडती पु, पुणती गो.

७७. १ रति° रा धु गो·२, यंति° नां पु, जयंति° औं मुं, पति° ख.

७८. १ ऋषिबिंदु° औं पु, शाशिबिंदु° रा गो, शेषबिंदु° नां पु४; २ वैश्रवयाचा ख पु मुं नां; ३ सुमेधा° औं पु. नि मध्यें ही ओवी येथें नसून पुढील ८० ओवीनंतर आहे.

७९. १ राजसुयज्ञ औं; २ °जगदेश्वराचा मुं नां पु गो.

पृथुयज्ञ पुरूरवयज्ञ[1] । धुंधुमारश्वेतकियज्ञ[2] ।
हरिश्चंद्रनृपाचा यज्ञ । तत्समान तव क्रतु ॥ ८० ॥
व्यास श्रीकृष्ण आपुला[1] अंगीं । उत्तर साधक[2] पांडवयागीं ।
त्याहूनि विशेष तुझा जगीं । सर्पयज्ञ वाखाणे[3] ॥ ८१ ॥
शक्ती भाक्षिला[1] निशाचरें । राक्षस दाहिले[2] पराशरें[3] ।
तोही दृष्टांत येथें न[4] पुरे[5] । तुळावया[6] तव[7] यज्ञा[8] ॥ ८२ ॥
अग्निसूर्याहूनि[1] सुतेज[2] । यज्ञपरिचर्या[3] करिते[4] द्विज ।
वृत्रसूदनासारिखा[5] मज । तुझा[6] याग[7] दिसताहे ॥ ८३ ॥
ऐसे ऋत्विज आणीके मखीं । नाहीं ऐकिले तिहीं लोकीं ।
ज्याचे[1] शिष्य आपुले[2] मुखीं । वेद नूतन निर्मिती ॥ ८४ ॥
वंशानुवंशीं[1] हस्तक[2] माथें । न खालविती[3] आणिकांतें ।
ऐसे[4] करूनि[5] सोडिले[6] मागते[7] । न मागते[8] करूनियां ॥ ८५ ॥
दानधनाचे[1] प्रबळवृष्टी[2] । याचक्रेरेणू लोपले[3] भृष्टी[4] ।
पूर्णतेचे[5] पृथ्वीपटीं[6] । हर्षांकुर[7] माजले ॥ ८६ ॥

---

८०. १ **पुरूरवा°** नि औं धु ; २ **धुंधुमारी श्वेतकीयज्ञ** नि खवर्ग. ख पु मध्यें ही ओवी नाहीं.

८१. १ **आपुले** मुं , **आपुल्या** नि औं पु [ **आपुलां** ] ; २ **साधी** ख ; ३ **वाखणें** पु४ नां.

८२. १ **भाक्षिल्या** नां गो ; २ **दाहिले** नां रा गो ; ३ **पाराशरें** पु·४ मुं नां गो ; ४–५ **नुपरे** धु तं ; ५ **सरे** नि नां मुं औं पु; ६–८ **तव यज्ञीं द्यावया** मुं.

८३. १ **यज्ञीं सूर्या°** मुं ; २ **सतेज** पु·४ मुं ; ३ **यज्ञपंचकार्य** गो२ ; ४ **करिती** ख औं पु रा , **करित** पु४ नां गो२ , **करी** गो२ ; ५ **वृत्रसदना°** नां औं पु ; ६–७ **अध्वर तुझा** औं पु.

८४. १ **त्याचे** नि , **ज्यांचे** गो२ ; २ **आपुला ( लां )** धु तं , **आपुल्या** नि ख औं.

८५. १ **वौंशा°** ख धु गो , **वंशानवंशीं** मुं नां पु ; २ **हस्त** गो·२ ; ३ **खोलविती** नि , **खालाविती** पु तं ; ४ (–) गो·२, **ऐसें** नि ; ५–६ **सोडिले करूनि** औं पु ; ६ **सांडिले** नि ; ७ **मातें** पु४ मुं नां , **मागुते** ख गो·२ ; ८ **मागे ते** नि , **मांगतें** पु४.

८६. १ **°धनाची** नि , **°धनाच्या** धु ; २ **सबळ°** औं , **बळ°** पु ; ३ **लोपली** नि ख नां , **लोपला** पु४ मुं ; ४ **सृष्टी** नि तं ; ५–६ **पूर्णपृथ्वीचिया**

तुझियाऐसा आणिक[1] यागीं । तृप्त[2] मऱ्हेचि[3] चत्वारशृंगी[4] ।
अनेक[5] पुरुषीं[6] अनेक युगीं । अपार हविषें[7] होमितां ॥ ८७ ॥
विभावसु चित्रभानु महात्मा । हिरण्यरेता कृष्णवर्त्मा[1] ।
विश्वभुक्[2] हुतभुक्[3] वान्हि नामा । जगदंतर[4] निवासी ॥ ८८ ॥
शिखा प्रदक्षिणावृत[1] । हव्य[2] भक्षुनि परम तृप्त ।
जाला[3] दिसे[4] प्रसन्नवंत । देदीप्यमान[5] तेजस्वी ॥ ८९ ॥
अनंतयुगीं अनंतपुरुषीं । होम[1] करितां[2] यागविशेषीं[3] ।
यथेष्ट[4] तृप्ती तुझिया ऐसी । नाहीं हुताश[5] पावला ॥ ९० ॥
सोम ज्योतिष्टोम[1] चैन[2] । महाव्रतादि स्वर्गारोहण[3] ।
वसववैष्णवमाहेश्वरयज्ञ[4] । बहु सुवर्ण[5] शतक्रतु ॥ ९१ ॥
पुंडरीक[1] वाजपेय । अश्वमेध राजसूय ।
विश्वजितादि अप्रमेय । असंख्य यजिले[2] याजकीं ॥ ९२ ॥

---

**पृष्टीं** नि , **पूर्णपृथ्वीपृष्टीं** ख , **परिपूर्णपृथ्वीपोटीं** नां , **पूर्णपृथ्वीपृष्टीपटीं** औं पु, **पूर्णपृथ्वीपृष्टीतटी** पु४ , **पूर्णतेचि पृथ्वीपाटी** गो·२ तं ; ७ **हर्षाकार** पु४ गो , **हर्षाकर** गो२.

८७. १ **आणिके** नि गो·२ , **आणिकां** मुं , **आणिखे** पु४ ; २ **तृप्ती** नि नां धु औं गो·२ ; ३ **नव्हे** नि पु४ मुं नां गो·२ ; ४ **चत्वारीशृंगी** मुं नां औं गो२ ; ५ **आणिखे** पु४ ; ६ **पुरुषार्थ** धु ; ७ **हविर्भाग** नि , **पुरुषें** ख , **हाविष** मुं गो·२ तं.

८८. १ **कृष्णवर्मा** गो·२ ; २ **विश्वक** ख नां औं पु ; ३ (–) गो·२ ; ४ **जगदांतर** नि.

८९. १ **प्रदक्षिणावर्त** नि , **प्रदक्षिणांवर्ते** पु४ , **प्रदाक्षिणोवर्तु** मुं ; २ **हाविष** खवर्ग , **हवि** नि ; ३–४ **जैं झाला दिसे** नि , **जो दिसे** ख पु४ मुं नां , **होता दिसे** औं पु ; ५ **दैदीप्य°** नि ख.

९०. १–३ **यागीं होमिले विशेषी** नि , ३ **हुतांशीं** औं पु ; ४ **तेथ** औं , **तेथें** धु , **येथें** तं ; ५ **हुतांश** खवर्ग रा गो , **हुताशन** धु.

९१. १–२ **°ष्टोमाचेनि** गो·२ ; २ **चयन** नि ( मूळ संस्कृत. हें संस्करण असावें व **चैन** हें त्याचें अपभ्रष्ट रूप दिसतें ), **चैतन्य** पु४ नां , **वैन** धु तं , **यज्ञ** औं ; ३ **°रोहणी** गो२ ; ४ **शैववैष्णव°** नि , **वासववैष्णव°** औं धु , **°माहेश्वरें-यज्ञीं** गो२ ; ५ **सुवर्णकें** पु , **सुवर्णें** नां औं , **सुवर्णक** रा.

९२. १ **पौंडरीक** नि, **पौंड्रिक आणि** धु, **पौंड्रिरीक** मुं; २ **योजिले** औं पु.

त्या यज्ञकृत्यींमाजी सहसा । गृहपति[1] नाहीं तुझिया ऐसा ।
व्रत[2] शील देखोनि हरुषा[3] । पात्र[4] जालों[5] बहुसाळ[6] ॥ ९३ ॥
खट्वांग नाभ[1] दिलीप नृपति । ययाति मांधाता चक्रवर्ती ।
उमाणितां[2] तुझिये[3] कीर्ती । उणावो[4] दिसे अपाडें[5] ॥ ९४ ॥
प्रजापाळक जीवलोकीं । दुसरा[1] तुळावया[2] तुकीं ।
नाहीं ह्मणतां कवीचे[3] मुखीं । शंका दूषण असेना ॥ ९५ ॥
दंडनीतीं[1] जैसा[2] यम । सत्य सदय[3] दुसरा धर्म ।
शस्त्रविद्याविषईं[4] राम । परशुराम[5] प्रतिज्ञे[6] ॥ ९६ ॥
सुव्रतीं[1] जैसा गंगातनयो । प्रतापतेजें[2] भूलोकसूर्यो ।
निर्मळकीर्ती रोहिणीप्रियो । लोकरक्षणीं[3] श्रीविष्णु[4] ॥ ९७ ॥
वाल्मीकितुल्य धैर्यश्रेष्ठ । कोपें[1] जैसा श्रीवासिष्ठ ।
अगस्तीसारिखा[2] बळिष्ठ । दधीचि[3] तैसा[4] औदार्यें[5] ॥ ९८ ॥
कृष्णातुल्य[1] गुणसंपन्न । प्रभुत्वें[2] जैसा सहस्रनयन ।
प्रयत्नविषयीं[3] उपमा[4] न्यून[5] । परंतु[6] होसी भगीरथु ॥ ९९ ॥

---

९३. १ ग्रहपति धु गो मुं, गार्व्हपति नां औं पु ; २ वृत्त नि तं मुं ; ३ हर्षा नि खवर्ग, सहसा धु ; ४–५ पावलों गो·२ ; ६ हर्षातें धु.

९४. १ नाभाग नि तं, नामा ख, नाभी धु, नाग पु ; २–३ तयांची उमाणितां नि ; ४ उणीव नि ख, उणाव पु·४ गो·२ नां, उणा औं ; ५ आपाडे नि पु४ धु.

९५. १ दुजा नि ; २ पाळुनियां पु४ ; ३ काविचा ( चां ) ख पु४ नां औं धु गो२ तं.

९६. १ दंडुनी ख ; २ दुसरा नि खवर्ग ; ३ सद्वये पु४ ; ४ शास्त्रविद्यावि-खीं नि ; ५ फरश° पु·४ धु तं, येकनिष्ठे औं ; ६ प्रातिज्ञा औं पु.

९७. १ सुवृत्तीं नि, सुवृति पु४; २ प्रतापें जैसा धु ; ३ प्रजारक्षणीं नि ; ४ श्रीकृष्ण पु तं.

९८. १ तपें नि ; २ अगस्त्यासारिखा धु तं ; ३–५ औदार्यें दधीची-सारिखा नि, दधीचीसारिखा औदार्यें खवर्ग.

९९. १ विष्णुतुल्य गो·२ ; २ प्रभुत्व पु४ नां तं ; ३ प्रयत्नाविषयीं नि मुं नां, प्रयत्ने° ख पु४, प्रेत्न° पु ; ४ उपमे रा गो२ तं ; ४–५ उपमन्य नि मुं नां ; ६ परम मुं.

भरतश्रेष्ठा[1] परीक्षितिपुत्रा । प्रिय हो तुज आणि तुझिया मित्रा ।
तुमचे स्नेहें प्रीतिपात्रा[2] । प्रेम करू आम्हुतें ॥ १०० ॥
घनगंभीरगिरागजरें[1] । सकळिकांचीं मनमयोरें[2] ।
हर्षें नाचतां राजेश्वरें । अत्यादरें बोलिजे[3] ॥ १०१ ॥
वयें[1] बालक दिसे नयनीं । ज्ञानें[2] वडील सकळांहुनी[3] ।
हा श्रेष्ठ पूज्य[4] मजलागूनी । यज्ञमंडपीं विशेषें[5] ॥ १०२ ॥
इछा[1] करूनि[2] अंतर्यामीं । आला[3] असेल[4] जये[5] कामीं ।
तें अवस्य[6] दिधलें पाहिजे आह्मीं । कर्मसिद्ध्यर्थ ये काळीं ॥१०३॥
ह्मणोनि कनकपीठ हातें[1] । देऊनि ह्मणे बैसिजे[2] येथें ।
पूजा अंगीकारोनि सुचित्तें[3] । मग[4] इछेतें[5] निरोपीं[6] ॥ १०४ ॥
आज्ञा देसी ऋषिभगवंता[1] । ते[2] म्यां[3] आदरें वंदणें[4] माथां ।
तुझिया सामर्थ्यसत्ता[5] । संकल्प पावेल सिद्धीतें ॥ १०५ ॥
आस्तीक ह्मणे जया काजा । मी आलोंसें[1] महाराजा ।
तें देईन[2] ऐसा शब्द[3] तुझा । नेमस्त[4] कानीं ऐकणें[5] ॥ १०६ ॥

---

१००. १ भारत° नि मुं पु ; २ प्रियपात्रा नि रा , प्रतिपात्रा पु·४ गो·२.

१०१. १ °गिरिगजरें पु४ ; २ मनमयूरें नि , मनोमयोरें धु ; ३ बोलिजेलें नि , बोलिजेत ख मुं नां तं , बोलिजेना पु४ , बोलिजत गो·२.

१०२. १ स्वयें गो ; २ परि ज्ञानें नां ; ३ काळाहुनी पु४ ; ४ पूजनें पु४ ; ५ विशेष पु·४ नां तं , दिसताहे नि.

१०३. १ इच्छा नि , इत्सा पु४ मुं ; २ पूजोनि पु४ , असेल औं पु ; ३ आर्त औं पु ; ४ आसे पु४ ; ५ जिये नि ख औं , तुझीये पु४ , जया रा गो२ ; ६ अवश्य नि ख मुं औं तं.

१०४. १ हस्तें नि रा ; २ बैसिजो गो२ ; ३ सुचीतें धु रा पु·४ , सुनिश्चितें ख, चित्तें मुं ; ४–५ इप्सित मातें औं ; ५ इछा ते मुं नां रा , इच्छेतें नि , इछीत गो२ , इछी तें तं ; ६ निरोपिजे धु तं.

१०५. १ रुसी° पु४ , रुषी° ख नां धु , भगवंता नि ; २ तें पु४ मुं गो२ ; ३ मी नि ; ४ वंदीन नि गो, वंदिजेल मुं ; ५ सामर्थ्यें सत्रा नि, सामर्थ्यें सता पु४ , सामर्थसत्ता रा गो·२.

१०६. १ आलों असें नि ख मुं तं ; २ देवोनी पु४ ; ३ सुशब्द मुं रा ; ४ देखत पु४ ; ५ ऐकेन नां.

तरीच स्पर्शेन[1] हें[2] आसन । आदरें[3] करीन[4] पूजाग्रहण ।
नेदितां[5] जाईन[6] परतोन[7] । उभ्याउभ्यां[8] ये काळीं ॥ १०७ ॥
सदस्य ह्मणती राजपरमेशा[1] । ज्ञानीं[2] प्रमाण नव्हे[3] वयसा ।
द्वितीयेचा शशी[4] जैसा । वंद्य होय सकळांतें[5] ॥ १०८ ॥
प्रत्यक्ष कासीविश्वेश्वर । स्वल्पाकृति मान्य थोर ।
विशाळ तिळभांडेश्वर[1] । कोणें[2] प्रथम[3] वंदिजे ॥ १०९ ॥
वडिल धारा[1] नव्हे[2] दीप । धाकुटें पूज्य[3] तुळसीरोप ।
तैसें श्रेष्ठत्वाचें रूप । ज्ञान विशेष जे[4] ठाईं[5] ॥ ११० ॥
यालागीं उभा[1] तिष्ठत[2] मुनि । तो बैसवावा स्वस्थासनीं[3] ।
हा तुष्टल्या ततक्षणीं[4] । तक्षक पडे[5] हुताशीं ॥ १११ ॥
ऐकोनि राजा बोले वचनीं । तक्षक न[1] पडे हुताशनीं ।
तवंवरी माझे अंतःकरणीं[2] । हर्षोत्साह[3] असेना ॥ ११२ ॥
वैरी पडतांचि होमानळीं[1] । सहस्रभुजा करूनि सरळी[2] ।
आस्तीकमाथां[3] पुष्पांजुळी[4] । कनकरत्नीं वोपणें[5] ॥ ११३ ॥

---

**१०७.** १ **स्पर्श करीन** औं ; २ ( – ) नि खवर्ग ( नां प्रसंप्रा ) ; ३ **नेमें** ख ; ४ **घेईन** ख गो ; ५–७ **नेदी ह्मणसी तरी जाईन** औं पु ; ८ **उभ्याउभीं** ख पु४ नां औं , **उभाउभी** पु धु.

१०८. १ **राजा परमेशा** नि , °**परेशा** ख मुं नां गो·२ , **राजरमेशा** औं धु ; २ **ज्ञानिया** नि , **ज्ञांन** पु४ ; ३ **होये** पु४ , **नोहे** गो·२ ; ४ **शशांक** नि ख पु४ , **शशीधर** नां पु रा धु गो२ तं ; ५ **विश्वातें** गो , **सर्वांतें** गो२.

**१०९.** १ **पिंडभांडेश्वर** औं , **तीरभांडेश्वर** पु ; २ **कोण** नि पु·४ मुं गो·२ ; ३ **प्रभातें** औं , **प्रथमें** ख.

११०. १ **धाकुटा** औं पु , **धरा** गो·२ ; २ **नोहे** धु तं ; ३ **नव्हे** ख ; ४ **ते** नि पु४ ; ४–५ **ह्मणोनि** धु.

१११. १–२ **तिष्ठतु उभा** धु ; २ **तिष्ठे** नि औं पु ; ३ **सभास्थानीं** ख , **स्वस्थानीं** नि खवर्ग धु ; ४ **तत्क्षणीं** नि पु·४ औं ; ५ **पडेल** ख मुं नां तं.

११२. १ ( – ) नि ख पु·४ औं ; २ **अंतःकर्णीं** ख मुं नां तं ; ३ **हर्ष-उत्साव** धु तं. ही ओवी गो·२ मध्यें नाहीं.

११३. १ **मोहानळीं** ख , **भूमंडळीं** मुं ; २ **सकळीं** मुं ; ३ °**माथा** नि ; ४ **पुष्पांजळी** नि पु·४ तं ; ५ **वोपीन** नि नां गो.

याही वेगळी जे जे[1] आज्ञा । तुह्मी कराल ऋषिसर्वज्ञा ।
ते[2] विहित ऐसें[3] मानुनी[4] संज्ञा[5] । अवश्य करणें[6] म्यां येथें ॥११४॥
ऋत्विज[1] ह्मणती नरेंद्रोत्तमा[2] । तुझें वाक्य[3] अनुलंघ्य[4] आह्मां ।
सांडूनियां स्वकीय धामा । पळायमान[5] तव शत्रु ॥ ११५ ॥
प्रगट सांगिजे पावकें । आणि सर्वज्ञ पौराणिकें ।
त्रिकाळज्ञ[1] आपुल्या मुखें । दूरिदृष्टी[2] बोलती ॥ ११६ ॥
सर्पसत्रापासूनि मृत्यु । जाणोनि[1] तक्षक[2] भयपीडितु[3] ।
इंद्रलोका जाऊनि त्वरितु । शरण गेला शक्रातें ॥ ११७ ॥
प्रार्थूनियां सहस्रनेत्र । शरीरिं[1] जाला उत्तरीवस्त्र[2] ।
ऐसें सिद्धपुरुषांचें वक्त्र[3] । वृत्तांत वदे ये काळीं ॥ ११८ ॥
इंद्रें अभय दिधलें हातें[1] । पावक स्पर्शों नेदी तूतें ।
ऐकोनि राजा क्षोभला चित्तें[2] । निग्रहवचनें[3] बोलतु[4] ॥ ११९ ॥
माझा परम दंदी[1] भृष्टी[2] । शक्रें दुष्ट[3] घातला पाठीं ।
तरी इंद्रेंसहित[4] हव्यवाटीं । तक्षक[5] सीघ्र[6] पाडावा[7] ॥ १२० ॥

---

११४. १ (–) नि खवर्ग ; २ **तेही** नि ख औं पु , **तें** पु४ मुं ; ३–४ **मानी ऐशी** नि ख , **मानी** पु४ , **मानीन** पु नां , **मानुनी** धु गो२ ; ५ **स्वज्ञा** गो॰२ , **सर्वज्ञा** तं ; ६ (–) पु४.

११५. १ **रुत्विज** ख पु४ रा धु ; २ **नरोत्तमा** नि खवर्ग ; ३ **वचन** ख ; ४ **अनुलंघ्य** नि ; ५ **पलायमान** नि खवर्ग तं.

११६. १ **त्रिकाळ** मुं , **त्रिकाळीं** पु , **त्रिकाळज्ञानी** औं धु गो ; २ **दूरदृष्टें** नि , **दूरीदुरीष्टें** धु.

११७. १–२ **तक्षक भयें** नि खवर्ग ( **प्रत्यक्ष भव-** पु४ ), **तक्षक जाणे** गो२ ; ३ **भयभीतु** ख.

११८. १ **कंठीं** नि खवर्ग ; २ **उत्तरीयवस्त्र** नि गो तं ; ३ **वग्त्र** पु४ धु.

११९. १ **होतें** नि ; २ **चीतें** पु४ धु गो॰२ ; ३ **°वचन** मुं नां औं पु धु गो , **निग्रहेंकरोनि** नि ; ४ **बोलत** नि ख पु ४ गो॰२ , **आनुवादे** नां.

१२०. १ **द्वंदी** नि तं , **द्वंद्वि** गो ; २ **सृष्टी** नि नां तं ; ३ **दुष्टें** नि ख मुं तं गो॰२ , ४ **इंद्रासहित** नि औं ; ५ **तक्षकें** ख ; ६ **शीघ्र** नि औं पु तं ; ७ **पडावा** नां.

निकें ह्मणोनि रुत्विजगणीं[1] । मंत्रप्रयोग[2] केला[3] वचनीं ।
तवं इंद्रासन डळमळोनि । अधोपंथें उतरलें[4] ॥ १२१ ॥
निर्जरेंसीं[1] निर्जरनाथ[2] । अप्सरागणीं[3] परिवारित[4] ।
विमानयानीं सुशोभित । देदीप्यमान[5] तेजस्वी ॥ १२२ ॥
गंधर्व गायनीं[1] रंजवीत । जीमूत[2] जवळीं[3] मूर्तिमंत ।
गगनभेरी[4] घंटासहित[5] । निनाद[6] कानीं परिसिले[7] ॥ १२३ ॥
दीक्षित सदस्य याजकजनीं । अवलोकितां उर्ध्व वदनीं[1] ।
तक्षकमाळी[2] वज्रपाणी । अंतरीक्षीं[3] लक्षिला ॥ १२४ ॥
सहइंद्राय[1] तक्षक[2] इति । स्वाहाशब्दें[3] सीघ्रगतीं[4] ।
दोघे[5] होमा पूर्णाहुतीं । राजा प्रेरी[6] याजकां[7] ॥ १२५ ॥
ऋत्विज ह्मणती गुणैकनिधी । हें कर्म[1] सांग पातलें[2] सिद्धी ।
आस्तीक गौरवुनी आधीं । पूर्णकाम करावा ॥ १२६ ॥
हर्षें[1] बोले राजेश्वर । ब्राह्मणा[2] श्रेष्ठ[3] मार्गें[4] वर ।
याचक ह्मणती राजया थोर । कौतुक पुढती[5] वर्तलें ॥ १२७ ॥

---

१२१. १ ऋत्विज° नि मुं पु गो तं ; २ मंत्रवीयोग पु४ ; २–३ मंत्रप्रयोगिला औं ; ४ उतरिलें नि , उतरला पु४ , उतरे गो२.

१२२. १ गजरेंशीं नि खवर्ग (पु४ प्रसंप्रा); २ अप्सरानाथ ख ; ३ निर्जरेंसी ख ; ४ परिवेष्टित औं ; ५ दैदीप्य° नि ख मुं रा गो , दयदीप्य° धु गो२.

१२३. १ गाणीं ख पु , गानीं तं , गगनीं गो२ ; २ जीमूति नि खवर्ग ; ३ जवळी नि, जवळा ख पु·४ नां औं , जवळ तं ; ४ गगनभरि पु४ , गगनगर्भि नां ; ५ घंटाभरित नां ; ६ नाद नि ख पु४, विनोद औं पु ; ७ परिसिला नि , स्पर्शिले पु , स्पर्शिला औं.

१२४. १ गगनीं खवर्ग ; २ °माळ ख , °मातुळ औं पु ; ३ अंतरिक्ष खवर्ग रा गो·२.

१२५. १ इंद्रसह मुं ; २ तक्षका नि ; ३–४ स्वाहाशब्देंशीं गर्जती नि ; ५ या दोहीं धु ; ६ बोले धु ; ७ याजका नि पु४ तं.

१२६. १ कार्य ख ; २ पावलें नि नां औं पु.

१२७. १ हरुषें नि ; २–३ ब्राह्मणश्रेष्ठा नि ख मुं ; ३–४ मार्गें श्रेष्ठ गो२ ; ५ पुढें मुं नां औं पु गो२ , पुढती पु४ तं.

कुंडाग्नि[1] प्रबळ[2] देखोनि दृष्टी[3] । इंद्रें धाक घेतला पोटीं ।
तक्षक सांडूनि[4] उठाउठीं । उर्ध्वपंथें[5] पळाला ॥ १२८ ॥
गगनचुंबित जिह्वाज्वाळा । पसरूनि[1] धांवतां[2] होमानळा ।
नागोत्तरीचा[3] गुंडाळा[4] । दुरी केला देवेंद्रें ॥ १२९ ॥
वेढा उकलूनियां[1] हातें । तक्षका[2] झुगारिलें[3] परतें[4] ।
सुसाट करीत शून्यपंथें[5] । नक्षत्रप्राय खचताहे[6] ॥ १३० ॥
दक्षिणोत्तर[1] व्यापूनि दोन्ही । विशाळ[2] पसरला[3] दिसे[4] गगनीं ।
घर्घराटें गर्जत[5] ध्वनी[6] । अधोपंथें येतसे[7] ॥ १३१ ॥
विषोदकाच्या मेघधारा । पडती[1] वन्हिस्फुल्लिंगगारा[2] ।
उर्ध्वपुछ[3] अधोसीरा[4] । करूनि आला पतनार्थ ॥ १३२ ॥
ऐकोनि अवघीं पिटिली टाळी । रावो वोसंडे स्वानंदजळीं ।
सौति ह्मणे तेचि काळीं । आणीक येक वर्तलें ॥ १३३ ॥
न देखत[1] सकळिकांतें । आस्तीकें पाहोनियां वरुतें[2] ।
तपोबळें स्वसामर्थ्यें । अधोपंथें[3] रोधिला[4] ॥ १३४ ॥

---

१२८. १–२ कुंडाग्नीबळ नि ख मुं नां ; २ बळें पु४ , प्रळय गो॰२ , (–) औं पु; ३ दृष्टीं नि तं; ४ सोडूनि धु; ५ धाकें उर्ध्व नि, उर्ध्व धाकें ख पु४ मुं नां.

१२९. १ पासरूं नि , २ धांवती ख गो ; ३ नागोत्तरीयाचा नि तं ; ४ काढोनि व्याळ औं.

१३०. १ काढोनियां ख ; २ तक्षक नि खवर्ग ( पु प्रसंप्रा ), ३ झुगारिला नि पु४ मुं नां औं ; ४ परौतें नि पु४ , परुतें नां गो॰२ ; ५ गगनपंथें ख मुं गो ; ६ खचतसे औं पु.

१३१. १ दक्षणोत्तर ख पु॰४ गो२ ; २ विषाळ मुं नां औं रा धु गो ; ३–४ पसरलासे नि , पसरला ख मुं गो॰२ तं ; ५ गर्जे नि , घर्घर पु४ ; ६ धरणी गो॰२ ; ७ उतरला ख.

१३२. १ वरी पडती धु तं , (–) ख ; २ °स्फुल्लिंगीं गारा नि ; ३ उर्ध्वपुच्छ नि , उर्ध्वपंथें पु४ , उर्ध्व पुत्छें औं पु ; ४ अर्धशरीरा ख औं पु , अधःशिरा नि , आधोशरिरा पु४.

१३४. १ देखतां नि औं पु ; २ वरतें नि पु धु ; ३ अर्धपंथीं नि ; ४ रोधिलें पु४ गो२.

उर्ध्वें उचलोनियां पाणी । तिष्ठ तिष्ठ[1] इहीं वचनीं ।
अढळ करूनि खिळिला गगनीं । औत्तानपादासारिखा ॥ १३५ ॥
येरीकडे याजकमेळीं[1] । जयजयकार केला सकळीं ।
तक्षक पातला हो[2] जवळीं[3] । ह्मणोनि हर्षे गर्जती ॥ १३६ ॥
तेवींचि[1] ह्मणती भूवल्लभा । तपस्वी तिष्ठत[2] असे[3] उभा ।
तो बैसवूनि इछित[4] लाभा[5] । लाभे ऐसें करावें ॥ १३७ ॥
तक्षक आकर्षूनि आह्मी । पाडित[1] असों[2] इये होमीं ।
आस्तीकशांतवनेचें[3] तुह्मी । दुसरें कार्य[4] संपादा ॥ १३८ ॥
संतोषोनि धरारमण । ह्मणे ब्राह्मणा[1] बोलें वचन ।
मागसी[2] तें देईन दान । सत्य जाण[3] त्रिवाचा ॥ १३९ ॥
ऐकोनि बोले भुजंगीसुतु । देईन ह्मणसी कल्पितार्थु[1] ।
तरी हा पुरे[2] करावा[3] ऋतु । उरग आतां[4] न पडावे[5] ॥ १४० ॥
तक्षक अथवा[1] हो[2] आणिक । होमीं न जळो[3] दंदशूक[4] ।
माझें मागणें हेंचि येक । कर जोडूनि समस्तां[5] ॥ १४१ ॥
वचन नव्हे[1] शस्त्रधार । श्रवणें खोंचला राजेश्वर ।
ह्मणे ब्राह्मणा नमस्कार । सहस्त्रवरी[2] तव पायां ॥ १४२ ॥

---

१३५. १ तिष्ठति पु४.

१३६. १ याजकमंडळीं नां ; २ असे गो; ३ जवळी नि.

१३७. १ ते वेळीं नि , तव ऋत्विज मुं ; २-३ तिष्ठतसे नि ख पु४ नां , तिष्ठतु औं पु ; ४ इच्छित नि ; ५ सभा ख मुं नां.

१३८. १-२ पाडितसों खवर्ग , पाडितों धु ; ३ °शांतवनाचें नि , °शांतवोनि गो , °संतोषाचें औं ; ४ कृत्य नां.

१३९. १ ब्रह्मरूपा नि , ब्राह्मणरूपा ख ; २ मागसील नां ; ३ सत्य ख नां. ही ओवी रा मध्यें नाहीं.

१४०. १ संकल्पिला अर्थु नि , कल्पिला अर्थु औं पु गो·२ ; २-३ समाप्त करीं नि ; ४ जातां पु४ , गातां धु ; ५ पाडावे नि मुं धु.

१४१. १ आतां पु४, (-) मुं ; १-२ हो अथवा ख औं पु गो·२ ; ३ जाळीं नि , जाळावे ख , जळावे रा , जळतु पु·४ नां औं ; ४ द्वंदशूक पु·४ मुं नां धु तं गो , द्वंद्वशूक औं , हे दंशक रा ; ५ नेमस्त गो·२.

१४२. १ न हे रा धु ; २ सहस्त्रवार नि ख.

सुवर्ण पृथ्वी धेनु[1] रत्नें । अपार याचीं मोकळ्या मनें ।
माझा अध्वर खंडे[2] जेणें । ऐसिया भिडा[3] न[4] कोंडीं[5] ॥ १४३ ॥
यज्ञस्वरूपा[1] मत्शरीरा[2] । मध्यें न तोडीं[3] करुणाकरा ।
आणीक येक[4] मागें वरा । असाध्य तेंही[5] देईन ॥ १४४ ॥
आस्तीक ह्मणे गा सत्यशीळा । दोनी जिह्वा येकाचि[1] व्याळा[2] ।
पवित्र रसना हे विटाळा । असत्याचिया नातळो[3] ॥ १४५ ॥
मागणें[1] हें[2] येकचि[3] साचें । आणीक[4] मागतां[5] व्यभिचार[6] वाचे ।
पूर्वज[7] पडती[8] रौरवखांचे[9] । विकळ[10] होतां वाङ्नियमु ॥ १४६ ॥
कुंजरदशन वाढले[1] पुढें । ते लोटितां[2] नव्हती मागिलेकडे[3] ।
सज्जनवचन तेणें[4] पाडें । पालटों नेणें कल्पांतीं ॥ १४७ ॥
सत्य रक्षावया[1] पवित्र नरीं[2] । शरीरें विकिलीं[3] डोंबाघरीं ।
याचिलागीं अरण्यचारी[4] । पांडव आणि रघुनाथ ॥ १४८ ॥

---

१४३. १ **धनें** ख, **धन** तं ; २ **खंडणें** धु ; ३ **भिडे** नि ख औं [**भिडां**] ; ४–५ **नको जी** धु ; ५ **कीजे** ख.

१४४. १ **यज्ञस्वरूप** धु ; २ **मच्छरीरा** नि, **माहाशरीरा** ख ; ३ **सोडीं** नि, **खंडीं** औं ; ४ **कांहीं** नि, (–) गो॰२ ; ५ **तो मी** नि, **तें मी** खवर्ग ( औं प्रसंप्रा ), **तें** गो॰२.

१४५. १ **एक** नि मुं नां, **येका** ख ; २ **वेळा** गो॰२ ; ३ **नातळे** नि औं पु, **नाताळें** रा तं, **नातळीं** धु, **नाडळों** ख पु४, **नाढळों** मुं.

१४६. १ **मागतों** ख ; २ (–) नां ; ३ **यकचि** नां औं, **केवी** ख ; ४ **आणि** नि मुं औं पु ; ५ **मागणें** ख ; ६ **विभिचार** नां धु ; ७ **पूर्वजां** नि, **पौरज** पु४ ; ८ **पतन कुंडीं** नि, **पतनीं** धु ; ९ **रौरवाचें** नि पु४ नां औं धु, **रवरवाचे** गो॰२ ; १० **विफळ** नि मुं नां औं.

१४७. १ **वाढतां** नि खवर्ग ; २ **लोटतां** नि, **लोटिल्या** पु४ ३ **मागिलीकडे** मुं नां औं पु तं ; ४ **तेणेंचि** धु.

१४८. १ **रक्षाव्या** औं गो॰२ ; २ **नारी** औं गो२ तं ; ३ **विकिलें** ख औं, **विकिली** तं ; ४ **अरण्यांतरीं** गो॰२.

येकीं[1] भोजना दिधलीं[2] बाळें[3] । येकीं मांसें[4] तुकिलीं[5] तुळे[6] ।
येकीं[7] त्वचेचिये[8] खोळे[9] । काढूनि दिधलें[10] स्वहस्तकीं[11] ॥१४९॥
येकीं[1] द्विभागिलें[2] कर्वतीं । येकीं जितचि दिधल्या अस्ती ।
तूंही[3] तयांचिये पंक्तीं । सत्यशीळ[4] धर्मात्मा ॥ १५० ॥
त्याहूनि कठिण हें मागणें । ऐसें कल्पिजे[1] तुझिया[2] मनें ।
तरी प्रशस्त अंतःकरणें । सार्थक करीं मम यात्रा ॥ १५१ ॥
पन्नग माझें मातुळकुळ । यालागीं[1] होईं अतिदयाळ ।
तिळतुल्य दोषासाठीं[2] शैल । प्रायश्चित्ताचा भोगिला ॥ १५२ ॥
माझें आसीर्वचन घेईं । आपुला आसीर्वाद[1] देईं ।
शेषकुळेंसी[2] अक्षइ होईं । वासुकीतें वद[3] ऐसें[4] ॥ १५३ ॥
बोलिला बोल[1] यथार्थ करी । त्याचें[2] द्वार राखे हरी ।
क्लीब पुरुष वंध्या नारी । तैसीं इतर साधनें ॥ १५४ ॥
ऐकोनि आस्तीकाचीं वचनें । राजा असंतुष्ट[1] मनें ।
वारंवार तेंचि[2] ह्मणे । आणीक माग[3] मज कांहीं[4] ॥ १५५ ॥

---

१४९. १ येकें गो॰२ ; २ देउनी धु , दिधला नि ; ३ बाळ नि ; ४ निज मांस औं , मांस पु गो ; ५ तुकविली नि , तुकिलें औं पु गो॰२ ; ६ तुळ नि ; तुळें नां औं पु रा धु ; ७–९ सांदुसें मासा गोळे गो२ ; ८ त्वचेची नि ; ९ तोळे पु४ , खोळ नि ; १० दिधली नि खवर्ग ( औं पु प्रसप्रा ) ; ११ स्वहस्तें पु४ नां औं पु गो , स्वहस्तीं मुं रा गो२ तं.

१५०. १ येक रा धु तं , (+) आपणा नि ; २ द्विभाग जाले धु तं ; ३ तुह्मी नां गो॰२ ; ४ सत्वशीळ नि पु.

१५१. १ कल्पिजेल नां मुं पु , कल्पिलें नि पु४ ; २ तुझे नि , तुझेनि धु.

१५२. १ त्यांलागीं नि रा गो॰२ तं ; २ दोषापाठीं खवर्ग.

१५३. १ अभ्वासन गो , अभयंकर औं , (+) तयां नि , (+) मज पु ; २ °कुळांसी नि ; ३ ह्मणे पु४ , वदावें औं , वदे धु तं ; ४ (–) औं.

१५४. १ बोलचि पु॰४ ; २ त्याचेंचि रा तं.

१५५. १ अतिसंतुष्ट पु , संतुष्ट औं ; २ तेंचि तें ख गो२ तं , ऋषीतें औं , चित्तें पु रा ; ३ मागें नि ख औं पु गो२ ; ४ पासीं पु४.

अपूर्ण[1] न[2] करीं माझा मख । ह्मणोनि प्रार्थी नरनायक ।
आग्रहें[3] वारिला[4] ऋषि आस्तीक । बद्धांजुळी[5] तिष्ठतसे ॥ १५६ ॥
मागणें हें[1] येकचि जाण । विरमत्वेतत्तवैव[2] यज्ञ ।
यावेगळी इछा[3] आन । तुजपासूनि[4] असेना ॥ १५७ ॥
भूभुज भ्रूलतासंकेतें[1] । प्रेरणा करी मांत्रिकांतें ।
तक्षक भक्ष पावकातें । होय तें करा अतिसीघ्र[2] ॥ १५८ ॥
तिहीं[1] वोढितां मंत्रशक्ती । लोहकंटक[2] गगनभित्तीं ।
रोंविला[3] असे[4] सामर्थ्य हस्तीं । कोण्हातेंही उपडेना[5] ॥ १५९ ॥
कीं विराटतरूची प्रचंड शाखा । फणींद्र[1] केला[2] ऋषीनें[3] देखा ।
झोंबोनि[4] मोडितां[5] याज्ञिकां । सढील जाली[6] बळवस्त्रें[7] ॥१६०॥
ताजिवां[1] तुकितां दोन्ही बळें । आस्तीकतेज दिसे आगळें ।
ब्राह्मणीं जाणोनि वर्म[2] कळे । मग नृपातें बोधिती[3] ॥ १६१ ॥
ह्मणती राजया[1] आग्रह न कीजे । आस्तीकवचना मान[2] दीजे ।
आमुचेही[3] प्रार्थने[4] भजें[5] । कुळदेवता[6] मानूनी[7] ॥ १६२ ॥

---

१५६. १–२ पूर्ण नि खवर्ग; ३ अग्रहें ख नां औं गो·२ तं, रागें पु४; ४ वरिला पु४ गो.२ ; ५ बद्धांजळी नि.

१५७. १ ( – ) मुं नां; २ विराम पावो मत्प्रीत्यर्थ नि, इछा पुरवीं सांग ख, विरमेत तु तवैव पु·४ नां, विरम पावे तवैव धु, विरमेत तव औं, समाप्त करावा तव गो२ ; ३ इच्छा नि ; ४ तुजपासाव ख मुं गो.

१५८. १ भूल्लता पु४, भृल्लता नां औं पु रा धु गो, भूर्लता ख गो२ ; २ °शीघ्र नि.

१५९. १ याज्ञिकीं औं, जिव्हीं धु तं ; २ लोककंटक धु ; ३–४ रोंविलासे नि ख पु४ मुं ; ५ वोढेना औं.

१६०. १–३ ऋषीनें फणींद्र केला औं ; ४ बळें औं ; ५ पाडितां औं पु, मांता पु४ ; ६ झाली नि ; ७ बळशास्त्रें पु·४, तपवस्त्रें गो२, मंत्रशक्ती नि, बळशक्ती औ.

१६१. १ ताजवा नि पु·४ औं मुं, तेज गो·२ ; २ कर्म पु ; ३ बोलती मुं·

१६२. १ राया नि खवर्ग ; २ मानु औं पु तं ; ३–४ आमुचीही प्रार्थना औं पु ; ५ भजे नि ; ६ कुळदैवत नां पु धु ; ७ जाणुनी मुं, ह्मणौनी औं पु.

काय यशाच्या[1] बांधणें[2] मोटा । विश्वीं जाली[3] ख्यातिप्रतिष्ठा[4] ।
सिक्षा[5] केली[6] परमदुष्टां । असंख्यात सर्पांतें[7] ॥ १६३ ॥
मूर्ख पाषांडी[1] विवादी । अहंकारी अविचार[2] क्रोधी ।
अत्यंत आग्रही[3] मोक्षपदीं । अर्व्हे[4] नर्व्हे[5] शास्त्रार्थें[6] ॥ १६४ ॥
प्रतापें जाळिले अपार[1] फणी । मानु[2] दिधला आस्तीकवचनीं ।
दोन्ही[3] कीर्ती उभयकर्णीं[4] । कुंडलें[5] होती[6] जगाचे[7] ॥ १६५ ॥
प्रसन्न करूनि हृदयारविंद[1] । त्यजूनि अपूर्णतेचा खेद ।
आस्तीकातें देई शब्द । वरप्रदान[2] ये काळीं ॥ १६६ ॥
ऐसें बोलतां[1] तपोधनि । गुरुउपदेश[2] मानुनी मनीं ।
राजा बोलिला ह्मणे[3] वचनीं । हो तथैव भवदाज्ञा ॥ १६७ ॥
घेईं ब्राह्मणा दिधला[1] वर । ऐसें बोलतां राजेश्वर ।
आस्तीकें केला जयजयकार । आणि सदस्य[2] याजकीं ॥ १६८ ॥
वर वोपितां राजोत्तम[1] । ब्राह्मण जाला पूर्णकाम ।
ऋत्विजीं मानूनि[2] यज्ञोपरम[3] । श्रुवापात्रें[4] ठेविलीं ॥ १६९ ॥

---

१६३. १–२ बांधणें यशाच्या औं पु ; ३–४ ख्याति जाली प्रविष्ठा औं ; ४ ख्यात° नि ; ५ शिक्षा नि औं रा तं ; ६ केलिया पु ; ७ सर्वांतें पु४.

१६४. १ पाखांडी नि ; २ अविचारी नि ; ३ अक्षई पु४ ; ४ अहं नि , ५ नवहेत नि , नव्हती मुं औं ; ६ शास्त्रार्थ नि पु४ , शास्त्रार्थी गो·२.

१६५. १ प्रतापी गो·२ ; २ आणि मान धु तं ; ३ उभय औं ; ४ कुंडलें कर्णीं औं ; ५ भूषणा औं ; ६ होतील नि धु तं ; ७ त्रिजगाच्या औं , जगातें गो·२ , जगाचा ( चां ) तं.

१६६. १ दयाळवृंद मुं ; २ वरप्रधान गो.

१६७. १ बोधितां गो२ ; २ गुरूपदेश नि पु४ मुं नां ; ३ भद्र नि , प्रति औं.

१६८. १ माजा गो ; २ समस्त नां , सदय ख.

१६९. १ राजेश्वर उत्तम पु , राजेश्वरोत्तम धु ; २ पावोनि पु४ ; ३ यज्ञ परम खवर्ग गो·२ तं ; ४ स्रुवा° नि तं मुं , श्रुवा पु·४ नां रा धु गो , स्वाहापात्रें गो२.

इति श्री आदिपर्व भारते । पुढें[1] मोलें घ्यावया कथे ।
विश्वासें[2] चित्त[3] ठेविजे येथें । आर्तवंतीं[4] निजलाभा[5] ॥ १७० ॥

श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर । विनवी कवि[1] मुक्तेश्वर ।
ग्रंथ चाले तो बडिवार । संतमहंतकृपेचा[2] ॥ १७१ ॥

इति श्रीभारते आदिपर्वणि एकादशोऽध्यायः ॥

---

१७०. १ **पुढां** धु गो ; २ **विस्तारें** नां गो·२ , **विस्तरें** रा , **विसारें** पु , **इसारें** ख , **विचारें** औं ; ३ **चीत** पु४ धु ; ४ **अर्थ येती** औं पु ; ५ **निजलाभ** पु४ मुं धु गो२ तं.

१७१. १ **कविवर** पु४ नां रा गो२ , **कविकिंकर** औं पु ; २ **संतमहंत-कथेचा** पु.

॥ श्री ॥

# अध्याय बारावा

## श्रीगणेशाय नमः

शौनकादि ऋषेश्वरश्रोत्री[१] । प्रश्न[२] करिती[३] पवित्रवक्त्रीं[४] ।
पन्नग भस्मले[५] सर्पसत्रीं । कोण किती तें सांग[६] ॥ १ ॥
सौति ह्मणे ऐका[१] बोलें[२] । वक्तृत्व[३] वाढ[४] जरी[५] केलें ।
तऱ्हीं[६] दग्धसर्प[७] सांगीतले । माझेनीही न वचती ॥ २ ॥
तथापि कांहीं येक हो जी । सांगेन[१] तें[२] ऐका सहजीं[३] ।
वासुगीच्या कुळामाजी । इतुके अही भस्मले[४] ॥ ३ ॥
श्वेत[१] पीत रक्त कृष्ण । महाकाय विषोल्बण ।
पंचसप्तशतानन[२] । शैलतुल्य[३] शरीरी[४] ॥ ४ ॥
कोटिस[१] मानस[२] पूर्ण[३] देख[४] । मंद[५] पाळ हलीयेक[६] ।
कोणवेग[७] पिलिछक[८] । कोण[९] सकळविषधर[१०] ॥ ५ ॥

---

१. १ **ऋषीश्वरश्रोतीं** नि, **ऋषिश्रोत्री** धु, **ऋषिश्रोतीं** औं, **°श्रोतीं** पु; २ **प्रसन्न** नां; ३ **करितां** नि औं पु, **कला** गो·२; ४ **°वग्त्रीं** ख पु४ धु गो२; ५ **भस्म जाले** धु तं; ६ (+) **पां** नि.

२. १ **ऐक** नि ख पु४ नां गो·२; २ **बोले** नि, **वहिलें** औं; ३ **वग्त्रुत्व** पु४ नां धु; ४–५ **जरी वाढ** नि, **जरी बाड** ख पु·४ मुं औं पु; ६ (–) नि खवर्ग, **तरी** गो·२; ६–७ **दग्धसर्प तऱ्ही** तं.

३. १ **सांगे** नां; २ **ते** नि ख, (–) धु तं; ३ **सहजी** नि; ४ **भस्म जाले** धु तं.

४. १ **स्वेत** ख नां गो·२ पु; २ **पंचाशतशतानन** औं; ३ **शैल्यतुल्य** ख पु४ नां धु गो·२ तं; ४ **शरीरीं** मुं नां औं पु धु गो.

५. १ **कोटिशः** नि, **कोटी** स खवर्ग, **कोटिक** रा धु तं (संस्कृत **कोटिश,** नि संस्करण असावें); २ **मान** गो२; २–३ **मान संपूर्ण** स ख मुं रा धु गो पु (संस्कृत प्रसंप्रा); ४ **जे कां** औं; ५ **शल** नि (संस्कृत); ६ **व्याळ देखा** औं, **हळीमक** नि (संस्कृत); ७ **कालवेग** नि (संस्कृत); ८ **पिच्छलक** नि (संस्कृत **पिच्छल**); ९ **कौणप** नि (संस्कृत), **सकळ** औं, **कारण** पु; १० **सकाळ°** ख नां रा धु, **°धरें** पु४, **जे कां विषधर** औं, **सकळां°** पु मुं.

प्रकाळण[1] हिरण्यबाहु[2] शणक[3] । तक्षक[4] फणी काळदंडक[5] ।
वासुकिवीर्यज[6] मुख्य मुख्य । प्रविष्ट जाले हुताशीं ॥ ६ ॥
यांचे[1] पुत्रपौत्रसंख्या । पद्मार्बुदीं[2] नव्हे लेखा ।
जे कां पावकाचिया[3] मुखा । ग्रास[4] जाले ते सत्रीं ॥ ७ ॥
पिछंडळ[1] मंडळक[2] । पिंडभोक्ता[3] रभोणक[4] ।
उत्सेष[5] शरभ[6] व्यंगांगक[7] । स्वर्णदंड[8] महासर्प ॥ ८ ॥
विरोहण[1] शिलीश[2] शल्लकोमूख[3] । सकुमार[4] प्रवेपन[5] मुद्गरक ।
शशरोमा[6] पावकमुख[7] । सुमनवेगवाहनु[8] ॥ ९ ॥
इतुके[1] तक्षकाचे कुमर । प्रगट केले थोर थोर ।
संततीसीं[2] काळविखार[3] । भस्म जाले[4] हुताशीं ॥ १० ॥

---

६. १ **प्रकारण** पु·४ , **प्रकार** औं , **प्रकाळ** मुं नां रा , **प्रकाळत** तं ( संस्कृत ) , **काळविष** नि ; २–३ **हिरण्यबाहुक** नि , **हिरण्यबाहुशाक** मुं औं पु ; ३ ( संस्कृत **शरणः** ) ४ **कक्षक** नि ( संस्कृत ) , **दक्ष** औं , **दक्षक** पु ; ५ **काळदंतक** नि ( संस्कृत ); ६ **वासुकिवंशज** धु तं.

७. १ **त्यांचे** नि ; २ **पद्म अर्बुद** नि , **पद्मार्बुजीं** औं तं ; ३ **पावकाचेनीं** नि , **पावक** गो२ ; ४ **ग्रस्त** मुं.

८. १ **पुच्छांडक** नि ( संस्कृत ) , **पिचिंडळ** स ; २ **आणि मल्लक** औं पु , **मळक** गो·२ ; ३ **पिंडसेक्ता** नि ( संस्कृत ) , **पिंडभोरण** गो·२ ; ४ **रभेणक** नि ( संस्कृत ) , **रभोरक** स खवर्ग , **तोणक** तं ; ५ **उरुष** नि ( संस्कृत **उच्छिख** ) ; ६ **भंग** नि , **रंभ** स ; ७ **व्यगांगक** नि ख पु·४ गो२ (हें नांव संस्कृत भारतांत नाहीं); ८ **स्वर्णवर्ण** नि खवर्ग.

९. १ **वितेहण** धु तं ( संस्कृत प्रसंप्रा ) ; २ **शिली** नि ( संस्कृत ) , **शिल्पि** औं पु ; ३ **शलकर मूक** नि ( संस्कृत ) , **शलकोमुख** मुं औं पु तं ; ४ **सुकुमार** नि ( संस्कृत ) ; ५ **प्रवेशन** ख पु४ ; ६ **शिशुरोमा** नि ( संस्कृत ) ( स प्रसंप्रा ) ; ७ **व्यापकमुख** ख ; ८ **सुमनवेग महाहनू** नि ( संस्कृत ).

१०. १ **इतके** नि ; २–३ **संततीसहित सकळ विखार** औं , **संततीस नाहीं विखार** पु ; ३ **काळनामा विखार** नि ख पु४ मुं नां ; ४ **जाला** नि खवर्ग ( औं पु प्रसंप्रा ).

परील[१] कुंडळ कुमारक । मुंड[२] वेणीस्कंद[३] बाहुक[४] ।
शृंगवेर[५] आणि[६] कर्तक[७] । शंखचूड[८] फणिराज ॥ ११ ॥
हे कौरव्यवीर्यज[१] फणी । प्रविष्ट जाले हव्यवाहनीं ।
धृतराष्ट्राचे कुमर[२] श्रवणीं । सांगेन तेही ऐकिजे[३] ॥ १२ ॥
वातवेग शंकुकर्ण[१] । पिंगळक[२] मेचक[३] कुठारवदन ।
पूर्णांगद[४] पूर्णमुख जाण । प्रहस[५] शकुनि हरिनामा[६] ॥ १३ ॥
आगावहशण[१] कुमुद । बळभैरव मंड माणद[२] ।
वेदांग[३] पिशंग[४] मणि स्कंद[५] । श्वेदपारग[६] रुषभादि[७] ॥ १४ ॥
वेगवान[१] पिंडारक महाहनू । पट[२] राक्षस वराहक[३] वरुणु ।
पराशर[४] तरुणक[५] अरुणु । सर्वसारंग रक्तांग ॥ १५ ॥
आणीक नामाथिले बहुत । पुत्रपौत्रीं[१] नामांकित ।
विस्तारूनि बोलतां येथ । अतिप्रसंग होतसे ॥ १६ ॥

---

११. १ **एरकं** नि ( संस्कृत ) ( स प्रसंप्रा ), **परी** नां गो ; २ **वेणी** नि ( संस्कृत ) ( स प्रसंप्रा ); ३ ( संस्कृत **वेणीस्कन्ध** ); ४ **सिंहक** औं , **शाहक** नां पु ( संस्कृत प्रसंप्रा ); ५ **शृंगवेण** पु·४ मुं , **शृंगवेणी** स ख औं ; ६ **अणी** नि ; ७ **धूर्तक** नि ( संस्कृत ) ( स प्रसंप्रा ); ८ **सेवकचेंडू** औं पु.

१२. १ **कौरव°** नि ख मुं औं पु धु तं , **कौरववीर्य** पु४ ; २ **कुमार** नि ; ३ **ऐकिजो** तं.

१३. १ **संकर्षण** औं पु , **शंखवर्ण** मुं ; २ **पिंगळ** मुं औं गा ; ३ **वेचक** पु४, **मोचक** औं पु, **सेचक** नि ( संस्कृत ) ; ४ **पुन्नाग** औं , **पुनागीव** पु ; ५ **प्रहास** नि ( संस्कृत ), **प्रह** स खवर्ग ; ६ **दरीनामा** नि ( संस्कृत **दरिः** ) ( स प्रसंप्रा ).

१४. १ **अंगावह शरण** नि ; २ **मानद** नि ; ३ **देवांग** ख धु , **विदांग** औं पु ; ४ **पिशंक** पु·४ , **पिशाक** नि मुं नां औं ; ५ **स्कन्ध** ( संस्कृत ) ; ६ **श्वेतपारग** नि ख पु४ नां औं , **खेतपारग** गो·२ ; ७ **ऋषभादि** नि.

१५. १ **वेदवान** पु·४ औं ; २ **पद** नि मुं , **वटक** औं पु ; ३ **वराक** नि ; ४ **फराश** औं पु ; ५ **सुरंग** औं पु , **स्तरुणक** पु४ रा धु गो.

१६. १ **पुत्रपौत्रादि** औं पु.

श्रवणीं मानुनी विकृती । झणें[1] उबग[2] घेइजे[3] संतीं[4] ।
असो हे[5] दग्ध जाले[6] किती । काद्रवसंख्या[7] नेणवे[8] ॥ १७ ॥
स्थूळपणें पर्वतप्राय । विस्तीर्ण योजनें[1] द्वयत्रय[2] ।
महावीर्य महाकाय । हळाहळविषतुंड[3] ॥ १८ ॥
कामरूपी[1] कामागम[2] । ऐश्वर्यबळें[3] शक्रासम[4] ।
ऐसे असंख्य[5] जाले भस्म । सत्रीं[6] पारीक्षिताचे[7] ॥ १९ ॥
आस्तीकातें वोपितां वर । हर्षें[1] निर्भर भुजंगीकुमर[2] ।
न्यूनतेचा राजेश्वर । खेद सर्व[3] विसरला ॥ २० ॥
गोविंदशब्दें[1] गर्जोनि[2] सकळीं । हर्षें पिटिली येक[3] टाळी ।
प्रणीतापात्रें[4] भूमंडळीं[5] । न्यसूनि[6] उठिले[7] याजक ॥ २१ ॥
सदस्य ऋत्विज आणि मागते । वेदज्ञ[1] जे जे आले तेथें ।
अपार द्रव्य[2] दक्षणा[3] त्यांतें । याचक इछेनें[4] वांटिली ॥ २२ ॥

---

१७. १ **झणी** नि खवर्ग ; २ **उबगु** औं गो तं , **उभये** पु४ ; ३ **घेई** पु४ ; ४ **श्रोतीं** गो२ ; ५ (–) पु४ औं ; ६ (–) पु ; ७ **काद्रव्य**° नां पु रा ; ८ **न बोलवे** ख. पु४ मध्यें या ओवीच्या चवथ्या चरणापासून ते एकतीसाव्या ओवीपर्यंतचें पृष्ठ गहाळ.

१८. १–२ **योजनद्वय** नि पु४ नां औं , **योजनद्वयत्रय** रा गो॰२ ; २ **द्वय** ख मुं पु ; ३ °**विषोल्बण** औं , °**विषतुल्य** पु.

१९. १ **काळरूपी** औं , **कामरुपी** तं ; २ **कामगम** ख नां , **ऐश्वर्यबळपराक्रम** धु ; ३ **असें बळें** नि ; ३–४ **शक्राऐसें भूपसम** धु ; ५ **असंख्यात** नि ; ६–७ **परिक्षितीचे यज्ञीं** नां ; ७ **जन्मेजयाच्या** औं.

२०. १ **हर्ष** नि ख मुं ना गो॰२ तं ; २ **भुजंगीश्वर** ख ; ३ **सकळ** औं पु , **सर्वेही** धु तं.

२१. १ °**शब्द** ख पु , २ **बोलोनि** ख ; ३ **एकचि** नि मुं औं , **येकी** नां पु तं ; ४ **प्रणिपात** औं पु ; ४–५ **ब्राह्मणेसी येकमेळीं** गो२ ; ६ **ठेऊनि** नां मुं , **करूनि** औं ; ७ **उठले** नि , **बैसले** ख.

२२. १ **देवज्ञ** मुं , **वैद्य** औं पु ; २ (–) नि खवर्ग ; ३ **दक्षिणा** नि ; ४ **इच्छेनें** नि , **इछे** गो॰२.

लोहिताक्ष स्थपति[1] जाण । जीहीं यज्ञासि कथिलें विघ्न[2] ।
त्यांसि[3] दिधलें बहु[4] सुवर्ण । संतोषोनि नरेंद्रें ॥ २३ ॥
विधिमंत्रें[1] यथोचित । अवभृतस्नान[2] भार्येसहित ।
करूनि क्षेत्रपाळप्रीत्यर्थ । बळिदानें[3] वोपिलीं[4] ॥ २४ ॥
आसनीं बैसऊनि आस्तीक । आदरें केला कनकाभिषेक ।
येरू निरपेक्ष निष्टंक[1] । अर्थस्वार्थ असेना ॥ २५ ॥
पवित्र[1] दर्शन द्यावें पुढती[2] । ह्मणे[3] तथैव भविष्यति ।
पुढती प्रार्थना[4] करी[5] नृपती । विनंति ऐकें द्विजवर्या ॥ २६ ॥
वाजिमेध असे करणें । तेवेळीं स्वामीनीं कृपा[1] करूनि[2] येणें[3] ।
अवश्य ह्मणोनि[4] संतुष्ट मनें । आज्ञा घेवूनि निघाला ॥ २७ ॥
मुक्त करूनि तक्षकनामा । सहित[1] पातला[2] वासुकीधामा ।
तेवेळीं नागानंद व्योमा । सांटवितां[3] अपार ॥ २८ ॥
बैसऊनि सिंहासनीं । नागराज सहनागिणी[1] ।
नीरांजन[2] करूनि मूर्ध्नीं । रत्नांजुळी वोपिल्या ॥ २९ ॥
अमरीं पूजिजे इंदिरारमण । कीं[1] ऋषीं पूजिजे चतुरानन ।
कीं[2] सिद्धगणीं[3] पूजिजे प्राण । पार्वतीचा पैं जैसा ॥ ३० ॥

---

२३. १ स्तापिती गो॰२ ; २ कारण नि खवर्ग ; ३ त्यासि नि ; ४ बहुत नि. ही ओवी औं मध्यें पुढीलप्रमाणें आहे:—

लोह जरि किरिटी जाण । तेंही यज्ञीं दीधलें दान ।
कनकांबरीत गाटित जाण । संतोषोनि नरेंद्रें ॥

२४. १ °मंत्र नां पु गो॰२ तं, मंत्रविधि औं ; २ अवभृथ° नि ; ३ बळिप्रदान मुं नां, बाळिप्रदानें तं ; ४ वोपिलें मुं नां.

२५. १ निष्कलंक नि खवर्ग.

२६. १ पवित्रें नि ; २ पुडती औं पु ; ३ येरू ह्मणे नि खवर्ग ४–५ प्रार्थीत नि ख, प्रार्थी मुं नां, प्रार्थीतसे औं पु.

२७. १ दया पु ; २–३ करणें नि खवर्ग रा गो॰२ ; ४ ह्मणे नि.

२८. १ आस्तीक औं, महीं गो२ ; २ पावले नि ; ३ सांठवितां नि.

२९. १ सह कामिनी नि गो, २ निरांजनें नि ख वर्ग (पु प्रसंप्रा) रा तं.

३०. १ (–) नि खवर्ग ; २ (–) नि ; ३ सिद्धगंधर्वीं नि.

तैसें[1] पूजूनि आस्तीकातें । वासुकी विनवी जोडिल्या हातें[2] ।
उपकार[3] फेडावया[4] येथें[5] । पदार्थ कांहीं दिसेना ॥ ३१ ॥

तुझिया ऐसा पक्षपाती । आतां न भूतो न भविष्यति ।
पुराणमुखें राहे[1] कीर्ती । ऐसें कांहीं मज[2] मागें[3] ॥ ३२ ॥

आस्तीक ह्मणे अवश्यक[1] । मागणें आहे[2] कांहीं येक ।
देईन ह्मणोनि[3] तात्काळिक । भाष[4] दीधली फणींद्रें ॥ ३३ ॥

हें माझें आस्तीकचरित्र । पढेल[1] पढवील[2] ज्याचें वक्त्र ।
श्रवण करिती[3] ज्याचे श्रोत्र । अथवा ग्रंथ[4] संग्रहिती[5] ॥ ३४ ॥

आपदीं[1] संपदीं सहजदिनीं[2] । सायं प्रात[3] हो[4] माध्यान्हीं[5] ।
आस्तीकनाम स्मरेल वाणी । सकृत[6] अथवा संतत[7] ॥ ३५ ॥

तुह्मां[1] सर्पापासूनि[2] जगतीं[3] । विषभय न[4] हो[5] त्यां[6] कल्पांतीं ।
दंश जालिया प्रारब्धगति । तेथेंही[7] आज्ञा पाळणें[8] ॥ ३६ ॥

---

३१. १ **ऐसें** औं पु ; २ **हस्तें** नि मुं पु गो·२ ; ३ **उपकारार्थ** नि नां पु ; ४–५ **फेडावयातें** नां.

३२. १ **राहेल** नि ; २ ( – ) गो·२ ; ३ **सांगें** नि , **सांग** मुं नां , **सांगा** औं पु , **मागणें** गो·२.

३३. १ **आवस्यक** धु पु·४ ; २ **असे** ख गो ; ३ **ह्मणे** नि ख पु४ मुं ; ४ **भाक** नि.

३४. १ **पुढील** पु४ , **पढवील** नां , ( – ) औं ; २ ( – ) मुं नां पु , **वाढवील** औं ; ३ **करितां** नि औं पु , **करील** गो ; ४–५ **ग्रंथसंग्रहीं** नि.

३५. १ **अपदीं** ख मुं नां औं गो ; २ **निद्रास्थानीं** औं , **सहजिवनीं** गो·२ ; ३–४ **प्रातरहो** नि , **प्रातही** गो·२ ; ५ **माध्यानीं** ख पु४ नां धु गो·२ ; ६ **सकृत्** नि , **संस्कृत** औं पु गो·२ ; ७ **असकृत** नि , **प्राकृत** औं पु गो·२.

३६. १ ( – ) नां औं ; १–२ **तुह्मांपासूनि** मुं ; ३ **त्रिजगतीं** ख मुं ना औं पु ; ४–५ **नव्हे** नि गो·२ , **नसावें** औं , **न व्हावें** ख धु तं ; ४–६ **त्यां न हो** पु४ ; ७ **तेही** नि , **तन्हीं** ख ; ८ **पाळिजे** मुं.

विष उतरितां[1] माझे[2] नामीं । तात्काळ निर्विष करावें तुह्मीं ।
आस्तीक स्मरती जिये धामीं । तें स्थळ तुह्मीं त्यजावें[3] ॥ ३७ ॥
येकट[1] मनुष्य वनांतरीं । देखतां[2] माझें[3] स्मरण करी ।
त्यातें सांडूनियां दूरी । सीघ्र सर्पीं पळावें ॥ ३८ ॥
मैथुन करितां पाहेल[1] दृष्टी । सर्पीं न लगतां[2] तया[3] पाठीं ।
आरें[4] गिळितांही संकटीं । स्मरण[5] करितां[6] सोडिजे[7] ॥ ३९ ॥
ऐसें आस्तीकें मागीतलें । सर्पीं[1] अवश्य[2] ह्मणोनि दिधलें ।
वासुकीनें प्रमाण बोलें[3] । सर्व[4] पन्नग[5] गोविले ॥ ४० ॥
सर्पापसर्प[1] भद्रं ते । जन्मेजयस्य यज्ञांते ।
आस्तीकवचन[2] स्मरोनि चित्तें[3] । दूरी जावें महायशा[4] ॥ ४१ ॥

---

३७. १ उतरती नां, २ माझा ( माझां ) पु तं ; ३ त्यागावें ख.

३८. १ एकटा नि ; २ देखाल धु , देखा तं , (+) जो पु·४ मुं औं ; ३ (+) जो नि.

३९. १ पाहील ख औं पु धु , पाहिलें गो·२ ; २ लागावें नि मुं नां ; ३ तयाचे औं पु ; ४ अजगरें ख औं पु ; ५ ते स्मरण नि , तें स्मरण ख पु४ , तैं स्मरण मुं नां , तो स्मरण पु , तेथेंही स्मरणें औं ; ६ (–) औं ; ७ सोडणें नि रा , सांडणें औं पु.

४० १ (–) औं पु ; २ आवस्य पु४ धु ; ३ केलें नि ; ४ सर्प पु४ नां गो२ , सर्वां औं , सर्पां पु ; ५ पन्नगां मुं औं पु. औं मध्यें यापुढें पुढील ओवी आहेः–

नागादिक उरलीं कुळें । त्यांसहि भाकेसि गोविलें ।
सर्वां संतोषें दिधलें । तें प्रमाण पाळिजे अद्यापि ॥ ४० अ ॥

४१. १ सर्पासर्प मुं पु औं गो·२ ; २ आस्तीका नि ( आस्तिकें स ) ; ३ चीतें धु पु४ , चितें नां औं ; ४ महादोषा नां , महाविषा गो·२.

सर्पापसर्प भद्रं ते गच्छ सर्प महाविष ।
जनमेजयस्य यज्ञान्ते आस्तीकवचनं स्मर ॥

हा महाभारतांतील मूळ श्लोक (आदि० अ. ५८, २५) रा गो·२ तं या हस्तलिखित प्रतींमध्यें अशुद्ध स्वरूपांत सांपडतो.

आस्तीकवचन[1] स्मरोनि[2] मनीं[3]। निवर्तेना[4] सर्प[5] कोण्ही।
शतधा[6] भग्न[7] हो[8] कां[9] मूर्ध्नी[10]। शिरीषफळासारिखी[11]॥ ४२॥
हे[1] मर्यादा अद्यापि[2] पाहीं। सर्पी पाळिजे लोकीं तिहीं।
इयेविषयीं[3] संशय नाहीं। व्यासवाक्य प्रमाण[4]॥ ४३॥
तेणें[1] आस्तीकें तपोबळें। उद्धरूनि[2] पूर्वज[3] कुळें।
अक्षय मोक्षपदीं[4] सोहळे[5]। भोगविले समस्तां॥ ४४॥
हें आस्तीकधर्माख्यान। श्रवण करील[1] पुण्यवर्धन।
सर्व पातका करी[2] क्षीण[3]। चंद्र जैसा तमातें॥ ४५॥
संस्कृत अथवा प्राकृत गिरा[1]। कथा प्रवेशे[2] श्रवणद्वारा[3]।
तैं[4] हरूनि दोषागारा[5]। धर्मैश्वर्य पाविजे[6]॥ ४६॥

---

४२. १–२ °वचन श्रवण नि; २ पढतां औं पु; ३ कानीं नि खवर्ग गो·२; ४ न निवर्ते औं पु, प्रवर्तेना पु४; ५ (+) जो धु; ६ शात औं पु धु; ७ भस्म ख; ७–९ मस्तक भग्न होउनी मु; ८–९ हो नि नां, जो पु४, होय ख पु; १० मूर्ध्नीं नि; ११ शरीषफळासारिखें नि पु४, श्रीफळासारिखी पु, श्रीफळासारिखा मुं, श्रीफळाचेनिसारिखें औं.

४३. १ ते नि खवर्ग; २ (+) वरी धु; ३ ° विषीं औं पु; ४ प्रमाणें पु४ औं तं. ही ओवी गो२ मध्यें नाहीं.

४४. १ जेणें औं; २–३उद्धरिलीं बेताळिस औं पु; ४ पदीं औं पु; ५ सुखसोहळे औं, सोहाळे गो·२.

४५. १ करी पु·४ मुं नां तं, करिती धु औं; २ करील नि; २–३ परिक्षाळण औं पु.

४६. १ गिरी नि; २ प्रवेशें नि तं ख; ३ ° द्वारीं नि; ४ ते नि खवर्ग; ५ दोषागारी नि, दोषागरा पु तं, दोषगरा रा, दोषदुर्द्धरा औं, दोषजरा धु; ६ पावती नि खवर्ग. खमध्यें पुढील दोन ओव्या जास्ती आहेतः—

नाशी वीशबाधा पन्नगानना। पासूनि अवचट याचना।
सुख द्यावया आस्तीकाच्या स्मरणा। महामंत्र योजिला॥ ४६ अ॥
पूर्वीच चतुर्मुख सूचना। त्यावरी वासुगीची वरदक्षणा।
ह्मणोनी अतिसामर्थ्य जाणा। आस्तीकस्मरणमाळा मंत्र॥ ४६ आ॥

संपलें अद्भुत[1] आस्तीकायन[2] । पन्नगसत्र जालें पूर्ण ।
पुढां उपरिचराख्यान । व्यासोत्पत्ति अवधारा ॥ ४७ ॥

इति श्रीभारतकथागर[1] । आदिपर्व रससागर[2] ।
सेवा ह्मणे कविकिंकर । मुक्तिनाथ[3] श्रोतियां ॥ ४८ ॥

इति श्रीभारते आदिपर्वणि द्वादशोऽध्यायः ॥

---

४७. १ (-) पु धु ; १-२ **आस्तिककथागराख्यान** गो·२ ; २ **आस्तिकाख्यान** नि पु·४ मुं औं.

४८. १ °**कथागार** ख मुं नां , °**कथासागर** औं पु ; २ **रससार** औं ; ३ **मुक्तेश्वर** नि खवर्ग.

# शब्दकोश

( पहिला आंकडा अध्यायाचा व पुढचा ओवीचा. )

अंघ्रि—पाय. ८–९२; ११–१७१.
अचळ—पर्वत. ४–८२.
अचोरणें—न चोरणें. ( ? ) २–५६.
अजिन—कातडें. १–११.
अटवी—रान. १–१०.
अठव्य—घोर, निबिड. २–९०.
अध्वर—यज्ञयाग. २–१२; ११–१४३.
अनामिक—अस्पृश्य. १–५३.
अपवर्ग—मोक्ष. १–२७.
अपसया—आपोआप. ९–४; १०–४६.
अपाडें—अतिशय. ११–९४.
अपांपति—समुद्र. ५–८१.
अपूप—अनरसा. २–४८.
अंबक—नेत्र. ४–१४०.
अभिचारिक—जारण मारण करणारा. १–६५.
अभिशाप—खोटा आरोप. ३–४८.
अयन—तीन ऋतु, सहा महिने. ५–४.
अर्ककुसुमें—रुईची फुलें. २–४१.
अर्बुद—दशकोटी. १०–११३.
अर्य—एकनिष्ठ, प्रिय. १०–७६.
अर्व्हे—पात्र. ११–१६४.
अवगणें—गांठणें, धारण करणें. ११–१३, २२.
अवधूत—विरक्त. १–४४.
अवभृत-यज्ञसमाप्तीच्या वेळचें स्नान. १२–२४.
अवस्वर—प्रसंग, अवसर. २–१२४; ७–४०.
असृद्ध—रक्त. १–१५७.
अस्ती ( अस्थि )—हाड. ११–१५०.
अळिका—कीड, कीटक. १–८५.
अलुमाळ—किंचित्, जरा. ५–११४.

आकळणें—आवरणें. ४–१००.
आगम—मंत्रतंत्र. १–६५.
आंगवणा—स्वतः, व्यक्तिशः. ८–४०.
आगळा—जास्त, विशेष. २–५७; ६–३०.
आज्य—तूप ( शेळीचें ). १०–८३.
आटणें—नष्ट होणें, कमी होणें. ११–५५.
आंठी—मिठी. ८–६१.
आडमोडणें—नष्ट करणें. २–११.
आढी—विळखा. ५–१०८.
आतणें—होणें. ४–१११; ६–७९.
आतळणें—गांठणें. ७–१२६; ११–२६.
आतुडणें—प्राप्त किंवा स्वाधीन होणें. ७–१२०; १०–१२०.
आतौती / आंतौती—आंत. १–५०; २–४५.
आदरणें—स्वीकारणें. १–४३.
आदिकूर्म—कूर्मावतार. ४–८३; १०–५२.
आननमनें—अनन्यमनें. १–३.
आपांपति—समुद्र. ६–१८.
आरज—आढ्यता. ९–६४.
आरुती—अलीकडे. २–१२७.
आरुष—गांवढळ, बोबडा. ९–९७.
आर्त—उत्कंठा. ७–१३७; ८–८४.
आर्तवंत—उत्सुक. १–१००.
आवंतणें—आमंत्रणें, बोलाविणें. १–१९२.
आवर्त—भोंवरा. ६–५३; ११–३६.
आवर्षण ( अवर्षण )—अनावृष्टि. १–१०४.
आवेवीं—अवयवीं. ४–३६.
आशिष—आशीर्वाद. ११–७५.

आशीविष—साप. १०–१०६.
आसडा—हिसका. १०–१०४.
आसुडणें—ओढणें, हिसका देणें. ५–१०८.
आहाळण—ताप, दुःख. ४–९७.
आह्वानिणें—निमंत्रिणें. १०–८५.
आळणें—घट्ट होणें, सुकणें. १–८.
इडपाडें—आवेशानें. ६–३९.
इध्मा—समिधा, यज्ञांतील सर्पण. १०–८३.
इष्टापूर्त—यज्ञयागादि धार्मिक कर्म. ९–३२.
इसाळ—स्पर्धा, हेवा. १–१२९.
उगळणें—ओकणें. ५–८५.
उजू—कडे. ६–५९, ६२.
मग आवेसें पसरी मुख । ऊर्ध्वाउजू ॥
ज्ञा० ६–२२८.
उतारा—उपशम. ८–१८.
उत्तरी—उत्तरक्रिया करतांना गळ्यांत जानव्यासारखें घालतात तें वस्त्र, उपरणें. ११–३०, ११८, १२९.
उत्पवन—आंचवणें. ५–१२६.
उद्गाता—सामगान करणारा ऋत्विज. ११–५.
उन्नेता—पात्रांत सोम घालणारा ऋत्विज. ११–७.
उन्मेष—ज्ञान, प्रकाश. १–३०.
उपराग—ग्रहण. १–१९०.
उपरिकाधाम—माडी. ८–६९.
उपरिगृह—माळा, माडी. ८–२.
उबग—कंटाळा, वीट. २–४४; १२–१७.
उमप—अगणित, अमर्याद. १–१७९; ४–१४१.
उमाणणें—मापणें, ताडून पहाणें. ९–९६; ११–९४.
उरग—सर्प. ३–८२.
उलणें—फुटणें. ४–३१.

कंठीरव—सिंह. १–९.
कडसणी—विचार, भेद. १–९१.
[ कडसणी धरितां अडचणीचा ठाव ।
तुगा. २५१२. ]
कंडूयमान—खाजवणें. २–२४.
कंद—मूळ, गड्डा. १–२५.
[ जन्ममरणाचा बाध । समूळूनि तुटे कंद ।
तुगा० ४२२६. ]
कंबु—शंख. ४–११७.
कमठ—कासव. ४–८२; ५–९६, १२४.
करवाळ—तरवार. ६–८.
कर्दम—चिखल ५–६.
कवडा—मोठी कवडी, कपर्दिका. १–६९.
कवळणें—कवटाळणें, मिठी मारणें. ३–१७.
कश्मल—मोह. १–१५२.
कळीवर—कलेवर, प्रेत. ७–७७.
कांटाळा—कांटा, रोमांच. ५–१२९.
[ सर्वांगा कांटाळा आला ।—ज्ञाने० १–१९७. ]
काडवाती—काडीला कापूस गुंडाळून केलेली वात. १–९०.
काद्रव—सर्प. ८–३४; १२–१७.
काद्रव्य—सर्प. १०–१०८.
कासेनि—कशानें. २–३८.
कीळ—तेज, प्रभा. ४–५७.
कुटा—भुकटी. १–६३.
कुटिलेंदु—चंद्रकोर. १–१२.
कुटी—निंदा, आळ. ३–४८.
[ न गणित कुटी बोलती ।—ज्ञा० २–२१८. ]
कुरंग— मृग. १–१२.
[ तुळा-ध्यायेन्नित्यं महेशं रजतगिरिनिभं चारुचंद्रावतंसं रत्नाकल्पोज्ज्वलाङ्गं परशुमृगवराभीतिहस्तं प्रसन्नं ।
( शिवस्य ध्यानम्, मत्स्यपुराण, अ.१५८)]

ज्यापें—ज्यापाशीं. 'पें' पहा. ४–१७२.
ज्यालें—सजीव. ३–५५.
झांकोळणें—दिपणें. ६–९७.
टाकणें—शक्य किंवा आटोक्यांत असणें. ८–७७.
[ हें न टकेचि जरि पाईं– ज्ञा० ३–५८. ]
टोंकणें—उत्सुक असणें. ९–५३.
ठकणें—ठकविणें. ४–१२५; ६–१२०.
डवरणें—माखणें, लिप्त होणें. ५–२.
ढेसा—कोम, कांडा. २–४१.
तडक—एकसारखे, नेटानें. ६–३९.
तंति– तार. ५–९३.
तमिस्रा—काळोखी रात्र. १०–५२.
तरळ—चपल. ७–६४.
तरळणें—दिपणें. ५–३.
तवक—आवेश. ७–९१; १०–११६.
ताटंक—कर्णभूषण. ४–१६७.
तावणें—तापविणें. ५–५५.
[ 'तो तावूनि प्रतापतरणी '— मुक्ते० आदि० ३३—२३. ]
तिंबणें—भिजणें. १–१६७.
तुंबा—भोपळा. ५–९३.
तूणीर—बाणांचा भाता. ६–१०.
तृष्टी—खडबडीत. ५–६१.
( तृष्ट—rough, rugged. M. W.)
तोय—पाणी. ७–९१.
त्रिदश—देव. ४–५१.
थाटी—समुदाय. ४–८१, १२३; ६–३८.
थाया—हट्ट, ध्यास. १–४३.
थोवा—थवा, समुदाय. ९–७८.
दंदशूक—सर्प. ९–१७; ११–१४, १४१.
दंदी—वैरी. ११–१२०.
[ मैत्री सांडोनि होतसे दंदी–तुगा. ४४२२. ]
दंभोळी—इंद्राचें वज्र. २–१२०; ८–२०.
दर्वीकर—सर्प. ९–७७.
दांग—वन, झाडी. ४–१०९.
दाटणें—रेटणें, लोटणें. ९–५२.
दारु—लांकूड. ७–७५.
दिवानाथ—सूर्य. ५–५५.
दुरित—पातक. ८–५५.
दोंदील—तृप्त, आनंदित. २–२८; ४–१४०.
[ 'आशारसें दोंदिल । जाला सांता '–ज्ञा० ७–१६८. ]
द्वंद—कलह, युद्ध. १–१३२.
द्वंदी—वैरी. ५–४२.
नमुचि—इंद्राचा शत्रु, ज्याला इंद्रानें फेसानें मारलें. २–१३१.
नातळणें—हातास लागणें, स्पर्श करणें. १–४६, १–५४.
नाभिकारणें—अभय देणें. ५–१२०.
नाभी—भिऊं नकोस. ५–३७.
नाराच—बाण. ६–३९.
नास्तिक—निराशा. ९–६९.
नाहो—नाथ, पति. ४–५६; ११–४८.
निकें—ठीक, बरें. ४–१६०; ११–१२१.
निकेतन—घर, निवास. २–९४.
निखिळ—निखळ, शुद्ध, पूर्ण. १०–१०१.
निगुतीं—नीटपणें. १–८९.
निघातें—जोरानें. ४–१४५.
निज—आत्मस्वरूप. १–३.
निबिड—गडद अंधकार. ६–४६.
नियोग—आज्ञा, योजना. १–१२१.
निरंजन—अरण्य, एकांतस्थळ. ३–५३.
निरधी—समुद्र. ४–७७.
निराळ—आकाश. १–१८३; ६–७०.
निरुती—बरोबर, खचित. ६–११८.

निर्जर—देव. ६–४४.
निर्बुजणें—घाबरणें. ६–८४.
निर्वाण—कठीण प्रसंग, संकट. १–१३५; ६–२६.
निवटणें—ठार करणें. ७–६४.
निवणें—चुंबळ. ४–८३.
निवाडें—खरोखरी, आग्रहानें. ५–६०.
निवेदणें—अर्पण करणें, ओपणें. १–६, १०९; २–१०७; ४–४९;८–८६.
निष्टंक—पूर्णोशीं. १२–२५.
निक्षेपणें—टाकणें, ठेवणें. ४–८२.
नीड—घरटें. ८–२८.
नृग—ओघरथ राजाचा पुत्र. एकदा दान दिलेली गाय चुकीनें दुसऱ्या ब्राह्मणास पुनः दान दिल्यानें पहिल्या ब्राह्मणानें सरड होशील असा त्याला शाप दिला. ( म. भारत, अनुशा० अ. ७० ).८–७५.
नेत्र—दहीं घुसळण्याची दोरी. ७–५३.
[ मन्थानं मंदरं कृत्वा तथा नेत्रं च वासुकिम्। महाभारत. आदि० १८–१३. ]
न्यग्रोध—वड. ८–२६.
न्यसणें—ठेवणें, टाकणें. १२–२१.
पटकूल ( पट्टकुल )—उंच रेशमी वस्त्र. १–२१.
पडताळणें—धरणें, पेलणें. ३–७५; ६–९.
पडिताळणें—मेळ घालणें. १–९८.
पढयंती ( पढियंती )—आवडती. १–३४.
परिघ—शस्त्रविशेष. ६–९.
परिधी—भोंवतीं. ३–१८; ६–७४.
परिपाठी—रूढ. ९–९.
परिसंमूहन—अग्नीभोवतीं जलसिंचन करणें. १०–८२.
परिस्तरण—यज्ञांत अग्नीच्या भोंवतीं दर्भ टाकणें. १०–८२.
पर्युषित—पारोसें, शिळें. २–१०२.
पर्युक्षण—ईशान्येस सुरुवात करून अग्नीच्या भोवतीं प्रादक्षिणिक पाणी शिंपडणें. १०–८२.
परुहां—दूर, बाहेर. २–१४९.
[ ह्मणोनि थोरपण परुहां सांडिजे— ज्ञा० ९–३७८. ]
पळिपणें—जळणें. १०–११०.
[ यास्तव हेतु अंकुरू। पळपोनि जाय ।- त्र्यंबक, बालबोध. ( खं०१–६–३६.)]
पाइकी—सेवा. १–३९.
पाथर—दगड. २–१८.
पाप–पापडी, पिवळें रेशमी वस्त्र. (?). ९–८२.
पायवणी—चरणोदक. १–५६.
पार—किनारा. ४–७७.
पारपत्य—देखरेख, रखवाली. २–३.
पालट—अदलाबदल. ५–६६.
पांसु ( पांशु )—धूळ. ६–४६.
पाळा—समुदाय. १–२७; ४–१०८; ५–८२; ६–११.
पिंड—शरीर. २–१८.
पिनाक—शिवधनुष्य. १–१४५.
पिसाळ—कंटाळा मानणारा. १–६७.
पीयूख—अमृत. ६–९४.
पीयूष—अमृत. १–७०.
पुरीष—शेण. २–१४२.
पुष्ठी ( पृष्ठी )—पाठ. ४–८३; ६–१२२.
पृषदाज्य—दधिमिश्रित तूप. १०–८८.

पें—पाशीं. 'ज्यापें' पहा. ४–१७२.
मन न वळे मज जैसा गज अंकुश न वसतां महाता-पें ।-मोरोपंत, आदि०७–१०.
पेड—झुंड. ४–८७.
पोतास—कापूर. १–३३.
[ किं रंभेच्या सोपटगाभारीं । पोतासु दळी । –बालबोध, खंड १–१–१०१. ]
प्रणीता—मूठ असलेलें यज्ञांतील एक चौकोनी लांकडी भांडें. १०–८३.
प्रत्युत्थान—सन्मानार्थ उभें राहणें. ८–५३.
प्रमय—प्रमेय. १–३३.[कथा कापुर केळीचां उदरीं । प्रमयांचा पोतास कवणेपरी । निफजे जाणालागीं—नरेंद्र, रु. स्वयंवर, २५. ]
प्रयुत—दशलक्ष. १०–११३.
प्राप्ति—बिशाद, पर्वा. ९–४७.
फरश—परशु. ६–९.
फुफांट—आवाज. ८–६१.
बरडे—निकस जमीन. १–६४.
बर्हि—दर्भ. ३–७१; १०–८२.
बाणणें—घालणें. ६–८.
बाणलिंग—लिंगाकृति दगड. १–३२.
बांधा—खडा. १–८.
बिडिश—बडिश, आमिष. ५–७७.
बुझावणें—शांतविणें. ३–३०.
बोनें—पक्वान्न. १–८७.
बोभाइणें—मोठ्यानें हांक मारणें. २–४४.
बोळविणें—पाठविणें. २–६८.
भग—योनि. ९–५२.
भद्र—हत्ती. १–१६३.
भर्जन—भाजणें, नाश करणें. १–१६.
भवंडी—घेरी, भोंवळ. १०–८९.
भंवाडेण—फिरविणें. ८–३७.
भाग्यमंद—कमनशिबी. ९–२५.
भाजन—पात्र, भांडें. ९–५२-
भिंडिमाळा—गोफण. ६–३९.
भिषक—वैद्य. ८–५०.
भूसुर—ब्राह्मण. १०–५७.
भेदणें—भिडणें. १०–८६.
भोगी—साप. ११–३०.
भोगीश—सर्पेंद्र. ८–२४.
मघमघणें—घमघमणें, सुवास देणें. १०–१०२; ११–६५
मजुरिया—मजुराप्रमाणें (?) मजोरीनें (?); उन्मत्तपणें. ९—५४.
माईक—मायावी. ६–८८.
माणें—गुंगी. २–६६.
मांदुस—पेटी. ८–४२.
मानवणें—संतुष्ट होणें. २–८३.
मार्तंड—सूर्य. ११–५९.
मांसागळा—पुष्ट. २–३१, ३५.
मिनणें—जमणें, गोळा होणें. १–१०१.
मुद्रांकित—लेखननाम घेतलेला. १–४४.
मुरकुंडी—झुंडी. ४–८७.
मुक्ष—मुख्य. ६–१०३.
मूर्ध्नी—डोकें. १२–४२.
मृड—शंकर. ८–१९.
मेधा—कुशाग्र बुद्धि. ११–७४.
मेळ—मालिन्य, मळ. ५–७.
मौळ—मस्तक. ५–१२८; ७–११७.
युक्ष—इक्षु, ऊंस. २–५७; १०–९८.
यूप—खांब. १०–७२.
रंभा—केळ. १–३३.
रंभोरु—केळीप्रमाणें मांड्या असलेली, सुंदर ९–४०.

रमणीक—मनोहर. ५–५४.
रसोय—स्वयंपाक. १–८८.
रिद्धिसिद्धी—ऋद्धिसिद्धी, गणपतीच्या परिचारिका. १–२६.
रुण—ऋण. २–८७; ९–१३.
रुतस्नात—ऋतु प्राप्त झालेली. २–७२.
रूपस—सुरूप. २–६१.
रोहिणेयवट—वृक्षविशेष. ५–१११.
ललाम—भूषण. ४–५४.
लाव—जखाण, हडळ. ७–४३.
लुंचणें—उपटणें. ६–५७.
लोहे—कढई. २–७९.

नातरी निदैवाचां परिवरीं ।
लोह्या रुतलिया आहाति सहस्त्रवरी ।
—ज्ञा० ९–५९.

वक्त्र—मुख. ३–३०.
वग्त्र—मुख. १–१०७.
वग्तुत्व—वक्तृत्व. १–८२.
वयसा—वय. ११–१०८.
वरपडें–डा—वश. ७–१३१.
वसुधारा (वसोधारा)—वसुधारा, संपत्तीच्या धारा. १०–८६.
वळघणें—चढणें. २–१३९; ५–८६; १०–३४.
वाकुडी—वर्षाव. १–९८.

‘ जेवीं वाकुडी घाली घन ’ ।
— मुक्ते० विराट० ५–१११.

वाघा—खंडोबाला वाहिलेला भिक्षेकरी. १–६३.
वाजी—घोडा. ५–१९.
वाढ—पुष्कळ. ९–७३.
वांति—ओक, वमन. ७–१७.
वालखिल्य (ल्ल)—प्रजापतीचे आंगठ्याएवढे मानसपुत्र. ६–१.
वावो—मिथ्या. १–३.
वाळ—पुच्छ. ५–७, १७.
विकळ—अपुरा. ११–१४६.
विकळता—हतबुद्ध स्थिति, खद. ११–७२.
विखंडणें—नाश करणें. ५–४२.
वित्पन्न—व्युत्पन्न. १०–६०.
विबुध—देव. ४–१६३.
विभाडणें—नाश करणें. ५–७४.
विरूढणें—वाढणें. १–२५;३–३३;९–८०.
विवर्ण—फिक्कट, तेजोहीन. ९–७३.
विवर्त—भोंवरा. १–९७.
विषम—संकट, अडचण. १-१५२; ८-६९.
विषय—स्थान, प्रदेश. ३–८४.
विषोल्बण—साप. १०–१०७.
विहू—व्यूह. १–१५४.
वेटाळणें—खुडणें, वेचणें. १–९८.
वेण—( १ ) प्रयत्न, ( २ ) नदींत मासे पकडण्याचें जाळें. १–७९.
वेथा ( व्यथा )—पीडा. ११–२८.
वेळा—किनारा. १–८१.
वैडूर्य—रत्न. ७–१०७.
वैवस्वत—यम. ७–११३.
वोगरणें—वाढणें. १–८७.
वोझडी—गळती, झडणें. ४–१०६.
वोडविणें—पुढें करणें. १–८५, १०५; ७–१२५.
वोळगणें, वोळंगणें—मिठी मारणें, चिकटणें, आश्रय करणें. १–५७; ५–१०२; ८–८१; ९–७८.
शकुंत—पक्षी. ८–२८.
शकुनि—पक्षी. ५–१०५.
शफत—शपथ. ५–५; ११–४४.
शारें—रोमांच, कंप. १०–१८.
शार्ङ्गिरव—शाङ्गरव, शृंग वाजवणारा ऋत्विज ( ? ). ११–६.
शिलीमुख—भ्रमर. १–२८.
शिस ( शीर्ष )—डोकें. १–५१.
शून्याकार—निराशा, विफलता. ९–६६.
शेखीं—अखेर. २–५२.
शोकणें—सुकणें. २–११४.

श्रुकश्रुवा—यज्ञांतील दोन पळ्या. १०–८३.
सकृत—एकदां. १२–३५.
संघटणें—बिलगणें. ९–५१.
सणाणी—तीक्ष्ण. ६–३७.
सत्राणें—जोरानें. ५–१०९.
संधि—तडजोड, एकी. १–१२८.
सपत्न—वैरी. १–१६५.
संपुट—करंडा. १–४.
समक्षा—प्रचीति, साक्षात्कार. १०–२६.
संशितवृत्ति—, संशितव्रत— } तीक्ष्ण म्हणजे उत्तम व्रत पाळलेला १-१०१;११-१२.
सळ—भंग, मोड. ४–१४१.
साउपें—शांत, शुद्ध. ४–१०५.
सांकडें—संकट. ७–११.
साटी—स्पर्धा. १–६९.
साटी—नाश. ५–७७.
सांडणें—ओंवाळणी, कुरवंडी. ४–१३३; ७–१३०.
साध्य—धर्म व साध्या यांचे पुत्र, तामस मन्वंतरांतील देवगण. ६–५९.
सारंगपाणी—विष्णु. १–१५१.
सारमेय—कुत्रा. २–४.
सारु—बरोबर, योग्य. २–६४.
साक्षपें, साक्षेपें }—निष्ठापूर्वक. १–१३८.
सिग—पूर्णता, शिखर. ४–१४१.
सिंतरणें—फसविणें. २–१००. “मन सिंतरिल विवेकासी.”–ए० भा० ३१, ९५१.
सिरकणें—शिरकणें, सांपडणें. ४–१२६.
सिवतणें—शिवणें. २–८.
सींतरू—फसणूक. ७–८१.
सुखाडें—सुखानें. ९–२१.
सुनी—कुत्री. २–४.
सूचिणें—सुचविणें. ५–१०५.
सूदणें—घालणें. १–१३०; २–१७.
सूनि—सूदोनि, घालून. १–७; ७–८८.
सेत—सेतु. १०–४९.
सैरा—स्वच्छंदानें. १–६१.
सोंकरणें, सोकरणें }—रक्षण करणें. १–६४.
सौदामिनी—वीज. ४–१०४.
सौम्य—सोमाची दिशा, उत्तर. ६–६०.
स्तेय—चौर्य. ७–८०.
स्थाली—भाड. १०–८३.
स्वधा—पितरांस पिंडदान करण्याच्या वेळचा मंत्र. ३–३१.
दक्षकन्या, अग्नीची पत्नी. ५–२७.
स्वपच [ श्वपच ]—चांडाळ. १–५१.
स्वाहा—देवास हवि देण्याचा मंत्र. ३–३१.
दक्षाची कन्या व अग्नीची पत्नी. ५–२७.
स्वेत—सेतु. १–८४.
हव्यवाट—अग्नि. १०–८६; ११–१२०.
हव्यवाहन—अग्नि. १२–१२.
हळाहळ—वीष. १–१२.
हाटक—सोनें. १०–९९.
हातवसिणें—हस्तगत करणें, हात घालणें. ४–१६९; ६–३५.
“हात घासोनियां भूमीसी । हातवसी खड्गातें.”–एक० रु० स्व० १२-१३२.
हार—रांग. ४–७७.
हांव—धमक. ८–१९.
हिरतणें—हिरावून घेणें. ४–१२४,१४८.
हुताश—अग्नि. २–४१.
हेळण-णा—अपमान. १-६१; २-१; ९-४६.
हेळसिणें—अवहेलना करणें. ९–५०.
होड—पैज. १–६९.
क्षपणिक—यति. २–११३; ६–५७.
क्षत्ता—दासीपुत्र. १–१२२.
क्ष्वेड—विष. ८–१९.

# शुद्धिपत्र

( पहिला आंकडा पृष्ठाचा दुसरा ओळीचा. जाड टाइपांतील शुद्ध पाठ संहितेंतील आहेत. )

| | अ | शुद्ध |
|---|---|---|
| २–१५ | वमन | नमन |
| ६–२० | बिजकंदीं | बीजकंदीं |
| ७–१३ | हंतादिन° | दंतादिन° |
| ७–१४ | विघ्नालंकार° | विघ्नाधकार° |
| ७–२७ | महिमे | महिमें |
| ८—४ | गिर्वाणी | **गीर्वाणी** |
| ८–१२ | सत्वरी | सत्वरीं |
| ८–१५ | निवाणी | निर्वाणीं |
| ९–२३ | ६(–) खवर्ग | ६(–) नि खवर्ग |
| १०–११ | नव्हे | नव्हें |
| १०–१३ | ४ त्यांसी | ४ त्यांसीं |
| ११—१ | सज्जन–श्रोतियां | **सज्जन-श्रोत्रियां** |
| ११–२२ | संगती | संगतीं |
| १२—३ | संताचे | **संतांचे** |
| १२–१४ | जवं | जंव |
| १२–१७ | इंद्रचंद्राचे | इंद्रचंद्रांचे |
| १३–२० | सकळतेचें | सफळतेचें |
| १५—९ | येथें | **जेथें** |
| १६—५ | अवधान परिसें येणे | **अवधान-परिसें येणें** |
| १८–१८ | गंगादकें | गंगोदकें |
| १९–११ | ऋषि | **ऋषि** |
| १९–१६ | श्रवणें | चतुर श्रवणें |
| २१–२१ | दिधल | दिधलें |
| २४—१ | अमर | **अमर**[3] |
| २५–२० | साटोपं | साटोपें |
| २६–१२ | सांडिला | **सांडिली** |
| २९–१५ | जयाशेची रा ख | जयाशेची नि रा ख |

| | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ३०—१ | जीत | **जित** |
| ३१–२६ | गा·२ | गो·२ |
| ३२—१ | °ब्राह्मणा | °ब्राह्मणां |
| ३२—४ | जींही | **जींहीं** |
| ३३—१ | चतन्य° | **चैतन्य**° |
| ३३–२७ | सानंद | स्वानंद |
| ३४—३ | भारतीचें | **भारतीचें** |
| ३९—३ | अध | **अर्ध** |
| ४०—२ | उचिष्ठिलें | **उचिष्टिलें**[४] |
| ४०—९ | आतिपातक | **आतिपातक**[3] |
| ४२—३ | जाते | **जाले** |
| ४४–१२ | शिष्यातें | **शिष्यांतें** |
| ४४–१८ | जिकिलें | जिंकिलें |
| ४५–१४ | तो | **तोचि** |
| ४८–२६ | आ | ऑ |
| ५१–२२ | धरित्रीत | धरित्रीतें |
| ५२—७ | कचि | **कैंचि** |
| ५६–२५ | ( – ) | — |
| ५८–१४ | जसी | **जैसी** |
| ५८–२५ | लागुनी | °लागुनी |
| ५९–२४ | आ | ऑ |
| ६०—१ | असों | **असो** |
| ६०—८ | यकांता | **येकांता** |
| ६२—२ | रिघों | **रिघो** |
| ६५–१३ | कोड | कोडें |
| ६५–१३ | वन | **वनें** |
| ६६–१४ | सांगीतेंल | **सांगीतलें** |
| ६६–१६ | निरपरा° | निरपराधें |
| ६६–२१ | २ तया निपु | — |

| | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ६९–११ | साक्षेपें | साक्षपें |
| ६९–१४ | वश | वंश |
| ७०–८ | तयाचें | तयांचें |
| ७०–११ | समंध | संमंध |
| ७०–१८ | तीथातीर्थ | तीर्थातीर्थ |
| ७०–२५ | समध | संमंध |
| ७१–२ | होण | होणें |
| ७१–२० | नामसरी | नामेसरी |
| ७२–८ | कारण | कारण[3] |
| ७२–१४ | ऐस | ऐसें |
| ७२–२६ | जन्मतील ^ | जन्मतील नि |
| ७४–७ | करि | करिं |
| ७४–१३ | विनता- कद्रू | विनता- कद्रू[1] |
| ७४–१९ | आ | आं |
| ७५–९ | उच्चश्रवा | उच्चैश्रवा |
| ७६–७ | खाणीं | खाणी |
| ७७–१० | रत्न | रत्नें |
| ७८–१३ | अमृत | अमृताचा |
| ७८–१७ | खवग | खवर्ग |

| | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ७८–२० | त | तें |
| ८६–२२ | घु, पु ४ | घु. पु ४ |
| ८६–२४ | झुंझारी | झुंजारी |
| १०२–१४ | तयावें | तयांचें |
| ११३–५ | °चरण चवड्या° | °चरण- चवड्या° |
| ११९–१ | साक्षपें | साक्षेपें |
| १२४–२५ | पखारूं | पाखरूं |
| १४३–७ | अस्तीक- मुनि | आस्तीक- मुनि |
| १५०–२६ | याहीं | यांहीं |
| १५६–५ | मनानें | मननें |
| १७३–१६ | लौमहृ- षंणीं | लौमहृ- षंणी |
| १९८–९ | भूसूर- स्वामी | भूसुर- स्वामी |
| २०७–१३ | गध्हळे | गव्हळे |
| २४३–२ | मूध्री | मूर्ध्नी |

## आणखी कांहीं पाठभेद

( पहिला आंकडा अध्यायाचा दुसरा ओवीचा )

| | प्रसंप्रा | पाठभेद |
|---|---|---|
| १–४५ | लिहितां | लिही नि |
| १–४८ | दंभाचारें | दंभाचार नि |
| १–८२ | तुमचे | तुमचें नि |
| १–९५ | °शृंखळे | °शृंखळा नि |
| १-१५१ | भाविती | धांवती नि |
| १-१६५ | सखीं | ( – ) नि |
| २–८० | मन | ( – ) पु४ |
| २–९० | पुष्यरायाचें | पौष्यरायाचें नि |

| | प्रसंप्रा | पाठभेद |
|---|---|---|
| २-१४१ | वृषभेंसी | वृषभासी नि |
| २-१५१ | करिता | करविता नि |
| ३–६७ | परोपकारेंविण | °काराविण नि |
| ५–५६ | तें | ( – ) नि |
| ५-१०५ | सुचिला | सुचविला नि |
| ७–९० | बोळवीन | वोळवीन नि |
| ८–५० | गदक | निगदक तं |

# मराठी संशोधनमंडळ

मुंबईसरकारच्या आश्रयाखालीं या संस्थेची स्थापना ता. १ फेब्रुवारी १९४८ रोजीं झाली. जुन्या मराठी ग्रंथकारांच्या महत्त्वाच्या ग्रंथांच्या चिकित्सक आवृत्त्या प्रसिद्ध करणें, जुन्या मराठी हस्तलिखितांची बृहन्नामावलि (Catalogus Catalogorum) बनविणें, मराठी ग्रंथांचीं जुनीं हस्तलिखितें मिळविणें किंवा त्यांच्या हाती किंवा फोटोग्राफिक नकला आणून त्यांचा संग्रह करणें, जुने मराठी शिलालेख किंवा ताम्रपट यांचा ग्रंथ तयार करणें, मराठीच्या निरनिराळ्या बोलीप्रकारांचे शब्द व नमुने गोळा करून त्यांचीं व्याकरणें रचणें, संस्कृत भाषेची सेंट पिटर्स्‌बर्ग डिक्शनरी किंवा ऑक्स्फर्ड इंग्लिश डिक्शनरी यांच्या धर्तीवर मराठी भाषेचा बृहत्कोश निर्माण करणें, असे या मंडळाचे उद्देश आहेत, व त्यांना अनुसरून कामाला सुरुवात झालेली आहे. मुंबई विद्यापीठाकडून मराठी विषयामध्यें पीएच्. डी. च्या पदवीकरितां संशोधनकेंद्र म्हणून मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाला जोडलेल्या या संस्थेला मान्यता मिळाली आहे.

